


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट







अनुक्रमणिका

अनुक्रमणिका




प्लेटो लस्टर गोल्ड प्लेटो ५५ प्लेटो ६६




ह्यापैकीं एकतरी पेन तुमच्याजवळ असलेच पाहिजे. आकर्षक घडण व उत्कृष्ट कारागिरी यामुळें विद्यार्थी, लेखक, डॉक्टर, इंजिनीयर अशा विविध क्षेत्रांतील व्यक्ती प्लेटो पेनची नेहमी वाखाणणी करतात. ह्या पेनमधें भरपूर शाई राहते व ती पेनच्या अणीदार पण मृदू नीबवर स्थिरपणे येत राहते. त्यामुळें ह्या पेनने लिहिणें सुकर व आनंददायी वाटते.

ह्या पेनचे उत्पादन आपल्या देशांतच होत असल्यामुळें वाजवी किंमतीत ती तुम्हाला मिळतात. तुमच्या दुकानदाराकडे विचारा— तो तुम्हाला ४ रु. पासून १८ रु. पर्यंत मिळणारी निरनिराळी प्लेटो पेन्स दाखवील.

**म्हात्रे पेन अँड प्लॅस्टीक इंडस्ट्रीज प्रायव्हेट लि. मुंबई**

सोल डिस्ट्रीब्युटर्स :

**दि बेस्ट फाऊंटन पेन डेपो, ७९ देवकरण मॅन्शन, प्रिंसेस स्ट्रीट, मुंबई**



अनुक्रमणिका


दिवाळी आनंदांत
साजरी करा !



# दीपावली

साहित्य - कला - संगम

वर्ष १२ वें

१९५६




संपादक–प्रकाशक–मुद्रक : दीनानाथ दलाल ● कार्य. संपादक : ग. रा. कामत





चित्रछपाई : प्रकाशनस्थळ : मुद्रणस्थळ :

शिवराज फाईन आर्ट ● दलाल आर्ट





अनुक्रमणिका

# आधीं केलें; मग सांगितलें —



एक तप झालें. 'दीपावली'ची कल्पना एका सु-संध्याकाळीं सुचली; त्या गोष्टीला बारा वर्षें होऊन गेलीं. दिवाळीच्या निमित्तानें वेंचक ललित-साहित्य आणि आकर्षक चित्रकृती यांनीं विनटलेला अंक अभिरुचिसंपन्न वाचकांच्या हातीं द्यावा अशी स्थूल कल्पना त्यावेळीं मनांत होती; नवनवीन प्रयोगांनीं तिला मूर्त स्वरूप देण्याचा यथाशक्ति प्रयोग गेलीं बारा वर्षें करीत आलों. वाचकांनीं या प्रयोगांचें सहर्ष स्वागत नेहमींच केलेलें आहे. लेखक आणि मुद्रक, विक्रेते आणि वाचक, जाहिरातदार आणि हितचिंतक, सर्वांचाच अकृत्रिम लोभ आणि सक्रिय पाठिंबा 'दीपावली'ला सुरुवातीपासूनच लाभला. त्यांच्या सहकार्यामुळेंच आजचें हें स्वरूप 'दीपावली'ला प्राप्त झालें आहे. प्रेमाचें ऋण शब्दांनीं फेडतां येत नाहीं याची जाणीव मला आहे; हें ऋण फिटावें अशीहि इच्छा नाहीं; उलट उत्तरोत्तर तें वाढत जाण्यांतच 'दीपावली'चा उत्कर्ष आहे हें मी जाणतों. पण एक तपाच्या दीर्घ कालावधीनंतर ह्या ऋणाचा निर्देश करणें मी माझें कर्तव्य मानतों. म्हणूनच लेखक आणि वाचक यांच्यामध्यें मी क्षणभर उभा राहिलों आहें.

एकाद्या अज्ञात प्रदेशांत पाऊल टाकलें म्हणजे आपण जागजागीं थबकतों; कुठून निघालों, कुठें आलों, कसकसे आलों याचें सिंहावलोकन करतों आणि नंतरच पुढें पाऊल टाकतों. एका दृष्टीनें 'दीपावली'च्या निमित्तानें मीं या अनोळखी क्षेत्रांत पदार्पण केलेलें आहे; एक तप उलटल्यानंतर सिंहावलोकनासाठीं क्षणभर थांबावें असेंहि माझ्या मनांत आहे. 'दीपावली'चे बारा अंक वाचकांच्या समोर आहेत; तेव्हां आतां या सिंहावलोकनाच्या निमित्तानें मी त्यांना अकारण तसदी देत आहे कीं काय अशीहि शंका कुणाला येईल! शंका अगदींच अनाठायीं नाहीं. कारण एकापरीनें ही 'उजळणी'च आहे. पण पुढली दिशा स्पष्ट व्हावी या उद्देश्यानें मी ती करीत आहे.

संपादन-प्रकाशनाचें क्षेत्र हें खरोखरच मला अनोळखी होतें. 'दीपावली'च्या प्रसिद्धिपूर्वी वर्ष-सहा महिने जरी कुणी तसें भविष्य वर्तवलें असतें, तर मी त्याला वेड्यांत काढलें असतें! संपादक होण्याची महत्त्वाकांक्षा मी कधींच बाळगली नव्हती. साहित्याशीं माझा संबंध केवळ वरवरचा! पण मला या क्षेत्रांत ओढून आणण्याचें श्रेय श्री. रॉय किणीकरांचें. त्यांनींच माझा हात धरला आणि बळेंच मला आपल्याबरोबर या क्षेत्रांत ओढून आणलें. श्री. किणीकरांसारख्या बुद्धिमान्, कल्पक आणि रसिक लेखकाचें सहकार्य मला सतत ९ वर्षें लाभलें. संपादन हा अनेक अर्थांनीं माझ्या आयुष्यांतला अपघात! पण श्री. किणीकरांच्या सहकार्यामुळें मला तो सुसह्य झाला. सहाजिकच हें सिंहावलोकन करतांना मला प्रथम त्यांची आठवण होते.

'दीपावली' हें मराठींतलें पहिलें वार्षिक. ज्या काळांत तें सुरू झालें, तेव्हां दिवाळी अंक ही साप्ताहिक आणि मासिकांची मिरासदारी होती. लेखकांचें प्रेम आणि वाचकांचा आश्रय मिळवायचा, व्यावसायिक दृष्ट्या यशस्वी व्हायचें, तर सतत सर्वांसमोर असलें पाहिजे हा नियतकालिकांच्या सृष्टींतील अलिखित नियम होता. वर्षाची कालमर्यादा हा त्या नियमाचा एकप्रकारें भंग होता. रूढ संकेत डावलूनच 'दीपावली' ला आपला प्रपंच थाटावयाचा होता. पण हा प्रपंच 'नेटका' झाला आहे हें सांगण्यास आनंद वाटतो. वार्षिकांची प्रथा आतां सर्रास रूढ झालेली दिसते. किंबहुना दरमहा अंक प्रसिद्ध करण्यापेक्षां वर्षांतून एकदांच अंक काढावा, अशीहि कुजबूज नियतकालिकांच्या सृष्टींतून वारंवार ऐकूं येऊं लागली आहे!

गेलीं ४ वर्षें 'दीपावली' हिंदी भाषेंतहि प्रसिद्ध होऊं लागली आहे. मराठींतील साहित्य आणि कला यांचा परिचय अखिल भारतीयांना व्हावा या हेतूनेंच 'दीपावली' हिंदींत अवतरली. अर्थात् 'हिंदी दीपावली' ही केवळ मराठीची हिंदी आवृत्ति नाहीं. भारतांतील ख्यातनाम साहित्यिकांचें लेखनहि त्यांतून प्रतिवर्षी प्रसिद्ध होत असतें. त्या भाषेंतहि 'दीपावली' ची लोकप्रियता वाढती आहे. 'दीपावली' सारखे आणखीहि प्रयत्न मराठींतून होतील याविषयीं मला शंका नाहीं.

साहित्य हा माझा प्रांत नव्हे. पण चित्रकला हा माझा प्रांत आहे असें म्हटलें तर माझ्यावर अहंमन्यतेचा आरोप कुणी करणार नाहीं असें वाटतें. अंकाची सजावट आकर्षक व्हावी आणि एक वा बहुरंगी चित्रकृती शक्य तेवढ्या उत्कृष्टप्रकारें वाचकांच्या दृष्टीपुढें ठेवाव्यात यासाठीं 'दीपावली'नें सुरुवातीपासूनच अत्यंत कटाक्ष ठेवला आहे. 'दीपावली'च्या आधीं रंगीत चित्रकृती देण्याची पद्धत नव्हती असें मला सुचवायचें नाहीं. पण चित्रांची संख्या, चित्रांना सूत्रबद्ध करणारी विषयांची योजना आणि चित्रकाराचा हेतु सफल होईल इतकी आकर्षक छपाई यासाठीं फारसे परिश्रम घेण्याची प्रथा मराठी नियतकालिकांत नव्हती. 'दीपावली'नें याकडे विशेष लक्ष पुरवलें. चित्रें काढण्याच्या पद्धतीपासून तों तों छापण्याच्या पद्धतीपर्यंत सर्व क्षेत्रांत 'दीपावली' नेहमींच प्रयोगशील राहिली; कित्येक बाबतींत आघाडीवरहि राहिली. मराठी नियतकालिकांनीं न चोखाळलेले कित्येक मार्ग 'दीपावली'नें वाचकांच्या निदर्शनास आणून दिले. 'वूड कट्स्' 'लिनोकट्स्' 'इचिंग' या पद्धती 'दीपावली'नें कित्येक वर्षांपूर्वी हाताळल्या. नेहमींची तिरंगी छपाईची पद्धति मूळ चित्रकृतींतला गोडवा पुरेसा उतरूं शकत नाहीं हें दृष्टोत्पत्तीस येतांच 'ऑफ्सेट' छपाईचा मार्ग 'दीपावली'नें प्रथम अंगिकारला. गतवर्षीच्या 'ग्रावूर' पद्धतीच्या 'काश्मीर–रेखाचित्रां'चा

अनुक्रमणिका







उल्लेख याच संदर्भात करतां येईल; आणि यावर्षींच्या 'लाल्न त्रैगगीग' या चित्रकथेकडेहि याच संदर्भात वाचकांचें लक्ष वेधावें असें वाटतें. हे निरनिराळे प्रयोग करतांना 'दीपावली' नें कधीं व्यवहार पाहिला नाहीं. गतवर्षी नवचित्रकार आणि नवचित्रकला यांचा परिचय करून देण्याचा प्रयत्न 'दीपावली'नें केला होता; हा त्यापैकींच एक प्रयोग होता. 'दीपावली'नें केलेले हे व असे अनेक प्रयोग वाचकांच्या पसंतीस उतरले आहेत; मराठी नियतकालिकांत ते सर्रास रूढहि झालेले आहेत. हें पाहिलें म्हणजे 'दीपावली'च्या प्रयत्नांचें सार्थक झाल्यासारखें वाटतें.

अर्थात् हा सारा कार्यभाग एकहातीं होणारा नाहीं! 'दीपावली'च्या विविध प्रयोगांना छपाईच्या विविध क्षेत्रांतील अनेक व्यक्तींनीं आणि संस्थांनीं आपुलकीनें हातभार लावला आहे. त्यांच्या सहकार्याविना हे वेगवेगळे प्रयोग करण्याचें धाडस 'दीपावली'ला झालें नसतें. 'थॅांबे फाइन आर्ट्स्'चे श्री. रामनाथ मदन यांनीं सहकार्यासाठीं हात पुढें केला नसता, तर 'ऑफ्सेट' छपाईच्या क्षेत्रांत 'दीपावली'चें पाऊल पडतें ना! गतवर्षीपासून नागपूरचे श्री. धनवटे बंधू पुढें आले आणि त्यांच्या 'शिवराज फाइन आर्ट लिथो वर्क्स'नें आणि 'सिद्ध लिथो वर्क्स'नें या छपाईची जबाबदारी अधिक यशस्वी रीतीनें स्वीकारली आहे. 'थॅांबे प्रोसेस स्टुडिओ'चे श्री. कामत आणि 'प्रभात प्रोसेस स्टुडिओ'चे श्री. कदम यांनीं आरंभापासूनच ब्लॉक्स करण्याचा वांटा उचलला आहे. आणि आंतील छपाईच्या उत्कृष्टपणाचें श्रेय 'मौज प्रिंटिंग ब्यूरो'चे श्री. भागवत बंधू आणि त्यांच्या मुद्रणालयांतील कुशल कामगार-वर्ग यांच्याकडे जातें. ही सर्व मंडळी घरच्या अगत्यानें 'दीपावली'चें काम करीत असतात.

हें झालें 'दृश्य' बाजूसंबंधीं. साहित्याच्या क्षेत्रांतहि 'दीपावली'चें पाऊल मागें राहिलेलें नाहीं. 'दीपावली'च्या लोकप्रियतेंत साहित्याचा वांटा मोठा आहे. आजवर कितीतरी नव्या-जुन्या, ललित्—अ-ललित, प्रसिद्ध—अप्रसिद्ध लेखकांनीं आणि कवींनीं आपलें निवडक लेखन पदरांत टाकून 'दीपावली'ला उपकृत केलें आहे. या सर्वांचा नामनिर्देश स्थलसंकोचास्तव करतां येत नाहीं. पण कांहीं व्यक्तींचें सहकार्य इतकें दीर्घकालीन आणि इतकें भरीव आहे कीं, त्यांचा उल्लेख केल्याशिवाय पुढें पाऊल टाकतां येत नाहीं.

प्रथम डोळ्यापुढें येतात श्री. पु. भा. भावे. 'दीपावली' च्या बारा वर्षांत ११ वेळां त्यांची हजेरी लागली आहे; आणि एका वर्षी २ गोष्टी देऊन त्यांनीं चुकवलेल्या वर्षाचीहि कसर काढली आहे! 'दीपावली' च्या आधीं श्री. भावे लघुकथा लिहीत असत; पण कथालेखक म्हणून ओळखले मात्र जात नसत. 'आदेश' कार भावे म्हणूनच ते वाचकांच्या विशेष ओळखीचे होते. त्यांच्या कथालेखनाला बहर यायला आणि 'दीपावली' प्रसिद्ध व्हायला एक गांठ पडली! 'सीमेवर' आणि 'सतरावें वर्ष' या त्यांच्या पहिल्या दोन वर्षांतल्या गोष्टी विलक्षण गाजल्या; आणि श्री. भावे यांचें कथालेखकांच्या प्रभावळींतलें आघाडीवरचें स्थान निश्चित झालें. 'मॅदाम पिशी' ही त्यांची पहिली दीर्घकथा आणि 'अकुलिना' ही पहिली कादंबरी 'दीपावली' तून प्रसिद्ध झाली होती. किंबहुना दिवाळी अंकांतून दीर्घकथा किंवा कादंबरी प्रसिद्ध करण्याची सध्यां लोकप्रिय झालेली पद्धत श्री. भावे यांच्या सहकार्यानें 'दीपावली' नें प्रथम सुरू केली—अर्थात् अलिकडल्या काळांत!

श्री. वि. स. खांडेकर यांनींहि 'दीपावली' वर अकृत्रिम लोभ ठेवला आहे. श्री. स. आ. जोगळेकर यांच्या 'गाथासप्तशती' चा आरंभ 'दीपावली' च्या प्रथम अंकांतून झाला; आणि तीन वर्षांपूर्वी गाजलेल्या त्यांच्या 'शृंगारनायिका' आतां पुस्तकरूपानेंहि प्रसिद्ध झाल्या आहेत. प्रा. मं. वि. राजाध्यक्ष, पु. ल. देशपांडे, ग. रा. कामत प्रभृति लेखक-मंडळी 'दीपावली' चें काम हें आपलेंच काम आहे अशा अगत्यानें करीत असतात. गतवर्षीचें 'महाराष्ट्र देश सुंदरा' आणि प्रस्तुत अंकांतील 'देश मराठी, लोक मराठी, मराठीच भाषा...' ह्या ललित लेखमाला त्यांच्या सहकार्यामुळेंच होऊं शकल्या.

जाहिरात आणि विक्री या व्यवसायाच्या दोन महत्त्वाच्या बाजू. 'टॉम अँड बे'चे श्री. ग. वि. तांबे यांनीं अत्यंत परिश्रमानें जाहिरातींच्या जगांत 'दीपावली'ला मानाचें स्थान मिळवून दिलें आहे. महाराष्ट्रांतील प्रमुख कारखानदार आणि संस्था यांनीं 'दीपावली'ला सुरुवातीपासूनच आश्रय दिलेला आहे. मुंबईतील ख्यातनाम विक्रेते श्री. बाबुराव बागवे हे तर 'दीपावली'चे आरंभापासूनचे पाठीराखे! संपादक आणि वाचक यांची मध्यस्थी त्यांनीं अत्यंत निष्ठेनें केली आहे.

श्री. रा. ज. देशमुख हे 'दीपावली'चे आरंभापासूनचे हितचिंतक, आणि श्री. श्री. स. दाभोळकर हे सहकारी आहेत. कोणतीहि जबाबदारी त्यांच्या अंगावर टाकतांना 'दीपावली'ला कधीं संकोच वाटला नाहीं; आणि ती स्वीकारतांना त्यांनाहि! श्री. विजय तेंडुलकर यांनीं गेलीं २ वर्षें 'दीपावली'च्या संपादनामध्यें सहकार्य केलें होतें; आणि श्री. विजय पानसरे यांनीं 'हिंदी दीपावली'च्या संपादनाचा अवजड बोजा आपल्या शिरावर घेतला आहे; आणि तोहि यशस्वीरीतीनें! श्री. म. मु. देसाई आणि चित्रकार परब हे तर माझे स्टुडिओंतलेच सहकारी. इतक्या परीनें त्यांचें सहकार्य होतें कीं, त्यांचा निर्देश तरी कोणकोणत्या बाबतींत करावा!

या कांहीं ठळक व्यक्ती. 'दीपावली'च्या बारा वर्षांच्या वाटचालींत किती अगणित संस्थांनीं आणि व्यक्तींनीं सहकार्य केलें आहे! त्या सर्वांचा नामनिर्देश करण्याचा मोह होतो; पण स्थलाभावीं तो आवरला पाहिजे. या सर्व उपरिनिर्दिष्ट आणि अनामिक, व्यक्ती आणि संस्थांचा मी ऋणी आहे. या सहकाऱ्यांचा विसर 'दीपावली'ला पडणार नाहीं.

'दीपावली'च्या यशांतील सर्वांत अखेरचा, पण सर्वांत मोठा वांटा वाचकांचा. सुरुवातीपासून त्यांनीं 'दीपावली'चें स्वागत इतक्या उत्साहानें केलें नसतें, तर 'दीपावली'ला इतकी वाटचाल करतांच आली नसती! या अनोळखी वाटेवरलें माझें पाऊल अजून मनाजोगतें रुळलेलें नाहीं. 'दीपावली' बंद करून टाकण्याचा त्रस्त आणि विरक्त विचारहि अनेकदां मनांत येतो! पण ज्ञात आणि अज्ञात वाचकांना 'दीपावली' विषयीं वाटणारी आस्था पाहिली, म्हणजे माझा हा त्रागा, ही विरक्ति कुठल्या कुठें पळून जाते आणि नव्या उत्साहानें मी कामाला लागतों; वाचकांना आवडतील असेच, पण कलात्मक आणि सदभिरुचिसंपन्न असे नवनवीन प्रयोग करण्याचा प्रयत्न करूं लागतों.

'दीपावली'चा आजवरचा प्रवास सुखाचा झाला याचा मला संतोष वाटतो; सर्वांचें सहकार्य असेंच लाभत राहिलें तर पुढला प्रवासहि सुखाचा होईल याविषयीं मला खात्री वाटते.

'दीपावली'चे लेखक आणि मुद्रक, जाहिरातदार आणि हितचिंतक, विक्रेते आणि वाचक, या सर्वांना ही दीपावली आणि येतें वर्ष सुखसमृद्धीचें जावो, ही प्रार्थना!

—*दीनानाथ दलाल*












॥ श्रीवासुदेवानंदसरस्वती चरित्रम् ॥

आदौ रूपमरूप ते गुणगणेशान्मानवं स्वीकृतं ।
वर्णाद्याश्रमधर्मधारणमथो श्रीदत्तदेवेद् गुरो ॥
तत्संस्थापनतीर्थपादवपुयुक् तुर्ये कवीट् स्वार्तिहन् ।
वन्दे ते गुरुवासुदेव यतिराट्सेव्यांघ्रिकंजं परम् ॥









अनुक्रमणिका



# गंधर्वनगरींच्या अप्सरा

*विश्वविख्यात कलासमीक्षक डॉ. आनंदकुमार स्वामी असं म्हणतात कीं,—अप्सरा नसल्या तर स्वर्गातलं सौंदर्य कधींच फुलणार नाहीं; पुराणं आणि महाभारतासारखे ग्रंथ नीरस आणि शुष्क होतील !*

मनुष्येतर सृष्टीविषयींच नव्हे तर दृश्य विश्वाबाहेरीलहि संभवनीय सृष्टीविषयीं माणसाला फार मोठं आकर्षण प्राचीन काळापासून वाटत आलं आहे. कल्पनेच्या तारांनीं तसल्या सृष्टींतील कांहीं शक्तींना पकडण्याचा त्यानें अनेकवेळां प्रयत्न केला आहे. यक्ष, किन्नर, सिद्ध, गंधर्व आणि अप्सरा इत्यादींविषयींच्या मनुष्याच्या कल्पना मोठ्या मनोरंजक आहेत. त्यांतहि अप्सरांची गोष्ट कांहीं वेगळीच. त्यांच्याशिवाय वाङ्मयाची कथाच अप्सरांविना नीरस ठरायची ! जगांतील कुठल्याहि देशांतील वाङ्मय पाहिल्यास अप्सरांची व आपली भेट झाल्याखेरीज राहावयाची नाहीं. पाश्चात्यांची Nymphs ची कल्पना ग्रीक कालापासून परिचित आहे. Fairies व Fairyland विषयींचें आकर्षण त्यांना अजूनहि आहे. मुसलमान संस्कृतीला सेवेसाठीं हजर राहणाऱ्या हौरींची माहिती आहे, ज्यांना फारशींत हूर आणि अरबींत हवर म्हणतात ! काळेभोर डोळे असलेल्या या सुंदरी आणि Nymphs याची कल्पना भारतीय अप्सरांच्या कल्पनेशीं मिळती जुळती आहे.

भारतीय वाङ्मयांत अप्सरांचा उल्लेख फार प्राचीन काळापासून केला जातो. ऋग्वेद हा भारतीयांचा प्राचीनतम ज्ञात ग्रंथ. त्यामध्यें अप्सरांचा उल्लेख पांच वेळां आढळतो. 'जारापुढें हंसतमुख येणारी' असा अप्सरेविषयींचा उल्लेख ऋग्वेदांत केला आहे. परंतु अप्सरा या गन्धर्वांशीं जास्त संबंधित आहेत, किंबहुना त्यांचा उल्लेख गन्धर्वस्त्रिया म्हणूनच केला जातो. विश्वावसु नांवाच्या गन्धर्वांशीं अप्सरांचा संबंध ऋग्वेद सांगतो. व त्याचसह विद्युत्, पाऊस इत्यादींशींहि. ऋग्वेदावरील भाष्यांत सायणाचार्यांनीं अप्सरा शब्दाची व्युत्पत्ति दिली ती जलांत संचार करणाऱ्या [illegible] अशी.

ऋग्वेदानंतरच्या यजुर्वेदांत मात्र अप्सरांविषयीं माहिती मिळत नाहीं. त्यानंतरच्या अथर्ववेदांत मात्र अप्सरांची कल्पना विस्तार पावलेली दिसते. नृत्य, गायन आणि स्वैर विहार करणाऱ्या या गंधर्वांगना आपल्या कामविकारांनीं लोकांना मोहित करतात. त्यांना झोंपाळ्यावर बसणें आवडतें. नदीकांठीं विहार करणें, पक्ष्यांचीं रूपें धारण करून आनंद उपभोगणें त्यांना मनापासून आवडतें. कुत्रीं पाळणंहि त्यांना आवडतं. आपल्या लीलांनीं माणसांना भुलवावं नि त्यांना फसवावं ही त्यांची करमणूक आहे. द्यूतामध्यें त्या रमतात, द्यूतकारांना त्या रमवितात, कधीं त्यांचं भाग्य अप्सरांच्या जादुगिरीनें फळफळतं तर कधीं ते फशीं पडतात. कधीं कधीं न्यग्रोध, प्लक्ष, अश्वत्थ व औदुंबर वृक्षांवर त्या राहतील, त्यांवर वीणेच्या तारा छेडतील तर कधीं झाजांचा ताल धरतील. म्हणूनच या झाडांजवळून लग्नाची वरात जाऊं लागली कीं त्यांवरील अप्सरांनीं वधूवरांचं मंगल करावं ही प्रार्थना केली जाते. ऋग्वेदानंतरच्या वैदिक वाङ्मयांत अप्सरांचं असं वर्णन आढळतं : उग्रजित्, उग्रम्पश्या, राष्ट्रभृत् व उर्वशी ही वैदिक वाङ्मयांत आढळणारीं अप्सरांचीं नांवं. यांपैकीं उर्वशी व पुरूरवा यांची कथा सर्वविश्रुत आहे.

महाभारतांत व पुराणकालींहि अप्सरांचे उल्लेख आहेत. परंतु यावेळीं त्यांच्या व्यक्तित्वांत झालेला फरक केवळ इतकाच कीं त्या इन्द्राच्या दरबारांत नर्तिका म्हणून राहतात. कधीं काळीं कुणी मानवानें तप आरंभिलें तर त्याच्या तपोभंगासाठीं इंद्र आपलं हें 'सुकुमार प्रहरण' पाठवितो. रूपगर्विता श्रीचा नक्षा उतरविणाऱ्या या अप्सरा इन्द्रकार्य पार पाडतातच. विश्वामित्र व मेनका यांची कथाहि सर्वांना परिचित आहे. कधीं कधीं दैत्यवध करण्यासाठींहि अप्सरांचं मोहनास्त्र इन्द्राच्या उपयोगीं पडतं. सुंदोपसुंदांचा इन्द्रानें नाश केला तो तिलोत्तमेकरवीं.

अप्सरांच्या उत्पत्तीविषयीं मात्र या काळांत एकमत नाहीं. महाभारतांत काश्यप ऋषि आणि त्यांची पत्नी प्रधा यांच्या पोटीं अप्सरा जन्मल्या असा उल्लेख आहे; तर देवदानवांनीं समुद्रमंथन केलें असता रंभादि देवांगना समुद्रांतून उत्पन्न झाल्या अशी पुराण-कल्पना आहे. पुराणानंतरच्या अगदीं अलिकडच्या काळांत बाणभट्टानें कादंबरींत अप्सरांच्या चवदा कुळांचा



अनुक्रमणिका

उल्लेख केलेला आहे चंद्र, वायु आदि इतर चवदा नांवं त्यानें दिलीं आहेत. महाश्वेता ही त्यांपैकींच एका कुळांतील.

पुराणांमध्यें अप्सरांविषयीं वेगवेगळ्या कथा आढळतात. पण त्या सर्वांत साधारणपणें आढळणारी गोष्ट ही कीं नद्या, (विशेषतः गंगा) तळीं व जलाशयांशीं त्यांचा संबंध निगडित आहे. अर्जुनानें शापमुक्त केलेल्या मगरींची कथाहि अप्सरांचीच.

अप्सरांचीं दहा दैविक कुळं आणि चवतीस लौकिक कुळं मानलीं जातात. पण अप्सरा लौकिक वा दैविक असल्या तरी त्यांची मोहिनी सगळ्यांनाच सारखी. शंकरासारखा देवहि 'कुंडाची' नांवाच्या अप्सरेचं रूप पाहून इतका वेडावला, लोभावला कीं चारहि दिशांना ती दिसावी म्हणून त्यानें स्वतःला चार मुखें उत्पन्न केलीं. पार्वतीनें रागावून त्याचे डोळे झांकले म्हणून स्वतःला त्यानें तिसरा डोळा उत्पन्न करून घेतला. पार्वतीच्या शापानें विरूप झालेली कुंडाची अप्सराकुंडांत स्नान करून शापमुक्त झाली. भारद्वाज मुनि 'घृताची'च्या दर्शनानें स्खलित झाला व द्रोणाचार्यांचा जन्म झाला.

अप्सरांचीं नांवंहि पाहिलीं तरी तीं त्यांच्या सौंदर्याचीं निदर्शक आहेत. दीपावली वार्षिकाच्या या अंकांत संकलित केलेल्या अप्सरांचा परिचय पुढीलप्रमाणें आहे :

**विश्वमोहिनी मेनका** : विश्वामित्र राजानें घोर तपश्चर्या सुरूं केल्यावर भयभीत झालेल्या इंद्रानें मेनकेला त्याच्या तपोभंगासाठीं पाठविलें. आपल्या लीलांनीं मेनकेनें विश्वामित्राचं मन विचलित केलं. विश्वामित्र व मेनका बराच काळ एकत्र रमलीं, शकुंतलेचा जन्म झाला आणि नंतर लज्जित झालेल्या विश्वामित्रानें मेनकेचा त्याग केला. तीहि शकुंतलेला टाकून देऊन स्वर्गांत परत गेली.

**हिरण्मयी तिलोत्तमा** : शुंभ–निशुंभ (हेच पुढें सुंद व उपसुंद म्हणून जन्मले) या दोन दैत्यांनीं त्रैलोक्याला सळो कीं पळो करून सोडल्यावर त्यांच्या नाशासाठीं देवांनीं उपयोजिलेलें अत्यंत नाजुक आणि अद्वितीय शस्त्र म्हणजे तिलोत्तमा. विधात्यानें हिची मूर्ति निर्माण करण्यासाठीं सर्व रत्नांतील तिळतिळ भाग घेतला होता. म्हणून तिचं तिलोत्तमा नांव ठेवलं. शुंभ–निशुंभांकडे ती आली आणि पूर्वी एकोप्यानें वागणाऱ्या त्या दैत्यांचं 'ती कुणाची' या प्रश्नावर भांडण जुंपलं व दोघांनीं एकमेकांचा नाश केला.

**असितश्वेताम्बरी महाश्वेता** : अप्सरांच्या कुळामध्यें जन्मलेल्या महाश्वेतेची आणि लक्ष्मीपुत्र पुंडरीकाची एका अरण्यांत अच्छोद नांवाच्या सरोवराजवळ गांठ पडली. पुंडरीकाजवळ असलेल्या पारिजातमंजरीच्या गंधानें मोहित झालेल्या महाश्वेतेला कुतूहल उत्पन्न झालें. तिनें त्या मंजरीविषयीं पृच्छा करतांच पुंडरीकानें आपली कुसुममाला तिला अर्पण केली. त्याच क्षणीं दोघांच्याहि मनांत प्रेम उद्भवलें. महाश्वेता आपल्या प्रासादांत परतली. पुंडरीकाला मात्र मदनदाह असह्य झाला. चंद्रकिरणांनीं तर तो अधिकच वाढला. चंद्राला 'जन्मोजन्मीं तुला प्रियेचा विरह होवो' असा शाप देऊन पुंडरीक मृत्युवश झाला. याचवेळीं महाश्वेता पुंडरीकाच्या भेटीसाठीं येते. तिला अनिवार दुःख होतें. चंद्रमंडळांतून अवतीर्ण झालेल्या तेजःपुंज पुरुषानें 'तुझा पति तुला लाभेल' असं आश्वासन दिल्यामुळें ती प्राणत्याग करीत नाहीं. परंतु अच्छोद सरोवरावरील शिवाची आराधना करीत राहते.

कालांतरानें तिचें व पुंडरीकाचें मीलन होतें.

**इंद्रायणी रंभा** : सौंदर्याचं वर्णन करतांना उपमान म्हणून रंभेचा उल्लेख करतात. पण विश्वामित्र आणि शुक या दोन महर्षींवर हिच्या सौंदर्याचा कांहींच प्रभाव चालला नाहीं. रावणाचा पुत्र नलकूबर याची ही पत्नी. रावणानें तिला बलात्कारानें भ्रष्ट केली.

परंतु रंभेचं खरं स्थान इंद्राच्या सभेंत देवांचं मनोरंजन करण्याचं. देवदानवांनीं अमृत मिळविण्यासाठीं समुद्रमंथन केलें, तेव्हां समुद्रांतून ती व इतर अप्सरा आल्या. इंद्रानें हिच्यासह त्यांची याचना केल्यावर रंभेनें इंद्राकडे जायचें मान्य केलें.

**प्रमद्वरा उर्वशी** : उर्वशीचा जन्म खऱ्याखुऱ्या अर्थानें मानवांपासून झाला आहे. नरनारायण ऋषींना मोहित करण्यासाठीं आलेल्या अप्सरांचा परिहार करण्यासाठीं त्यांनीं आंबेमोहरांतून उर्वशीला साकार केलें. तिच्या सौंदर्यामुळें अप्सरांचा रूपमद ओसरला व त्या परतून गेल्या.

इंद्राला साहाय्य करणाऱ्या पुरुरव्याच्या कानांवर उर्वशीच्या सखीची हांक पडली. त्यानें उर्वशीची मुक्तता केली. पुरुरव्याचं दर्शन होतांच उर्वशी त्याच्यावर लोभावली. पुरुरवाहि अनुरक्त झाला. पुरुरव्याबरोबर उर्वशी पृथ्वीवर राहावयास आली. पण तिच्या प्रेमांत एक अट होती. शय्येविना इतर कुठेंहि पुरुरवा नग्न स्थितींत तिच्या दृष्टीस पडूं नये. उर्वशीच्या विरहानें व्याकुळ झालेल्या गंधर्वांनीं रात्रींच्या वेळीं उर्वशीचे आवडते मेंढे पळविले तेव्हां त्यांची सुटका करण्यासाठीं नग्न अवस्थेंतच पुरुरवा त्यांच्यामागें धांवला. त्याच वेळीं कपटी गंधर्वांनीं विजेचा प्रकाश पाडला व पुरुरवा उर्वशीच्या दृष्टीस पडला. उर्वशीची अट मोडली. पुरुरवा तिची विनवणी करीत असतांहि उर्वशी त्याचा त्याग करून इंद्रलोकीं निघून गेली.

**गंधर्वशील चित्रलेखा** : चित्रलेखा उर्वशीची प्रियसखी. चित्रलेखा व सहजन्या या आपल्या सख्यांसह सूर्याची उपासना करण्यासाठीं गेलेली उर्वशी स्वतःच्या मंदिराकडे जात असतांना केशी नांवाच्या दैत्यानें उर्वशीचें अपहरण करण्याचा प्रयत्न केला. 'देवांचा पक्षपाती किंवा नभ संचार करूं शकणारा कुणीतरी हिचें रक्षण करो' असा चित्रलेखेनें टाहो फोडला.

चित्रलेखेनें प्रसंगावधान दाखवून सहाय्यासाठीं टाहो फोडला म्हणूनच तर उर्वशीचें संरक्षण होऊं शकलें.



**मनीषा**

**कशास इहलोक हा जरि न सुंदरी सन्मुख ?**
**कशास परलोक वा जरि न अप्सरांचें मुख ?**
**तदर्थ नच वाचला, नच तदर्थही वेंचला**
**तयांस जगुनी जनीं इह परत्र आंचावला !**

**—कै. बोबडे**




# मावळती चंद्रकोर

—वि. स. खांडेकर

*आई'ची आठवण म्हणून कुंकवाऐवजीं चंद्रकोर लावीत असे ती. पण नंतर तिचा मुलगा तिला विचारूं लागला—*

: १ :

सुमित्राला मीं पहिल्यांदा पाहिली ती अशीच ! पाठमोरी. ताठ, उंच, शिडशिडीत. तिची उभी राहण्याची ढब एखाद्या निशाणाच्या काठीसारखी वाटे.

आठ वर्षे झालीं त्या गोष्टीला ! हो, बरोबर आठच ! आपल्या लग्नाचें वर्ष कुणी विसरतें कां ? त्याच वर्षीच्या मार्गशीर्षांत मी डॉक्टरीण नाहीं का झालें ? मेडिकल कॉलेजांत पाऊलसुद्धां न टाकतां ! हळुंच बोहल्यावर चढून !

पण सुमित्राला मीं पाहिलें तेव्हां कांहीं मी डॉक्टरीण झालें नव्हतें ! मी होतें मास्तरीण. होतें म्हणजे काय ? त्याच दिवशीं मी मास्तरीण झालें होतें. लग्न होईपर्यंत उगीच रिकामें बसून काय करायचें, म्हणून बाबांनीं एका मुलींच्या शाळेंत अर्ज करायला सांगितला मला ! मीं तो केला. बी. ए. ला म..ठी..ऑनर्स घेतले होते. त्याचा उपयोग झाला. शाळेनें तात्पुरती नेमणूक केली माझी.

त्या दिवशीं मी शाळेंत गेलें ती जीव मुठींत घेऊनच ! कोणकोणते विषय आपल्याला शिकवावे लागणार आहेत, ते आपल्याला चांगले शिकवितां येतील कीं आपली फजिती होईल, या विवंचनेनें मी अगदीं गांगरून गेलें होतें मास्तरीण म्हणून शाळेंत जाण्यापेक्षां विद्यार्थिनी म्हणून परीक्षेच्या मंडपांत जाणें बरें असें राहून राहून मनांत येत होतें. मधेंच एकदां वाटलें, असेंच घरीं परतावें नि कांहीं तरी सबब सांगून—

पण तें शक्य नव्हतें ! बोहल्यावर चढून तिथून पळून जायला रामदासाचें धैर्य अंगीं असावें लागतें !

माझी मालगाडी कशी बशी स्टेशनावर पोंचली. एका प्रौढ शिक्षकीणबाईंनीं मला मुख्य अध्यापिकेच्या खोलीकडे नेलें. त्या खोलीच्या दाराशीं मला सोडून त्या परतल्या. हेडमास्तरीणबाई कडक असाव्यात हें मीं ताडलें. मीं मनांत अधिकच घाबरलें. पण करायचें काय ? व्यासपीठावर बोलायला चढल्यावर कुणाला तिथून पोबारा करतां येतो का ?

मी धीर धरून दारांत उभी राहिलें. त्याच वेळीं सुमित्रा मला दिसली.

सुमित्रा कसली ? तिचें नांव कुठें ठाऊक होतें मला ? एक मुलगी मला दिसली. पाठमोरी, ताठ, उंच, शिडशिडीत !

**: २ :**

त्या मुलीनें पाठीवर दोन वेण्या सोडल्या होत्या. मोठे, काळे कुळकुळीत आणि लांबसडक केस होते तिचे. दोन्ही वेण्यांच्या टोकांना गुलाबी फिती तिनें मोठ्या चतुरतेनें बांधल्या होत्या. जणुं अर्धवट उमललेलीं गुलाबी फुलेंच तिथें गुंफलीं होतीं. कॉलेजांत वाचलेल्या कालिदासाची आठवण झाली मला एकदम. या वेण्या पाहून त्याला वाटलें असतें, हीं गुलाबाचीं फुलें पाहून या भुंग्यांच्या रांगा—छे ! चुकलेंच कीं ! भुंगे कमळांवर लुब्ध असतात, गुलाबांवर नाहीं.

तें कांहीं असो. कालिदास अगदीं वेळेवर माझ्या मदतीला धांवून आला.

मी भीत भीतच दारांत उभी राहिलें होतें. आतां ती भीति पार पळाली.

ती मुलगी टेबलापाशीं उभी होती. टेबलापलीकडच्या खुर्चीकडे मीं निरखून पाहिलें. एक स्थूल, प्रौढ, गिड्डया बाई त्या खुर्चीत बसल्या होत्या. त्यांचा भांग किती फाटला होता. आणि तो त्यांचा अंबाडा ! मोठा हेंगाडा दिसत होता तो ! मानेवर नारळाएवढें काळें आवाळूं यावें तसा !

हेडमास्तरीणबाई त्या मुलीला म्हणाल्या, 'सुमित्रा, काल तुमच्या वर्गात येऊन साऱ्या मुलींनीं एका प्रकारचं कुंकू लावलं पाहिजे असं मीं बजावलं होतं ना ?'

'होय बाई.'

'मग तूं आज ही चंद्रकोर कां लावलीस ?'

'ती मला आवडते म्हणून !'

'या सिनेमामुळं फार फाजील होत चाल्लांय् तुम्ही मुली. पडद्यावर कांहीं तरी पाहतां नि तें शाळेंत घेऊन येतां !'

'चित्रपटांत असलं कुंकू लावीत नाहीं कुणी बाई !'

'तें कसलंच्यावतात तें मला ठाऊक नाहीं. तूं माझी आज्ञा मोडली आहेस ना !'

'होय.'

'ती कां ?'

'हें कुंकू माझ्या चेहऱ्याला शोभून दिसतं म्हणून !'

'शोभून दिसतं ? कुणीं सांगितलं तुला ?'

'मीं ! मला काय शोभून दिसतं हें दुसरं कोण कसं सांगणार बाई ? तें माझं मलाच कळणार !'

तिच्या या उत्तरानें बाई स्तंभित झाल्या. त्या डोळे वटारून तिच्याकडे पाहूं लागल्या.

त्या मुलीचा चेहरा मी उभी होतें तिथून मला दिसणें शक्य नव्हतें. त्यामुळें चंद्रकोर तिच्या रूपाला शोभून दिसते की काय हें मी सांगूं शकत नव्हतें. पण लाह्या फुटाव्यात तशी तिनें हेड मास्तरीणबाईंना ताड् ताड् दिलेलीं उत्तरें ऐकून मी चकित झालें. ही मुलगी नुसती धीटच नाहीं तर उर्मटहि आहे असं मला वाटलें.

हेडमास्तरीणबाईंनीं हुकूम सोडला, 'ही चंद्रकोर पुसून टाक ! इतर मुलींसारखं कुंकू लाव ! तुम्ही मॅट्रिकच्या मुलींनीं खालच्या वर्गांतल्या मुलींना वळण लावायला हवं. शाळेंत शिस्त हवी. केस, कुंकू, पातळ, सारं कसं एका पद्धतीचं हवं; अगदीं सैन्यागणाचं हवं !'

समोरचीं दोन तीन जाड पुस्तकें घेऊन तीं परत टेबलावर आपटीत त्या म्हणाल्या, 'परदेशांत मुली किती शिस्तीनं वागतात तें या पुस्तकांत बघ ! बाकी तुला काय डोंबल कळणार आहे त्यांत ? लेट अस कम् टु दि पॉइंट; हं, तूं ही चंद्रकोर पुसून टाकणार कीं नाहीं ?'

सुमित्रेनें नकारार्थी मान हलविली.

बाई चिडून म्हणाल्या, 'मग मला तुला शिक्षा करायला हवी ! ऑर्डर इज् ऑर्डर ! तुझा अमला हट्ट मी चालूं देणार नाहीं. तो तूं सोडीपर्यंत दररोज दोन छड्या—' त्या खुर्चीवरून उठल्या. कोपऱ्यांतल्या कपाटाकडे गेल्या. त्याच्यावरली छडी काढीत त्या म्हणाल्या, 'छडीचा उपयोग शक्य तितका कमी करावा असं आमच्या शिक्षणशास्त्रांत आहे. पण तुझ्यासारखी खट्याळ मुलगी भेटली म्हणजे—'

सुमित्रेचा चेहरा मला दिसत नव्हता. पण आपला उजवा हात तिनें केव्हांच पुढें केला होता. कवायतींत करतात ना ? तसा ! तितक्याच तत्परतेनें !

पडद्यावरलें एखादें साहसाचें दृश्य पाहावें तशी पापणीला पापणी न लावतां मी सुमित्राच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहत उभी राहिलें.

सुमित्रेनें हातावर दोन छड्या घेतल्या आणि खोलींतून बाहेर जाण्याकरतां ती वळली. आतां कुठें तिचा चेहरा मला दिसला. काळा सांवळाच होता तो, पण मोठा बोलका आणि हंसरा. ही मुलगी खट्याळ असेल ? वांड असेल ? छे ! तिचा तो पराक्रम पाहत मी दारांत उभी होतें, हें अतिां तिच्या लक्षांत आलें असावें. माझ्या अंगावरून जातां जातां ती माझ्याकडे पाहून हंसली. मी तिच्याकडे पाहून हंसलें.

**: ३ :**

या हंसण्यामुळेंच कीं काय तिची माझी नकळत गट्टी जमली. वर्गांत ती माझ्या मदतीला धांवून आली.

त्या दिवशीं मला पहिला तास घ्यावा लागला तो तिच्याच वर्गावर ! मराठीचा तास होता तो. वामन पंडिताचें कुठलें तरी आख्यान चाललें होतें. पोरी जणुं कांहीं नव्या बाईंची परीक्षा घ्यायला टपून बसल्या होत्या. तें आख्यान शिकवितां शिकवितां घामाघूम होऊन गेलें मी ! बिचाऱ्या वामन पंडिताला तरी काय स्वप्न पडलें होतें की संस्कृतचें अगदीं बेताचें ज्ञान असणाऱ्या माझ्यासारख्या मुली मास्तरणी होऊन त्याची कविता शिकविणार आहेत म्हणून ? तें त्याला ठाऊक असतें तर त्यानें आपल्या कवितेंत इतके लठ्ठ लठ्ठ शब्द वापरले नसते, समासांच्या मालगाडीला मेलगाडीचें रूप दिलें असतें, यमकें थोडीं कमीं केलीं असतीं !

पण सुमित्रा मोठी वस्ताद होती. नव्या बाईंचें घोडें कुठें अडतंय् असें वाटलें कीं हळूंच त्याचा लगाम धरून त्याला ती नीट वाटेला लावी. मोठी बोलकी आणि बुद्धिमान् मुलगी होती ती ! ही मुलगी अवखळ आहे, खट्याळ आहे हें कांहीं केल्या माझ्या मनाला पटेना !

काळ्या खडकांत पाणी फार खोल मिळतें म्हणे ! पण तें जितकें खोल मिळतें, तितकेंच गोड असतें ! सुमित्रा तशी असेल का ?

तिच्याविषयीं मला मोठें कुतूहल वाटूं लागलें. मोठ्या बहिणीनें धाकट्या बहिणीच्या पोटांत शिरावें, तसें तिच्याशीं वागायचें मी ठरविलें.

अनुक्रमणिका




शाळा सुटल्यावर मी तिला सहज म्हटलें, 'सुमित्रा, माझ्याबरोबर येतेस जरा?'

'कुठं बाई?'

'आमच्या घरीं.'

'कांहीं काम आहे?'

'काम कसलं ग असायचं? घटकाभर गप्पा मारीत बसूं! अग, वर्गात मी तुझी मास्तरीण! पण वर्गाबाहेर मी तुझी मैत्रिणच आहें! नि हें बघ, मला चांगलंसं शिकवायला येत नसलं तरी चहा फक्कड करतां येतो हं! तेव्हां म्हटलं, आज आपल्या नव्या मैत्रिणीला चहा द्यावा—'

'आज नाहीं मी येत बाई!'

'कां ग?'

'दोन धाकटीं भावंडं आहेत मला. तीं शाळेंतून येतील आतां!'

तिच्या बोलण्याचा अर्थ उघड होता. पण मला अवधान राहिलें नाहीं. माझ्या तोंडून शब्द निघून गेले, 'म्हणजे तुझी आई—'लगेच मीं जीभ चावली.

'मला आई नाहीं बाई!' घरांत स्वैपाकीणबाई आहे, पण मी नसलें तर हीं भावंडं तिच्याशीं भांडत बसतात! मी रविवारीं येईन तुमच्याकडं, चालेल ना? मग बघूं तुम्ही फक्कड चहा करतां कीं मी करतें तें!'

: ४ :

सुमित्रा कबूल केल्याप्रमाणें रविवारीं माझ्याकडे आली. दहापंधरा मिनिटांत मोठ्या मोकळेपणानें माझ्याशीं बोलूं लागली ती. बोलतां बोलतां मी सहज तिला म्हणालें, 'सुमा, एक विचारूं तुला?'

'हं, पण एका अटीवर!'

'कुठल्या?'

'मी कांहीं तरी विचारीन मग तुम्हांला! त्याचं उत्तर तुम्ही द्यायला हवं! अगदीं स्पष्ट, अगदीं स्वच्छ!'

ती मला काय विचारणार आहे हें मला कळेना! मग हंसल्यासारखें करून मी पुढें बोलूं लागलें, 'तुझ्या या चंद्रकोरीच्या हट्टामुळं मोठ्या बाई नाखूष आहेत तुझ्यावर!'

'ठाऊक आहे तें मला!'

'त्यांच्यासाठीं तूं—'

ती क्षणभर थांबली. मग एकदम गंभीर झाली, आणि म्हणाली, 'अं हं.'

'कां?'

दुसरीकडे पहात ती म्हणाली, 'माझी आई चंद्रकोर लावीत असे बाई. मी सात आठ वर्षांची असतांना ती गेली. ती आजारी असतांना मी तिचे पाय दाबीत बसे. पण माझं सारं लक्ष तिच्या चेहऱ्याकडं असे. तिची आठवण व्हावी म्हणून मी असं कुंकू लावतेंय!'

मी चहा करायला उठलें तशी तीहि माझ्याबरोबर आंत आली. मीं स्टोव्ह पेटविल्यावर ती हंसत मला म्हणाली, 'तुमचा चहा चांगला झाला नाहीं तर मी पुन्हा चहा करीन हं!'

'बरं! नि माझा चहा चांगला झाला तर?'

'तर बक्षीस म्हणून तुम्हांला पुन्हा चहा करून देणार आहें मी!'

'मिळून काय? दोन वेळां चहा प्यायचा बेत आहे तुझा! ठीक आहे!'

दोघीहि पोटभर हंसलों. मी चहा करीत असतांना ती स्वतःशीं कांहीं तरी गुणगुणत होती. तिला कविता फार आवडत असाव्यात असें वाटलें. मधूनच माझ्या कानांवर ओळी आल्या—

'या कुंजांतुन त्या कुंजांतुन
इवल्याशा त्या दिवल्या लावुन'

मग थोड्या वेळानें एक ओळ ऐकूं आली—

'अजुनी जागी फुलराणी ही!'

या ओळी बालकवींच्या 'फुलराणी' या कवितेंतल्या आहेत हें आतां कुठें माझ्या लक्षांत आलें. थोड्या वेळानें ती गुणगुणूं लागली—

'कुणि कोडें माझें उकलिल का?'

चहा झाल्यावर आम्ही खूप खूप बोलत बसलों. अमुक एका विषयांत तिची गति नव्हती असें नाहीं. शाळेला हुतुतूची ढाल तिनें दोनदां मिळवून दिली होती. वडिलांच्या रागाची पर्वा न करतां वर्षभर ती एक गाण्याच्या वर्गाला गेली होती. कविता करायचा नाद होता तिला. कुठल्याशा संघांत का दलांत ती जात होतीच! स्वैंपाक, शिवणकाम, भरतकाम सारें सारें तिला आवडत होतें.

मी सहज तिला म्हटलें, 'सुमित्रा, तूं पुढं खूप खप शीक, आणि मोठी विदुषी हो. मग तुझा नि माझा एक फोटो आपण काढूं, तो छापवून आणूं. तो छापून आला कीं तुझी मास्तरीण म्हणून लोक मला मान देऊं लागतील!'

ती क्षणभर विचारमग्न होऊन म्हणाली, 'पुढं काय करायचं तेंच मला कळत नाहीं अजून! इतिहास वाचतांना मला झांशीची लक्ष्मीबाई जितकी आवडते तितकीच मस्तानी आवडते. दोघींवरहि कविता लिहाव्याशा वाटतात.'

मी किंचित् चमकलें. तिचा हात हातांत घेऊन मीं म्हटलें, 'तूं मला मघाशीं एक प्रश्न विचारणार होतीस ना?'

'हो.'

'विचार कीं तो!'

क्षणभर ती गंभीर झाली. मग एकदम हंसत म्हणाली, 'मी गणितांत नापास होतें ती उगीच नाहीं! मघाशीं तुम्हांला काय बरं विचारणार होतें मी! इश्श! कशी बाई आठवणच राहत नाहीं मला देव जाणे!'

ती न आठवण्याचें नाटक करीत आहे हें माझ्या लक्षांत आलें. पण तिची इच्छा नसतांना तिचें मन खणून तिला त्रास देणें बरें नव्हतें. मी गप्प बसलें.

संध्याकाळ झाली म्हणून ती घरीं जायला निघाली. जिन्याच्या वरच्या पायरीवर तिचा हात घट्ट घट्ट दाबून मीं तिला निरोप दिला. ती आठ दहा पायऱ्या भराभर उतरली. मग तिनें मागें वळून पाहिलें. माणसाची चाहूल लागली कीं झाडावरली खार मान मुरडून बघते ना? तसें. मग ती एकदम परत वळली, आणि लगबगीनें वर आली. मला वाटलें, हिचें कांहीं विसरलें असावें. 'काय ग राहिलं?' असें मी म्हणणार सुद्धां होतें; इतक्यांत ती माझ्यापाशीं आली आणि माझे दोन्ही हात हातांत घेऊन सद्गदित स्वरानें म्हणाली, 'बाई, तुम्ही मला विसरणार नाहीं ना?'

तिचा हा प्रश्न अगदीं अनपेक्षित होता. मला त्याचा अर्थच कळेना! मी म्हणालें, 'वेडे, अशी काय विलायतेला चालली आहेस तूं? उद्यां शाळेंत आपण भेटणार आहोंत कीं!'

विसरतात ! म्हणून म्हटलं तसं मी ! आई मला सांगून गेली कीं मी दररोज तुझ्या स्वप्नांत येत जाईन म्हणून. पण कधीं कधीं येत नाहीं ती ! बाबा मला फी, पुस्तकं, पातळं—सारं सारं देतात; पण मला मात्र उगीच्च वाटतं कीं ते आपल्याला विसरत चालले आहेत ! लहानपणींसारखे ते आतां माझ्याशीं बोलत नाहींत. एवढ्यातेवढ्यासाठीं उगीच्च रागावतात माझ्यावर !'

सुमित्रेचें समाधान कसें करायचें तें मला कळेना ! ही मुलगी खट्याळ आहे ? छे ! ही तर अतिशय हळवी आहे ! धाकट्या बहिणीला जवळ घ्यावें तसें मीं तिला माझ्याकडे ओढलें आणि तिचें मस्तक थोपटलें. ती हंसत म्हणाली, 'बाई, तुमचं लग्न कुणाशीं होणार सांगूं ?'

'सांग कीं ! तुला भविष्यसुद्धां सांगतां येतं हें नव्हतं मला ठाऊक !'

'डॉक्टराशीं !'

'कशावरून ?'

'तुमचा हातगुण फार चांगला आहे म्हणून !' लगेच धांवतच जिना उतरून ती निघून गेली.

: ५ :

पुढें चारच महिन्यांनीं माझें लग्न झालें. तें सरकारी नोकरींत असलेल्या एका डॉक्टरांशींच झालें. लग्न ठरलें त्या दिवशीं सुमित्रेची मला राहून राहून आठवण झाली. ती इकडे असती तर तिनें भंडावून सोडलें असतें, आपलें भविष्य खरें ठरल्याबद्दल पेढे मागून मला पुरें पुरें केलें असतें.

पण ती—

ती कुठें होती हें कुणालाच ठाऊक नव्हतें. तिच्या वडिलांना सुद्धां ! तिचें नांव शाळेंत कुणी काढीत नव्हतें. ती वाईट मुलगी ठरली होती ! कुणातरी मुलाबरोबर पळून गेली होती ती म्हणे ! एका गरीब, गाणाऱ्या मुलाबरोबर ती पळून गेली म्हणून तिचे वडील तिच्यावर रागावले होते. ऐन सामन्यांच्या वेळीं ती गेली, ती नसल्यामुळें हुतूतूची ढाल शाळेला मिळाली नाहीं, क्रमानें तीन वर्षे ढाल आपल्याकडे ठेवण्याचा विक्रम करणें शक्य असून या पोरीच्या पायीं तें घडूं शकलें नाहीं, म्हणून मोठ्या बाई तिच्यावर संतापल्या होत्या. तिच्या आळींतली सारी मंडळी तिच्या प्रेम-प्रकरणाची नाना प्रकारांनीं चर्चा करीत होती. कुणी वडिलांना दोष देत होते, कुणी मुलींच्या शिक्षणाच्या नांवानें खडे फोडीत होते, कुणी चित्रपटांमुळें तरुण मनावर होणाऱ्या परिणामांची समाजानें वेळेवर काळजी केली नाहीं, तर गीतेंत सांगितलेला वर्णसंकर लवकरच होईल म्हणून फिकिरींत पडले होते. मात्र सर्वांच्या मतें सुमित्रा अपराधी होती, गुन्हेगार होती !

हें सारें मी ऐकत होतें. ऐकून ऐकून कान किटण्याइतकें तें मी ऐकलें. तें ऐकून न ऐकल्यासारखी मी वागत होतें. मनोमन माझी एक खात्री होती—सुमित्रा ही वाईट मुलगी नाहीं. पण इतकी खात्री असलेलें माझें मन मधेंच दचकून म्हणे, या अल्लड हळव्या पोरीला कुणी फसविलें असलें तर ? चार दिवसांनीं तो तरुण तिला सोडून जाईल मग ही पोरगी काय करील ? समाजांत मान वर करून चालणेंसुद्धां सुमित्रेला कठिण



अनुक्रमणिका

होईल! दुर्दैवानें असें कांहीं झालें तर तें सोसण्याचें बळ तिच्यांत आहे का? ती पहिल्यांदा माझ्याकडे आली त्या दिवशीं मला जो प्रश्न विचारणार होती तो स्वतःच्या या प्रेमाविषयींचाच असेल का? तो तिनें विचारला असता तर? मीं काय उत्तर दिलें असतें त्याला?

जर—तर! काय उपयोग होता नुसत्या कल्पना करून आणि तर्क लढवून?

## : ६ :

माझं लग्न झालें. मी सासरीं गेलें. लवकरच बाबांचीहि बदली झाली. त्यामुळें सुमित्रेच्या गांवीं जावयाची संधीच पुढल्या दोन वर्षांत आली नाहीं.

माझ्या संसारांत रमून गेलें मी. डॉक्टरीणबाई म्हणून त्या त्या गांवांतल्या महिला मंडळांत पुढाकार घेऊं लागलें. दोनदां बक्षिस समारंभांत पुस्तकेंसुद्धां दिलीं मीं! अध्यक्षांची पत्नी म्हणून!

मला मुलगा झाला. पहिलें मूल, नि त्यांत मुलगा! सासरीं, माहेरीं किती कौतुक झालें. दिलीपच्या जन्मामुळें माझें एक नवें जग निर्माण झालें. त्या जगांत जिथें मला आईचा नि बाबांचा सुद्धां विसर पडूं लागला, तिथें सुमित्रेची कुठून आठवण होणार? मात्र चालतांना मखमली वहाणेंत रस्त्यावरला बारीक अणकुचीदार खडा शिरावा आणि नाजुक तळपायाला तो कचकन् बोंचावा, तशी तिची स्मृति क्वचित् मला बेचैन करी. कुणी चंद्रकोर लावलेली मुलगी नाहींतर बाई पाहिली कीं माझ्या डोळ्यांपुढें सुमित्रा उभी राही. कुणी उंच, शिडशिडीत, ताठ मान करून चाललेली मुलगी पाठमोरी दिसली कीं, ती सुमित्रा तर नव्हे ना, असें वाटून मी लगबगीनें पुढें जाई आणि तिच्या चेहऱ्याकडे पाहीं. विशीच्या आसपासची एखादी काळीसांवळी मुलगी पाहिली, कुणा तरुण पोरीचा हंसरा, बोलका चेहरा सहज बघितला, तरी माझ्या पोटांत उगीचच कालवाकालव होई. मन हुरहुरे, हुरहुरे आणि म्हणे, 'या वेळीं कुठं बरं असेल सुमित्रा?'

आणि मग माझ्या कल्पनाचक्षूंपुढें एक अति भीषण दृश्य दिसूं लागे. अपार, अफाट समुद्र! क्षितिजाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत पसरलेला! त्याच्यावर उडणाऱ्या त्या डोंगरासारख्या प्रचंड लाटा! लाटा कसल्या? उंच उंच हलत्या भिंतीच म्हणायच्या! अगदीं जवळच्या दोन लाटांच्या आड दोन माणसें तरंगत असलीं, तरी तीं कांहीं एकमेकांना दिसायचीं नाहींत! क्षणोक्षणीं परस्परांवर आपटून पळापळाला होत असलेला त्या लाटांचा चुराडा आणि कुठल्या तरी अज्ञात भाषेंत चाललेला त्यांचा तो अखंड आक्रोश! जिकडे पाहावें तिकडे पाणी! खोल खोल पाणी! जीव घेणारें पाणी!

माझ्या मनांत येई, जीवन असेंच आहे का? भयंकर समुद्रांत मी कुठें तरी वाहत आहें! हातपाय थकले तरी मला होडीचा आधार आहे. तिकडची स्वारी आहे, माझा छोटा दिलीप आहे, आई आहे, बाबा आहेत. पण या च अफाट समुद्रांत सुमित्रा कुठें तरी पाण्यावर तरंगत असेल! तिला एकाद्या फळकुटाचा आधार असेल का? का तोहि सुटल्यामुळें ती गटांगळ्या खात—

असें कांही मनांत आलें की तें उदास होई. मग मीं दिलीपचे पापेच पापे घेई. तो अगदीं कंटाळून रडूं लागेपर्यंत! यांच्याशीं रात्रीं उगीचच बोलत—अगदीं बडबडत—राहीं. शेवटीं त्रासून हे मला म्हणत, 'हें बघ, मला सकाळीं आठला दवाखान्यांत हजर व्हायला हवं! राणीसाहेबांचं काय? तूं देशील आपली खुशाल ताणून! तुम्हां बायकांचं बरं असतं! तिकडच्या स्वारीला थोडं खुषींत ठेवलं कीं झालं! पण आम्हांला असतात शंभर नवरे!' मी हंसत हंसत उत्तर देई, 'मी येणार आहे एकदां तुमचे हे शंभर नवरे बघायला! कदाचित् ते सारेच खोटे असतील!'

## ७

एका रात्रीं आमचें असेंच बोलणें झालें. आणि खरोखरच दुसरे दिवशीं सकाळीं नऊ वाजतां मला त्यांना भेटायला दवाखान्यांत जावें लागलें. मावशीचें निकडीचें पत्र आलें होतें. तिच्या मुलीला न्यायचें होतें कुठें दाखवायला! मावशी होती संधिवातानें आजारी. तेव्हां दुपारच्या गाडीनें मीं निघावें, मावशीच्या गांवीं रात्रीं पोचावें, नि तिथून दुसरे दिवशीं सकाळीं मुलीसह वरराजांच्या दर्शनाला जावें असा बेत तिनें आंखला होता. तो पार पाडायचा म्हणजे आत्तांच्या आत्तां यांना विचारून सगळी सावरासावर करायला हवी होती मला!

दवाखान्यांत यांच्या खोलीसमोर औषधासाठीं आलेल्या माणसांची रांग लागली होती. रांगेंतले पुष्कळ लोक वेडेवाकडे उभे राहिले होते. आंत कसें जावें या विचारांत मी होतें. इतक्यांत माझें लक्ष या रांगेंत मधें उभ्या असलेल्या एका मुलीकडे गेलें. ताठ, उंच, शिडशिडीत! तिचा उजवा हात मला दिसत होता. त्या हातांत फक्त दोन कांचेच्या बांगड्या होत्या. औषधाची बाटली आणि प्रिस्क्रिप्शनचा कागद तिनें मुठींत घट्ट धरला होता. माझें मन हुरहुरलें. सुमित्रेच्या पाठीवर दोन वेण्या असत. या मुलीनें पाठीवर एकच वेणी सोडली होती. ही सुमित्रा असेल या आशेनें आपण हिचा चेहरा पाहायला जावें आणि ती कुणीतरी दुसरीच मुलगी निघावी—तें निराशेचें दुःख मला नको होतें. म्हणून मी मिनिटभर तशीच उभी राहिलें. इतक्यांत दवाखान्यांतल्या कुणीतरी नोकरानें मला पाहिलें, ओळखलें. मला आंत डाक्टरांच्याकडे घेऊन जाण्याकरितां तो माझ्याजवळ आला.

आतां मात्र मला राहवेना. मी भरभर त्या मुलीजवळ गेले आणि तिच्याकडे पाहिलें.

ती सुमित्राच होती!

ती आपल्या विचारांत गुंग असावी! मी तिच्या खांद्यावर हात ठेवतांच ती चपापली. मान वळवून तिनें माझ्याकडे पाहिलें, आणि 'कोण? ताई?' असा आनंदाचा उद्गार काढीत ती इतकें गोड हंसली—बाईंच्या छड्या खाऊन माझ्या अंगावरून जातांना ती पहिल्या दिवशीं शाळेंत हंसली होती ना? तशी!

## : ८ :

या मधल्या काळांतहि तिनें खूप छड्या खाल्ल्या होत्या! त्या छड्या देणारा मास्तर बदलला होता एवढेंच! त्याचें नांव होतें नशीब!

तिनें माझ्याबरोबर घरीं यायची थोडीशी टाळाटाळ केली पण मीं तिला झटपट औषध मिळवून दिलें आणि आग्रहानें ओढीतच घरीं नेलें.

चहा घेतां घेतां तिनें आपली सारी हकीकत मला सांगितली. अगदीं सहजतेनें! किती सरळ रीतीनें! एखादी चुणचुणीत मुलगी गोष्ट सांगते ना? तशी. डोळ्यांत तर राहूं देच, पण आवाजांत सुद्धां दुःख दिसूं न देतां!

अनुक्रमणिका

तिचा नवरा गेले चारपांच महिने आजारी होता. हिंवतापाचें निमित्त होऊन प्रथम त्यानें अंथरुण धरलें. हळूहळू हिंवतापाचा बारीक ताप झाला. त्याचा आवाज गोड होता. गाण्याचीहि माहिती होती त्याला. गाण्याचा वर्ग काढून पहिल्या वर्षी त्यानें संसार नीट चालवला होता. पण आतां त्याला कांहीं करायचें त्राण नव्हतें. म्हणून सुमित्राच काम करूं लागली होती. यंदाच मॅट्रिक झाली होती ती. कुठल्या तरी शाळेंत लागली होती. घरीं शिवणकाम करून आणखी चार पैसे ती मिळवी. पण खाणारीं तोंडें चार! नवरा, सासू, मुलगा आणि ही! त्यांत नवरा आजारी, मुलगा आठ महिन्यांचा, त्यामुळें ओढाताण होई तिची. पण तिला त्याची क्षिति नव्हती. ती म्हणाली, 'बाई, हे बरें झालें ना? कीं आम्ही दोघंहि काम करणार आहों. मग खूप खूप मजेंत राहूं आम्ही. त्यावेळीं तुम्ही कुठंहि असलां तरी माझा संसार पाहायला यायला हवं हं! तुम्ही, आलां नाहींत तर ओढून घेऊन येईन मी तुम्हांला! डॉक्टरांना सांगेन, तुमच्या आधींची ओळख आहे माझी नि बाईची!'

आम्हीं दोघीहि खूप हंसलों. त्या हंसण्यानें माझ्या मनावरला ताण थोडा कमी झाला. मीं तिला म्हटलें, 'तुला एक प्रश्न विचारूं?'

ती हंसत उत्तरली, 'आतां चंद्रकोर कां लावीत नाहींस हाच ना? एखादे वेळीं लावतें. आईची अगदीं तशीच आठवण झाली म्हणजे. पण खरं सांगूं बाई? हल्लीं माझं सारं मन गुंतलंय तें यांच्यापाशीं! शाळेंत एक तास संपला ना? म्हणजे वाटतं, पंख असतें तर अशीच भुर्कन् उडून घरीं गेलें असतें नि यांना काय हवं नको तें विचारून परत आलें असतें! सासूबाई सगळं बघतात, करतात. मला कांहीं काळजी नाहीं तशी. पण मेलं माणसाचं मन आहे ना?'

मीं विचारलें, 'तुझी नि तुझ्या नवऱ्याची ओळख कुठं झाली?'

'आम्ही दोघं स्वयंसेवक म्हणून एकाच ठिकाणीं काम करीत होतों. कां कुणास ठाऊक, यांची मला ओढ वाटूं लागली. चुलत्यांनीं खेडेगांवांत यांचं होतं नव्हतं तें सगळं गिळंकृत केलं होतं. त्यामुळं हे दुःखी होते. त्यांना खरी आवड होती फक्त गाण्याची! ते वंदे मातरम् म्हणायला लागले म्हणजे मन असं फुलून येई म्हणतां! ते बरे झाल्यावर तुम्हांला एकदां ऐकवीन हं! एके ठिकाणीं काम करतां करतां आमची मैत्री वाढली. हे घरीं येऊं लागले. बाबांना तें आवडलं नाहीं!'

'गरीब मुलगा कुठल्याच मुलीच्या बापाला आवडत नाहीं सुमित्रा!'

'मग बायका वटसावित्रीचा उपास तरी कशाला करतात हो? तिकडं गरीब सत्यवानाला माळ घालणाऱ्या सावित्रीची पूजा करायची नि इकडं–'

'तें जाऊं दे. आमच्या या सावित्रीचं आख्यान पुढं सांग मला!'

ती हंसत म्हणाली, 'सांगण्यासारखं काय आहे त्यांत? बाबांनीं आम्हांला भेटायची बंदी केली. आम्ही चोरून भेटूं लागलों. बाबा माझ्यासाठीं स्थळं पाहूं लागले. तेव्हां एके दिवशीं—हुतूतूप्रमाणें पळण्यांत पटाईत होतें मी! नि या पळण्याच्या शर्यतींत बक्षिसहि मोठं होतं?'

'अग पण मग तरी वडिलांना कळवायचं कीं नाहीं?'

'मीं पत्र पाठविलं होतं त्यांना! त्यांनीं तें फाडून टाकलं असेल!' मधेंच तिला कसली तरी आठवण होऊन ती म्हणाली, 'बाई, मी अगदीं पहिल्यांदा तुमच्या घरीं आलें होतें ना? त्या दिवशीं तुम्हांला एक प्रश्न विचारीन म्हटलं होतं. पण तो विचारायचा धीर कांहीं मला झाला नाहीं. आठवतं का तुम्हांला?'

'आठवतं ना! खरंच, काय विचारणार होतीस तूं त्या दिवशीं?'

ती किंचित् लाजली. पातळाच्या पदराचें एक टोक करंगळीभोंवती गुंडाळीत ती म्हणाली, 'तो—तो प्रश्न होता—प्रेम म्हणजे काय?'

मी हंसत म्हणालें, 'तो प्रश्न गुरूच्या मदतीवांचूनच सोडविलास कीं तूं!'

गंभीरपणानें नकारार्थी मान हलवीत ती म्हणाली, 'तो सुटलाय् कुठं मला अजून! पण एक गोष्ट मात्र पक्की कळलीय्!'

'कोणती?'

'या प्रश्नाचं उत्तर ज्याचं त्यालाच शोधून काढावं लागतं. तें दुसऱ्याला विचारून कांहीं उपयोग होत नाहीं! नुसती कॉपी होते ती! नि हा प्रश्न कसा आहे सांगूं? दशांशातलीं तीं किचकट उदाहरणं असतात ना? किती वेळ आपलं गणित करा, भागावर भाग द्या, पण पुरा भाग कांहीं जात नाहीं! तसा!'

बोलतां बोलतां ती एकदम थांबली आणि लगबगीनें उठत म्हणाली, 'अगबाई! किती उशीर झाला! मी आतां कांहीं शाळेंतली मुलगी नाहीं, मास्तरीण आहें!'

ती आपल्याशींच हंसत असतांना मीं कुंकवाची कोयरी घेऊन आले. चिमटींत मीं थोडें कुंकू घेतलें नि तिला म्हणालें, 'तुझ्या चेहऱ्याला चंद्रकोर खरंच् शोभून दिसत होती. तिच्यापायीं तूं छड्यासुद्धां खाल्ल्या आहेस. तेव्हा तीच लावतें मी!'

'ती नको बाई!'

'कां ग? अलिकडं तुझं मत बदललं वाटतं!'

'हूं!'

'तें कां?'

'लग्न झाल्यावर आपल्याच मतानं वागून चालत नाहीं कुणाला!'

'अस्सं! मग ही कुंकवाची टिकली सासूबाईसाठीं—'

मानेनें नाहीं म्हणत आणि लाजून खालीं पाहत ती म्हणाली, 'त्यांना फार आवडते ती! आतां तुम्हीच सांगा—' कोयरींतलें कुंकू घेऊन तें मला लावीत ती म्हणाली, 'बाई, तुम्ही मला विसरलां नाहीं हें बघून किती किती बरं वाटलं मला! तुमचे उपका—'

'वेडी कुठली' हे शब्द माझ्या तोंडून निघायच्या आंत ती पायऱ्या उतरून गेली!

## ९

मला दुपारच्या गाडीनें जायची गडबड होती. तरी सुमित्रा माझ्या डोळ्यांपुढून हलेना. 'मला काय शोभून दिसतं हें दुसरं कोण सांगणार बाई? तें माझं मलाच कळणार!' हें हेड मास्तरीणबाईंना तिनें दिलेलें उत्तर मला आठवलें. तीच बंडखोर सुमित्रा आज नवऱ्याकरितां मोठ्या हौसेनें चंद्रकोर सोडून वाटोळें कुंकू लावीत आहे! 'प्रेम म्हणजे काय?' याचें उत्तर शोधायला घराबाहेर पडलेली ही पोरगी–पळून गेलेली म्हणून सर्वांच्या निंदेचा विषय झालेली ही मुलगी–हिच्या मनाचा अंत लागणें मोठें कठिण आहे!

मात्र एका गोष्टीसाठीं मन चुटपुटूं लागलें. बोलण्याच्या नादांत मी तिच्या बिऱ्हाडाचा पत्ता विचारायला विसरलें होतें. तिनें तरी तो सांगायचा कीं नाहीं? का आपला पत्ता द्यायचें तिनें मुद्दामच टाळलें?

बहुधा तसेंच असावें. आपली गरिबी बाईंना दिसूं नये अशी तिची इच्छा असावी. स्वतःच्या फाटक्या अब्रूवर पांघरूण घालण्याकरितां माणूस अनेकदां खोटें बोलतें. त्याला तसें बोलावेंच लागतें. तिची ही टाळाटाळ तशीच असेल का?

पण सुमित्रेनें पत्ता दिला नसला म्हणून काय झालें? तिचें घर मला सहज शोधून काढतां येईल!

## : १० :

मावशींकडून परत आल्यावर दवाखान्यांतून मीं सुमित्रेचा पत्ता मिळविला. एके दिवशीं संध्याकाळीं अचानक मी तिच्या घरीं गेलें. ती नुकतीच शिकवणी करून आली होती. तिचा नवरा अंथरुणावर मुलगा घेऊन बसला होता. मुलगा चांगला गुटगुटीत आणि बापासारखा गोरागोमटा होता. मी हास भास नसतांना आलें म्हणून सुमित्रेनें 'हें काय बाई?' म्हणून आपला रोष प्रगट केला. पण लगेच ती माझी उठाबस करण्यांत दंग झाली.

जुन्या वाड्यांतली एक जरा मोठी खोली! तींत या पोरीचा सारा प्रपंच थाटला होता. एका कोपऱ्यांत आजाऱ्याचें अंथरुण, त्याच्यासमोरच्या कोपऱ्यांत चूल, दुसऱ्या कोपऱ्यांत मुलाचा झोळणा, तिथेंच खालीं एक छोटा देव्हारा.

मी मुलाला घेण्याकरितां हात पुढें केले. त्या गुलामानें माझ्या अंगावर झेपच घेतली. सुमित्रा म्हणाली, 'तुम्ही माझ्या बाई आहांत हें ओळखलं त्यानं! कसा आला तुमच्याकडं बघा!'

'काय नांव आहे ग याचं?' मीं विचारलें.

'अशोक! तें कां ठेवलंय तें त्यांना विचारा', एवढें बोलून ती नवऱ्याकडे पाहून हंसूं लागली.

तिचा नवरा तापानें बराचसा वाळला होता. पण तो मूळचा हंसतमुख असावा. तो तिला म्हणाला, 'तूंच सांग कीं!'

ती म्हणाली, 'अं हं. मी नाहीं सांगणार. तुमच्यामुळं हें नांव ठेवावं लागलं मला. तुम्हीच सांगायला हवं!'

तो हंसत मला म्हणाला, 'हा झाला ना! तेव्हां मीं हिला म्हटलं, 'फार लवकर मूल झालं आपल्याला.' तेव्हां ही म्हणाली, ''जी ती गोष्ट मनाला लावून घेतां तुम्ही. लवकर मूल झालं हें फार बरं झालं. म्हातारपणींचो काळजी उरली नाहीं आपल्याला. याचं नांवच आपण अशोक ठेवूं.''

देवदर्शनाला गेलेली सुमित्रेची सासू याच वेळीं परत आली. जवळ जवळ साठीच्या घरांत आली होती ती. चेहऱ्यावरून चालण्याच्या श्रमानें ती थकलेली दिसली. पण कुणी पाहुणी आली आहे असें पाहतांच हातपाय धुऊन ती चुलीपाशीं चहा-पोहे करायला बसली.

तुम्हांला दवाखान्यांत राहायचें असलें तर तशी व्यवस्था मी करीन असें सुमित्रेच्या नवऱ्याला मीं सुचविलें. पण तें त्याला तितकेंसें रुचलें नाहीं. म्हणाला, 'तिथं मला तुरुंगांत टाकल्यासारखं होईल. आजाऱ्याला वेळ जायला कांहींतरी साधन हवं. तें इथं आहे. हवं तर अशोकाशीं खेळावं, हवं तर सुमावर रागवावं, हवं तर आईलों कांहीं तरी वाचून दाखवावं. त्यांतून हा ताप आहे मलेरियाचा! होईन मी लवकर बरा!'

चहा-पोहे झाल्यावर सुमित्रा नवऱ्याला म्हणाली, 'बाईंना 'वंदे मातरम्' म्हणून दाखवा ना थोडं!' मी नको नको म्हणत असतांनाच तो गाऊं लागला. आजारीपणामुळें त्याचा आवाज क्षीण झाला होता. पण त्यांतला गोडवा कुणाचेंहि मन मोहून टाकील असाच होता!








त्यानें तीन चार ओळी म्हटल्या. तेवढ्यानेंच त्याला धाप लागल्या-सारखी झाली! 'किती छान म्हणतां तुम्ही! तुम्हांला बरं वाटल्यावर तुमचं गाणं ऐकायला अगत्य येईन मी!' असें मी त्याला म्हणालें देखील. पण तो थांबला नाहीं. पुढच्या ओळी म्हणूं लागला. म्हणतां म्हणतां त्याला खोकला आला. त्यानें तो आवरण्याचा प्रयत्न केला. पण ती उबळ फार जोराची होती. खोकूनखोकून त्याचें तोंड गोरें मोरें झालें. सुमित्रेनें त्याला पाणी दिलें, लवंग दिली, खडीसाखर दिली. शेवटीं कशीबशी ती उबळ थांबली. तो बिचारा अंथरुणावर आडवा झाला.

सर्वांचा निरोप घेतांना मी अशोकच्या हातांत दहाची नोट ठेवली. सुमित्रा ती घेईना. ते पैसे परत करूं लागली. मी म्हटलें, 'अग त्याल खाऊ, खेळणीं घेऊन दे ना!' लगेच ती फुरंगटल्यासारखें करून मिश्किलपणानें हंसत म्हणाली, 'पण बाई मी तुमची इतकी लाडकी असून मला तुम्हीं कधीं खाऊला पैसे दिले नाहींत, कधीं खेळण्यांना पैसे दिले नाहींत, नि अशोकला मात्र...'

मीहि हंसत उत्तर दिलें, 'याचं कारण ठाऊक आहे का? दुधापेक्षां दुधावरची सायच अधिक गोड असते!'

हें ऐकून आम्हीं सारेच—ती, मी, तिचा नवरा, तिची सासू—हसूं लागलों. हीं सारीं माणसें कां हंसतात हें छोट्या अशोकला कसें कळणार? पण त्याला काय वाटलें कुणाला ठाऊक! आपलें बोळकें पसरून तोहि आमच्या आनंदांत सामील झाला.

११ :

सुमित्रेचा हा आनंद टिकावा अशी दैवाची इच्छा नव्हती.

डॉक्टरांची तिथून लवकरच बदली झाली. कारवारच्या बाजूला गेलों आम्ही बदलून. जातांना न चुकतां महिन्यांतून एक पत्र पाठवायला बजावलें होतें मीं सुमित्रेला! तशी दोन तीन महिने तिचीं पत्रें आलीं. प्रत्येक पत्रांत तिच्या नवऱ्याची प्रकृति अधिकच बिघडत आहे असें होतें.

पुढें माझीं दोन-तीन पत्रें तिला गेलीं, तरी तिचें उत्तर आलें नाहीं! तेव्हां मी मनांत चरकलें. डॉक्टरांच्याकडून त्यांच्या ओळखीच्या एका गृहस्थांना पत्र लिहविलें. सुमित्रेचा नवरा वारला आणि तें कुटुंब इथून निघून गेलें, एवढें त्यांनीं शोध करून कळविलें.

१२

समुद्राच्या एका लाटेनें दोन होड्या जवळ जवळ याव्यात आणि पुन्हा दुसऱ्या लाटेनें त्या दूर दूर लोटल्या जाव्यात तशी सुमित्रेची आणि माझी ही पहिली भेट झाली. तिचा नवरा वारला हें कळलें तेव्हां मला तिच्याविषयीं जितकें वाईट वाटलें, तितकाच तिचा राग आला. तिनें दोन ओळींत तरी ही हकीगत मला कळवायला काय हरकत होती? 'मला विसरूं नका हं!' असें म्हणणारी ही मुलगी दुसऱ्याला मात्र विसरून जाते! हिला माझेंसुद्धा मन कळलें नाहीं का? माझ्याशीं इतक्या संकोचानें ती कां वागते?

तिला नुसतें सान्त्वनाचें पत्र पाठवायचें म्हटलें तरी तें सुद्धां शक्य नव्हतें. मग मदत करणें लांबच राहिलें! पत्र पाठवायचें तें कोणत्या पत्त्यावर? असल्या अडचणीच्या वेळीं माझी मदत मागायचें तिच्या इतकें जिवावर कां यावें?



अनुक्रमणिका







कांहीं दिवस या विचारांनीं मी बेचैन होतें. मग हळूहळू सुमित्रेला मी विसरूं लागलें. तिच्याविषयीं माझ्या मनांतली सहानुभूति अजिबात नाहींशी झाली असें मात्र नव्हे. केव्हां तरी तिची आठवण होई! मग ती कुठें असेल, काय करीत असेल, अशोक केवढा झाला असेल, तिचे हाल होत असतील काय, असले प्रश्न कुसळासारखे काळजांत सलत. पण दुसरे दिवशीं माझ्या स्वतःच्या जगांत मी रमून जाई.

: १३ :

दोन अडीच वर्षांनीं एका नात्यांतल्या लग्नाकरितां आम्ही मुंबईला गेलों. तिथें बसमध्यें एक लठ्ठ, गिड्डया बाई दुरून दिसल्या. त्यांना कुठें तरी पाहिलें आहे असें वाटलें. दुसऱ्याच क्षणीं लक्षात आलें— चंद्रकोरीसाठीं सुमित्रेला छड्या मारणाऱ्या हेड मास्तरीणबाई त्या याच. त्यांच्याजवळची जागा रिकामी होतीच. मी तिथें जाऊन बसलें. त्यांच्याशीं इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलल्यावर सहज सुमित्रेची चौकशी केली. त्या नाक मुरडून म्हणाल्या, 'मोठी वाईट आहे ती पोरटी! नवरा मेल्यावर बापानं घरीं ये म्हणून लिहिलं. पदरांत एक पोर आहे! मुकाट्यानं घरीं यायचं कीं नाहीं? पण या शहाणीनं फक्त आभाराचं पत्र पाठवलं बापाला!'

मी विचारलें, 'पण असते कुठं हल्लीं?'

'असते म्हणे पुण्यांत! परवांच कुणी तरी सांगत होतं, तिला पुण्यांत फिरतांना पाहिलं म्हणून! एक गोरागोमटा तरुण होता बरोबर. नवरा वारला तरी कुंकू कांहीं पुसलं नाहीं हिनं! चांगली टाकमटिकली करून फिरत असते म्हणे! उद्यां पुनर्विवाहसुद्धां करील! त्याचा काय नेम आहे?'

सुमित्रेवरला बाईंचा राग अजून मावळला नाहीं, हें माझ्या लक्षांत आलें. म्हणून मुद्दामच तिची कड घेतल्यासारखें करून मीं म्हटलें, 'फार तर एकवीस बावीस वर्षांची असेल ती! तिला पुनर्विवाह करावासा वाटला तर त्यांत गैर काय आहे?'

'आतां पुढच्या काळांत गैर असं कांहीं राहणारच नाहीं हो! पण तुमचं तें प्रेम का काय म्हणतात ना? त्या प्रेमापायींच ही पोरटी घरून पळून गेली होती ना? तें कुठं गेलं आतां?'

मोठ्या बाईंचें लग्नच झालें नव्हतें. त्यामुळें त्यांचा प्रेमावर आणि त्या प्रेमाच्या नादाला लागून पळून गेलेल्या सुमित्रेवर राग असणें स्वाभाविक होतें. पण त्यांच्या शेवटच्या वाक्यानें मीसुद्धां गोंधळून गेलें. मला एकदम सुमित्रेचें बोलणें आठवलें. 'प्रेम म्हणजे काय?' या प्रश्नाचें उत्तर ती स्वतः शोधून काढणार होती! दैवाला तिच्या या संकल्पाचा सुगावा लागला असावा. म्हणूनच त्यानें तिला पुन्हा असें कोंडींत पकडलें होतें!

: १४ :

परत जातांना आम्ही पुण्याला उतरलों. कुठें तरी रस्त्यावर नाहीं तर थेटरांत सुमित्रा अचानक भेटेल, असें मला राहून राहून वाटत होतें. पण ती कुठेंच दिसली नाहीं!

पुन्हा अशीं दोन अडीच वर्षें गेलीं. दिलीपच्या पाठीवर मेधा झाला. संसारापलिकडे लक्ष द्यायला मला सवडच होईना! एखादें रम्य स्थान पाहिलें किंवा एखादी गोड तान ऐकली कीं, पुढें कांहीं दिवस त्यांच्या आठवणीनें मन हुरहुरत राहतें. मग हळूहळू त्यांचा विसर पडतो. सुमित्रेच्या बाबतींत माझी स्थिति अशीच झाली. आतां अगदीं क्वचित् तिची आठवण होई. ती झाली म्हणजे चार पांच वर्षांत तिच्याकडून मला एक पत्रसुद्धां येऊं नये याचें वैषम्य वाटे! आपणच वेड्या आणि हळव्या आहोंत, असें मनांत येई. तिकडे सुमित्रा पुनर्विवाह करून नव्या संसारांत सुखानें नांदत असेल, ती बाईंना विसरून सुद्धां गेली असेल. जसें जेवतांना, तसेंच जगतांना माणसाला कांहीं ना कांहीं तोंडीलावणें लागतें. त्या तोंडीलावण्याचीं नांवें पुष्कळ आहेत—प्रेम, प्रीति, स्नेह, मैत्री वगैरे वगैरे! त्या त्या तोंडीलावण्याचा कंटाळा आला कीं माणूस तें बाजूला सारतो! सुमित्रा अशीच वागली. यांत तिचा काय दोष आहे? दोष आहे आपल्या अतिशय हळव्या, उगीच हुरहुणाऱ्या मनाचा!

: १५ :

याच सुमाराला डॉक्टरांची बदली झाली. सुमित्रेच्याच गांवीं. आम्ही आलों त्याच दिवशीं बी. ए. चा निकाल होता. संध्याकाळीं डॉक्टरांच्याकडे चहाला आलेली कुणीतरी मंडळी पहिल्या वर्गात आलेल्या सुमित्रा नांवाच्या मुलीविषयीं बोलत होती. मी चकित झालें. ही सुमित्रा कुणी दुसरी नाहीं ना? अशी मला शंका आली. हिचें सासरचें आडनांव काय बरें होतें तें? मी आठवूं लागले.

पण मला फार वेळ दुग्ध्यांत पडावें लागलें नाहीं. सुमित्राच माझ्याकडे आली, एका पांच सहा वर्षांच्या गुटगुटीत, गोऱ्या गोमट्या मुलाचें बोट धरून. परकेपणामुळें तो माझ्याजवळ यायला बिचकूं लागला, तेव्हां ती त्याला म्हणाली, 'अरे वेड्या, आठ महिन्यांचा होतास तेव्हां यांची ओळख होती तुला नि आतां ती विसरून गेलास होय?'

बदली होऊन आम्ही इथें आल्याचें तिला कुणी तरी सांगितलें होतें. ती लगेच पेढे घेऊन माझ्याकडे आली होती. तिला पोटाशीं धरून, तिचें मस्तक थोपटून, मीं तिचें अभिनंदन केलें.

पाहतां पाहतां तिच्या कपाळावर कुंकू नाहीं—चंद्रकोर नाहीं, टिकली नाहीं, कांहीं नाहीं—हें माझ्या लक्षांत आलें. नवऱ्याच्या मृत्यूनंतर ती कुंकू लावीत होती, कुणा तरी तरुणाबरोबर फिरायला जात होती, वगैरे वगैरे गोष्टी मीं ऐकल्या होत्या. तें सारें मनांत येऊन मी बिचकत तिला म्हणालें, 'तुला एक प्रश्न विचारूं का?'

ती हंसत उत्तरली, 'बी. ए. झालेयं मी बाई! नि ती सुद्धां पहिल्या वर्गात. हवा तो प्रश्न विचारा मला!'

मीं अशोकला दिलीपबरोबर बागेंत खेळायला पाठवून दिलें. मग सुमित्रेच्या अगदीं जवळ बसून नि तिचे दोन्ही हात हातांत घेऊन तिला म्हटलें, "तूं पुनर्विवाह करणार आहेस म्हणून मध्यें कुणी तरी सांगत होतं. मला खरं आहे का हें?'

ती हंसत म्हणाली, 'एकदोघांनीं मला विचारलं होतं तसं बाई. पुण्यांत मी एका कंपनींत नोकरी करीत होतें. तिथल्या मालकाच्या मुलानं सुद्धां! चांगला देखणा होता—'

'मग?'

ती हंसत उद्गारली, 'त्याचा विचार करायला वेळच झाला नाहीं मला!'

'म्हणजे?'

'एक तर सकाळचं कॉलेज, दुपारची नोकरी, अशीं चार वर्षें नुसतीं चरकांत होतें मी. दुसरं, माझी शिकायची इच्छा सासूबाईंच्यामुळं तडीला गेली. रेंगत, खोकत, पडत झडत, त्यांनीं स्वैपाक केला, घर बघितलं, अशोकला संभाळलं! त्यांना काय वाटेल मीं असं कांहीं केलं तर? हे गेल्यावर सासूबाईंनीं अगदीं हाय खाल्ली होती. त्यांना मी अशोकच्या गळ्याची शपथ घेऊन सांगितलं कीं, "तुमची सून मेली नि मुलगा जिवंत आहे, असं समजा. तुमच्या मायेचं पांघरूण माझ्यावर घाला. नि




मग तुमच्या मुलालाहि जें कदाचित् करतां आलं नसतं, तें मीं करून दाखविते कीं नाहीं तें पाहा." त्यांनीं मला धीर दिला. मी ईर्ष्या धरली. म्हणून आज पहिल्या वर्गात आलें मी! आयुष्यांत माझं एवढं एकच सोनेरी स्वप्न खरं ठरलं! बाई, तुम्हीच सांगा, मीं पुनर्विवाह केला आणि सासूबाईंना कुठें तरी दूर ठेवून महिना दहा वीस रुपयांची मनिऑर्डर पाठविली, तर त्यांना सुख होईल का?'

उगीच कांहीं तरी बोलायचें म्हणून मी बोललें, 'तें खरं ग! पण तूं लहान आहेस अजून. तुला पुनर्विवाह करावासा वाटला तर—'

ती हंसून म्हणाली, 'खरं सांगूं? तसं कांहीं वाटतच नाहीं मला! आपलं माणूस या जगांतून गेलं म्हणून काय त्याचा कुणाला विसर पडतो? गोड सूर हवेंत विरून जातात! पण ते ऐकणाराच्या कानांत आणि मनांत घुमत असतातच ना? आज ते असले तर बरं झालं असतं असं पुष्कळदां मनांत येतं. पण—ते कांहीं आपणहून मला सोडून गेले नाहींत; त्यांना नाईलाजानं जावं लागलं! म्हणून काय त्यांना विसरून जाऊं मी? छे! सुमित्रेला तें जमणार नाहीं बाई! त्यांची दररोज आठवण व्हावी म्हणून कुंकवाची टिकलीसुद्धां लावीत होतें मी! किती तरी दिवस!'

'आतां कां सोडलीस ती? लोकांना भिऊन?'

'अं हं'

'मग?'

'दुसऱ्याच एका माणसाला भिऊन!'

'सासूबाईंना?'

'छे! उलट त्या म्हणत, "कुंकू काय, मुलगी जन्मापासून लावते. तें तिनं शेवटपर्यंत लावलं म्हणून कुठं बिघडतं?"

'मग तूं ज्याला इतकी भित आहेस तो बडा मनुष्य आहे तरी कोण?'

बागेकडे पाहत आणि अशोककडे बोट दाखवीत ती म्हणाली, 'हेच ते बडे साहेब!'

'यांनी काय केलें?'

'विधवा बायका कुंकू लावीत नाहींत हें कुठून तरी या स्वारीला कळलं! मग तो एकसारखा म्हणूं लागला, "तूं कुंकू लावतेस, तेव्हां माझे बाबा कांहीं देवाघरीं गेलेले नाहींत. तूं लपवून ठेवलं आहेस त्यांना कुठं तरी! ते कुठं आहेत तें दाखीव मला!" मीं आपलं मुकाट्यानं कुंकू लावायचंच सोडून दिलं.'

ती जायला उठली. जातां जातां ती म्हणाली, 'खरं सांगूं बाई तुम्हांला? पहिल्यांदा आई झाली, मग ते झाले, मग सासूबाई झाल्या. आतां अशोकाचं राज्य सुरू आहे सुमित्रेच्या मनावर. उद्यां अशोक मोठा होईल. मग त्याची बायको, त्याचीं मुलं यांचं राज्य सुरू होईल तिथं. हें असंच चालायचं माझं जन्मभर!'

अशोकाचें बोट धरून ती बागेंतून जाऊं लागली. मीं पहिल्यांदा पाहिली तशीच तिची ती पाठमोरी आकृति दिसत होती—ताठ, उंच, शिडशिडीत!

ती मधेंच थांबली नि मागें वळून मोठ्यानें म्हणाली, 'बाई, तुम्ही मला विसरलां नाहींत, तसाच अशोकालाहि विसरूं नका हं! त्याचं काम आहे पुढं तुमच्याकडं!'

मी दारांतूनच हंसत प्रश्न केला, 'कसलं ग?'

'मी खूप खूप शिकविणार आहें त्याला. त्याला डॉक्टर करणार आहें मी! त्यावेळीं—'

ती हंसली आणि चालूं लागली—शिडशिडीत, उंच, ताठ!

• • •

# —तुझीच ह्या क्षणीं साथ हवी



सिनिक्'

*अंधारूं लागलें तरी मला सागराचें सान्निध्य कांहीं सोडवेना. वास्तविक दिवस भरतीचे नव्हते. डोळे खोल गेलेल्या जर्जराप्रमाणें आंत आंत पाणी घेणाऱ्या समुद्र किनाऱ्याची अवस्था झाली होती. पाण्याचा आवाज हवेच्या झोक्याबरोबर कानाच्या पडद्यावर जेव्हां पडे, तेव्हां वाटे कीं, माघार घ्यावयाचें समुद्रानें फारच मनावर घेतलेलें आहे.*

*भवतीं भोवतीं फिरणारीं माणसें आकृतिवजा वाटूं लागलीं. चालतींबोलतीं हाडामासांचीं माणसें अधांतरीं लोंबकळणाऱ्या बाहुल्यांसारखीं भासूं लागलीं. माणसांनीं फुललेला किनारा ओसाड पडूं लागला. भेळवाले आवराआवर करूं लागले. यौवनानें भारावलेलीं शरीरें स्पर्शसुखाचा मोह आवरत लगबगीनें उठलीं. त्यांचीं पावलें कांहींशा भीतीनें, कांहींशा अधीरतेनें घराकडे झप् झप् पडूं लागलीं.*

*मला मात्र जावंसं वाटेना. बसून करमेना पण. मोकळें, शांत वातावरण हवें तें होतें. परंतु बरें कांहीं वाटत नव्हतें. एखादी गोड कल्पना, एखादा प्रिय गतप्रसंग, एखादें रम्य स्वप्न चघळत वेळ घालवावा, म्हणजे तेंहि जमत नव्हतें. मन कसें अगदीं नव्या यंत्राप्रमाणें करकरत होतें. कोऱ्या पाटीप्रमाणें संवेदनाहीन झालें होतें. शुष्क होतें. अबोध झालें होतें. कांहीं सुचत नव्हतें;—आणि वाटत होतें कीं ही हुरहूर संपावी.*

*किनाऱ्याला लागून कांहीं टुमदार बंगले होते. डौलदार दिसत होते. तिथें दिवे तेवत होते. कांहींत उपहारगृहें होतीं. कधीं नाहीं तो मी तिकडे ओढला गेलों. खाण्याची इच्छा नव्हती, पिण्याची वांच्छा नव्हती, पैसे खर्च करण्याची तितकी क्षमता नव्हती. तरी पहिल्यापासूनच वाटत आलें कीं हें जग आपलें नाहीं, आपल्याकरिता नाहीं.*

*सोपान चढून जातांना दुतर्फा ठवलेले फुलांचें सुबक कुंडें आणि पायऱ्यावर अंथरलेलें मुलायम कातडें हीं माझ्यांतील न्यूनगंडावर फुंकर घालत होतीं. माझ्या गोलाकार झालेल्या निळ्या बेलबॉटच्या इस्तरीकडे हेटाळणीनें पाहत होतीं.*







अनुक्रमणिका

वर गेल्यावर तर मी थबकलोंच. बुजलों म्हणाना. छोट्या छोट्या वर्तुळाकार टेबलांभोंवतीं वेताच्या खुर्च्यांची मांडणी कलात्मक होती. टेबलावरचें कापड चिनी, जपानी कलाकुसरीनें अलंकृत होतें. सौंदर्य दृष्टीला खिळवून ठेवणारें होतें. त्या त्या टेबलक्लॉथवरील वेगवेगळ्या रंगाचे इंग्लिश कटग्लासचें पुष्पपात्र नावीन्याची भूक भागवत होतें. त्यांतील बालकाच्या निष्पाप हास्यासारखीं खदखदणारीं फुलें वातावरणाला प्रसन्न करीत होतीं.

सगळ्याच जागा कांहीं भरलेल्या नव्हत्या. बसलेलीं माणसें पाश्चात्य वेशभूषेची साक्ष होती. मानेवर रूळणारे भुरके, पिंगट केस, कानावर लवलेलीं काळीं झुलपें, आखूड केसांची फुगीर, वैविध्यपूर्ण रचना, नितळ त्वचेची मान, सौष्ठवपूर्ण खांदे, मांसल बोटें, इंद्रधनुष्यांतील रंगाचे प्रकार दाखवणाऱ्या टाईज्, ह्या सर्वांचा थवा जणुं माझ्या नजरेवर मारा करीत होता.

'साहेब, स्वागत असो. या, बसा—' ह्या सूचनेनें मी शुद्धीवर आहे हें दाखवण्याकरितां माहित असूनहि विचारलें, 'सर्वांना प्रवेश आहे?' 'आतां हीं हॉटेलें सर्वांचींच आहेत. सध्यां व्यवस्था त्यांची नाहीं, आमची आहे' एक काळा लठ्ठ गृहस्थ आपल्या ढेरीवर पँट सरकवत लाचवीपणानें वस्तुस्थिति दाखवत होता.

व्यवस्थापकाच्या आस्थेवाईकपणामुळें मला हुरूप आला. समुद्र किनाऱ्याकडच्या रंगेलल्या एका रिकाम्या टेबलाजवळ मी आसन जमवलें. भोंवतालीं नीट लक्ष देऊं लागलों, तसें ध्यानांत आलें कीं संगीताचे मृदु स्वर अपरिचित असूनहि कानाला तोषवीत होते.



कानांबरोबर नजरहि खूष झाल्याचा दाखला मिळूं लागला. शेजारच्याच टेबलावर समोरासमोर एक तरुण युगुल बसलें होतें. पात्रांतलें पेय किती नाजुकतेनें शोषलें जाई. जाड ओठ कांहीं फुटपुटत आणि लालचुटुक पाकळ्या विलग झाल्याबरोबर शुभ्र मोगऱ्याच्या कळ्या खुलत.

पलीकडच्या टेबलावर खुसफुस चालली होती. माना हलत होत्या. मानेखालच्या भागाचीं आवर्तनं मदभरी वाटत. माझ्या रांगेत एक वयस्क जोडपें पंजावर पंजा ठेवून संथपणें तल्लीन होतें कांहीं ठिकाणीं ग्लासाला ग्लास भिडवले जात होते, तर कांहीं ठिकाणीं ओठावर ओठ टेकवले जात होते. एका टेबलाभोंवतीं चर्चा चालली होती. बेथोविन, चेकोव्हस्की, शापीन हीं नावें कानांवर येत होतीं.

क्षणभर संगीत थांबलें. सगळें वातावरणच एकवटल्यासारखें झालें. येगांत असलेल्या गाढीतली निद्रा गाडी थांबताच भंगते अगदीं तस्सें झालें.

—पुन्हा संगीत सुरू झालें. स्त्रीपुरुष उभे राहिले. स्वरमालिका हेलावूं लागली. लयबद्धता आली. स्त्रियांच्या कटीभोंवतीं पुरुषी हात पडला. तोंडें जवळ येऊं लागलीं. गालाला गाल घासले जाऊं लागले. खांद्यावर माना अलगदपणें विसावूं लागल्या. स्वर अर्थपूर्ण होऊं लागले—

> **माझें हृदय मजजवळ आहे**
> **माझा चंद्र मजजवळ आहे**
> **सागरा, तूंच कां बरें मजपासून दूर चाललास ?**
> **माझा जिवलग मला साद घालित आहे**
> **माझ्या अंतःकरणाला भरती आली आहे**
> **सागरा, तुझीच रे ह्या क्षणीं साथ हवी—**

सारें किती निरामय होतें. हळुवार होतें. नादमधुर होतें. वाटे की पऱ्या वाऱ्यावर विहरत आहेत. एक मला सोडलें तर तेथील प्रत्येक इसम गंधर्वनगरीची अलौकिक मजा चाखत आहे असेंच कुणालाहि वाटलें असतें.

'साहेब पेय तसेंच राहिलें—' पेला तोंडाला लावला मी. किती स्वादिष्ट वाटलें तें. तेथील प्रत्येक वस्तु, प्रत्येक हालचाल रसांसक्त होती असेंच मी अनुभवूं लागलों. तेथील कणन्‌कण मजवर अंमल गाजवूं लागला..........

'साहेब हॉटेल बंद करावयाची वेळ झाली' वेटर मला जागें करीत होता. मी डोळे चोळून पाहिलें तों सगळीं पाखरें उडून गेलीं होतीं. मी वेटरला म्हणालों, 'म्हणजे—? हें हॉटेल रात्रभर उघडें नसतें!' व्यवस्थापक जवळ आले व सस्मित म्हणाले, 'गेला तो जमाना—' आणि एकदम उदास होऊन त्यांनीं एक सुस्कारा सोडला!




किर्लोस्कर
भारताच्या
शेतीसुधारणेला
व
औद्योगिक प्रगतीला
महत्त्वाचा हातभार
लावणारा अग्रगण्य
कारखाना
BIRD'S EYEVIEW OF
KIRLOSKAR FACTORY
किर्लोस्कर ब्रदर्स लि.
किर्लोस्करवाडी
(द. सातारा)
TOM & BAY LTD


DIL BAHAR
Diwali greetings
दिवाळीच्या या मंगलप्रसंगीं
कामिनियाचीं सौंदर्यप्रसाधनें
आपल्या आश्रयदात्यांना शुभेच्छा व्यक्त
करीत आहेत—आपली दिवाळी
आनंदाची आणि नवें सौंदर्यपूर्ण
वर्ष सुखसमृद्धीचें जावो!
आपल्या सौंदर्यात आणि मोहकपणांत
भर घालणारीं आमचीं प्रसाधनें :—
कामिनिया हेअर ऑईल
दिलबहार टॉयलेट सोप
ऑटो दिलबहार
कामिनिया स्नो
कामिनिया कोल्ड क्रीम
ANGLO INDIAN DRUG AND
CHEMICAL CO. BOMBAY-2




—पु. भा. भावे

मालिनी, आज बरेच दिवसांनीं आपली भेट झाली. त्या भेटीला भेट म्हणणंसुद्धां कठीणच आहे, कारण आज बरेच दिवसांनीं आपली दृष्टादृष्ट झाली. त्या भेटीला दृष्टादृष्टच म्हणायला पाहिजे. कारण आज कांहीं तूं चपर पावलं पुढें सरकून माझ्यापाशीं आली नाहींस. माझ्याशीं चकार शब्द बोलली नाहींस. मला साधा नमस्कार केला नाहींस कीं, कुठल्याहि अन्य प्रकारानं आपली ओळख दाखविली नाहींस. बोलून चालूनच तो लग्नाचा मांडव होता. माणसं आपआपल्या गर्दींत होतीं. तुझ्या-माझ्याकडे पहात बसायला लोकांना वेळ नव्हता. जें झालं त्यांत विशेष कांहींच नव्हतं. खरं म्हणजे लोकांनीं ज्याकडे पहावं असं कांहीं झालेलं नव्हतं. पण साध्या शिष्टाचाराच्या न्यायानं जेवढं कांहीं व्हायला पाहिजे, तेंही आज तुझ्या-माझ्यांत झाल नाहीं. हें पाहणारे लोकहि तिथें होतेच. त्यांच्या दृष्टींतून तुझं वर्तन सुटलं नाहीं. त्यांनीं पाहिलं कीं तूं माझ्याशीं बोलली नाहींस. केवढ्याहि गर्दींत असलीस आणि कुठेंहि भेटलीस, तरी आवर्जून तूं माझ्याशीं बोलत होतीस हें त्यांना ठाऊक होतें. आज तें घडलं नाहीं. तशीं कांहीं आपण परस्परांपासून फारशीं लांब नव्हतों. मेजाच्या एका टोंकाला मी होतों आणि दुसऱ्या टोंकाला तूं होतीस. सारे पाहुणे लग्नघरांतल्या आइस्क्रीमवर हात मारत होते आणि परस्परांशीं गप्पा मारीत होते. तूंसुद्धां तशी कांहीं गप्प नव्हतीस. तूं आपल्या मैत्रिणींबरोबर बोलत होतीस आणि मी माझ्या मित्रांबरोबर हास्य-विनोद करीत होतों. झालं इतकंच कीं, तूं माझ्याशीं तेवढी बोलली नाहींस. मला साधा नमस्कार केला नाहींस कीं आपल्या ओळखीचं दुसरं कुठलंहि चिन्ह दाखविलं नाहींस. अर्थात् मींही तुला ओळख दाखवली नाहीं. समोर असून तूं जेव्हां माझ्याशीं बोलण्याची इच्छा दाखविली नाहींस, तेव्हां मी तरी आपण होऊन तुझ्याशीं बोलण्याचें कारण काय ?

परंतु पाहणाऱ्यांनीं हें सारं पाहिलं आणि विचारायचं तें त्यांनीं मला

***इतकं नाजुक आणि इतके तरल संबंध तोडून टाकण्यासाठीं इतका आततायी उपाय आवश्यक होता काय ?***

अनुक्रमणिका

विचारलं. मला ठाऊक आहे, मी दिलेलं स्पष्टीकरण त्यांना मुळींच समाधानकारक किंवा विश्वसनीय वाटलं नाहीं. समाधानकारक किंवा विश्वसनीय असं माझं स्पष्टीकरण नव्हतंच. एखाद्या पुरुषाच्या विषयांत असं स्पष्टीकरण मागितलंच गेलें नसतें किंवा कुठलंहि स्पष्टीकरण लोकांनीं चालवून घेतलें असतें. दोन पुरुषांचं कुठें बिनसल ह्यांत लोकांना फारसं स्वारस्य वाटत नाहीं. पण एका स्त्रीचं आणि एका पुरुषाचं, त्यांतही तुझ्यासारख्या स्त्रीचं आणि माझ्यासारख्या पुरुषाचं जेव्हां बिनसतें आणि जेव्हां ती स्त्री त्या पुरुषाची ओळखहि टाकते, तेव्हां त्या घटनेचा लोक एकच अर्थ लावतात. तो अर्थ त्या पुरुषास फारसा रुचकर वाटेल वा उपकारक होईल, असा मुळींच नसतो. इतकेंच नव्हे, तर पुष्कळदां तो अर्थ त्या बिचाऱ्या पुरुषावर अन्याय करणारा असतो. तुझ्यासारखी एखादी सुंदर विवाहित स्त्री जेव्हां अकस्मात एखाद्या पुरुषाची ओळख नाकारते, तेव्हां लोकांना असं वाटतं कीं कुठला तरी अतिप्रसंग त्या पुरुषाकडून घडला. त्यानं कुठंतरी मर्यादा सोडली, काढूं नये अशी कांहीं खोडी त्या पुरुषानं त्या स्त्रीची काढली. तुझ्या माझ्या संबंधांत तर ह्या प्रकारचा वस्तुस्थितीचा विपर्यास फार सहज होऊं शकेल. कारण तुझ्या नवऱ्याचं नांव जसं अगदीं शिक्कामोर्तब वाईट आहे, तसं तुझं नाहीं. तुझा नवरा भेटला तर तुला कधीं सटीसहामाशीं भेटतो. एरवीं त्याचा बहुतेक वेळ कधीं काशीच्या गाणारणीकडे, तर कधीं लखनौच्या एखाद्या नाचणारणीकडेच कारणीं लागतो, हें सारं जग जाणतें. तुझी श्रीमंत मावशी, आणि तिचें समाजकार्य हाच तुझ्या आजच्या ह्या आयुष्याचा एकमात्र आधार आणि विरंगुळा आहे हेंहि साऱ्यांना ठाऊक आहे. तूं जवळ जवळ परित्यक्ताच आहेस आणि तरीहि काढतां येतील तितक्या भलेपणानं दिवस काढते आहेस असं तुझ्याविषयींचं सर्वसामान्य जनमत आहे. आणि हें जनमत सर्वसामान्यपणें बरोबर सुद्धां आहे. एकंदरींत तूं एक नाडलेली पण हाडाची चांगली स्त्री आहेस असं सुद्धां वाटतं. पण मालिनी, अखेर तू सुद्धां एक स्त्रीच आहेस. कांहींशी मूर्ख आहेस, कांहींशी अनुदार आहेस, कांहींशी स्वार्थीसुद्धां आहेस. थोडी आत्मकेंद्रित आणि थोडी अहंकारी आहेस. कांहींशी मोहवश आणि बरीचशी भित्री आहेस. म्हणूनच जो मोह मला आणि तुलाहि झाला, तो केवळ मलाच झाला असा अप्रत्यक्ष आभास उत्पन्न करतांना तुला संकोच वाटला नाहीं. ज्या अव्यक्त आणि अबोल पापाची वांटणी तुझ्या आणि माझ्यांत निदान समसमान तरी व्हायला पाहिजे, तें पाप संपूर्णपणें माझ्या एकट्याच्या पदरांत बांधतांना तुझा जीव कचरला नाहीं. ह्यांत न्याय नाहीं कीं खेळाडूपणा नाहीं, हेंहि तुझ्या ध्यानांत आलं नाहीं. स्वतःच्या अंगावर येणारी बाजू एखादी अडाणी स्त्री जशी एका उपजत स्त्री सुलभ-प्रेरणेनें स्वतःच्या साथीदार व जोडीदार असणाऱ्या पुरुषावर लोटून मोकळी होते, तसंच तुझं वर्तन झालं. म्हणूनच मी म्हणतों, शिकलेली असलीस तरी अखेर तूं एक स्त्री आहेस. तूं स्त्रीसारखंच वागलीस. तुझं सुशिक्षित पाटव मला तरी एखाद्या अक्षरशत्रू बाईच्या अशिक्षित पाटवाइतकच क्षुद्र वाटतं. पुरुषांत बरोबरीच्या नात्यानं मिसळणाऱ्या तुम्हा सुशिक्षित स्त्रियांची मला हीच मोठी मौज वाटते. पुरोगामी समानतेचा डौल मिरवायला तुम्ही जितक्या पुढें असतां, तितक्या परिणामाचा वांटा उचलायला नसतां. नावागांवाचा आणि कीर्तीचा वांटा तुम्हाला हवा असतो. पण अपकीर्तीचे विंचूकांटे तुम्ही निःशंकपणें पुरुषाच्या अंगावर झटकून टाकतां. मग तुम्हांला तुमच्या स्त्रीत्वाची आठवण होते आणि स्वतःला वांचविण्यासाठीं खुशाल तुमच्या जोडीदार पुरुषावर कुभांड रचतां, बालंट घेतां. हें कधीं तुम्ही प्रत्यक्ष रीतीनें करतां, तर कधीं अप्रत्यक्ष प्रकारें करतां. कधीं बोलून करतां, तर कधीं न बोलतां करतां.

माझ्यावर जें कुभांड येऊं पाहत आहे तें तूं न बोलतां आणि न बोलून आणलेलें कुभांड आहे. तूं मुक्यानं रचलेलं हें बालंट कांहीं कमी भयंकर नाहीं. अर्थात् तें खोटं आहे. पूर्णपणें खरं नाहीं. माझ्यावर जो दोष ह्यापुढें लावला जाणार आहे, त्यांत अर्ध्यापेक्षां अधिक वांटा तुझा आहे. निदान अर्धा वांटा तरी तुझा आहेच!

तुझ्या विषयांत मी कुठला तरी अतिप्रसंग केला म्हणून तूं मला तोडून टाकलंस, असंच लोक माझ्याविषयीं बोलणार आहेत. तूं नाडलेली होतीस, त्याचा गैरफायदा घेण्याचा मी प्रयत्न केला; तूं अनुभवी, भाबडी आणि विश्वास ठेवणारी होतीस, त्याचें मी हीन बुद्धीनं भांडवल करण्याची इच्छा धरली आणि तूं हाडाचीच सालस होतीस, म्हणून अखेरच्या क्षणीं जागी होऊन तूं मला झिडकारून टाकलंस, असंच लोक आतां म्हणणार आहेत. लोकांना तसं वाटावं अशीच व्यवस्थेनं बोलतां तूं केली आहेस. तूं निदान माझ्याइतकी तरी वाईट किंवा बरी आहेसच.. हें सार्वजनिक रीतीनं सिद्ध करीत बसणं मला क्षुद्रपणाचं वाटतं. कां? कारण मी पुरुष आहे. माझ्या पौरुषाचा मला गर्व आहे लोक आतां माझ्याविषयीं जें कांहीं बरंवाईट बोलतील, तें सोसण्याची व पचविण्याची माझी बुद्धि आहे, माझी दानत आहे. तूं रचलेल्या बालंटापासून स्वतःचं संरक्षण करायचं म्हटलें, तरी तुझ्या-माझ्या वैयक्तिक संबंधांतल्या किती तरी पवित्र गोष्टी मला उघड कराव्या लागतील. मला त्यांचं प्रदर्शन मांडावं लागेल. तें मला करायचं नाहीं. तें मी करणार नाहीं, हें तुलाहि ठाऊक असलें पाहिजे. म्हणूनच तुझं कुभांड तूं इतक्या निश्चिंत मनानं रचलंस. मी दोष पत्करीन,

अपकीर्ति पत्करीन, अपसमज पत्करीन, पण तुझ्या-माझ्या बिघडलेल्या संबंधांची सार्वत्रिक चर्चा करीत बसणार नाहीं, स्वतःचं समर्थन देणार नाहीं, तुझा धिक्कार करणार नाहीं, हें तूं उत्तमप्रकारें जाणतेस. हा झाला तुझ्या सुशिक्षित पाठचाचा भाग, तुझ्या स्त्रीसुलभ बुद्धीचा भाग. पण तुझे-माझे संबंध ज्या प्रकारच्या अबोल सार्वजनिक प्रदर्शनानें तूं संपवलेस तो आहे तुझ्या मूर्खत्वाचा भाग. तुझ्या सुप्त स्वयंकेंद्रित स्वार्थाचा भाग. तुझ्या भीरुतेचा भाग. मी विचारतों, तुझे-माझे संबंध संपवण्याचा हा एवढा एकच मार्ग तुला सुचावा का? सार्वजनिक साक्षीपुराव्यानें ते संबंध संपवण्याची कांहीं आवश्यकता होती काय? तुझ्या-माझ्यांत घडलें तें मुळांतच इतकें चुटपुटतें, इतकें तरल होतें कीं, तें शब्दांत धरणें, त्याचें अस्तित्व सिद्ध करणें, जवळ जवळ अशक्य होतें. आतां आपल्या वृत्तीने व वर्तनानें जें फार संदिग्ध होतें, त्याचें अस्तित्व तूं फार निखालसपणें सिद्ध करीत आहेस. जी गोष्ट अगदीं अस्फुट होती, जिनें नीटसा आकारहि घेतला नव्हता, ती नष्ट करण्यासाठीं येवढ्या आकस्ताळ्या अट्टाहासीची खरोखरच काय आवश्यकता होती?

कुणावरही अन्याय न करतां आणि कुणालाहि दुखापत न होतां, आपले संबंध आपल्याला औपचारिक शिष्टाचारांच्या मर्यादेंतहि संपवितां आले असते. पण तसें तूं केलें नाहींस. कळून किंवा न कळून तुला आपल्या सद्गुणांचें व संयमाचें प्रकटन करावयाचें होतें व माझ्या असंयमाची द्वाही फिरवावयाची होती. स्वतः विषयीं केवळ लोकांचीच नव्हे तर स्वतःचीही निश्चिती तुला पटवून घ्यावयाची होती. म्हणून आत्मवंचना, परवंचना व विपर्यास हें मूल्य तुला फारसें भारी वाटलं नाहीं. पुन्हा जें कांहीं मूल्य भरावयाचें तें मी भरणार होतों. अपराधी मी होतों, असंयमी मी होतों, वर्तन माझेंच आक्षेपार्ह होतें. त्याविना का तुझ्याइतकी सभ्य, सुशील खेळीमेळीनें वागणारी मुलगी माझी मोठ्या अगत्यानें करून घेतलेली ओळख टाकील? बोलणारें असेंच बोलतील. पण मी तुला विचारतों, हें खरें आहे काय! मोह मला झाला. शिष्टाचार मी सोडला हें संपूर्ण सत्य आहे काय? तूं तुझी इच्छा दर्शवीपर्यंत मी तुझी संगत कधीं शोधली होती काय? तुझी बुद्ध्या ओळख करून घेण्याचा प्रयत्न माझ्याकडून झाला

होता काय ? तुला आठवत असेल, आणि निदान मनोमन सत्य तूं मान्य करणार असलीस, तर वस्तुस्थिति बरोबर उलटी आहे. माझें कुठलें तरी लिहिणं तुला फार आवडल्याचें तूंच तुझ्या-माझ्या एका परिचितापाशीं बोलली होतीस. तें लिहिणें तुला इतकें आवडलें होतें कीं, तें सारेंच्या सारें तूं पाठ करून टाकलें होतेंस. तुझी आणि माझी पहिली भेट आणि पहिली ओळख झाली, तेव्हां माझा तो लेख मोठ्या उत्साहानें म्हणून दाखवावयास तूं प्रारंभ केलास. संकोचल्यासारखें होऊन मी तुला अडविलें नसतें, तर तो ज्ञाच्या सारा लेख तूं मला म्हणून दाखविला असतास. तुझा तेव्हांचा उल्लास आणि उत्साह अगदीं उघड होता. तूं विचारशील, एखाद्या कलाकृतीविषयीं व त्या कलाकृतीच्या निर्मात्याविषयीं असा उत्साह वाटणें हा कांहीं अपराध आहे काय ? ही प्रतिक्रिया कुठल्याहि रसिक, प्रांजल व सुसंस्कृत मनावर होणें साहजिकच नाहीं काय ? आपला आनंद तूं इतक्या निःशंकपणें व्यक्त करावास हें तुझ्या निर्मल मनाचें व निरोगी वृत्तीचेंच द्योतक नव्हतें काय ? एका परीनें हे सारे प्रश्न बिनतोड आहेत. तात्त्विक दृष्टीनेंच पाहिलें तर ह्या साऱ्या प्रश्नांचीं उत्तरें होकारार्थीं देणें प्राप्त आहे. पण उलट मी तुला विचारतों, तुझी सारी दृष्टी शुद्ध तात्त्विकच होती ना ? माझ्याविषयीं तूं जेवढा उत्साह दाखविलास तेवढाच एखाद्या तरुण स्त्रीविषयींदेखील दाखविला असतास काय ? कुठल्याहि क्षेत्रांत पराक्रम गाजविणाऱ्या पुरुषाकडे स्त्रिया जेव्हां आकर्षित होतात, तेव्हां त्यांची भूमिका शुद्ध कौतुकाचीच असते काय ? तीच भूमिका त्यांना टिकवतां येते काय ? ती भूमिका टिकवून धरणें हा खरोखरच त्यांचा हेतू असतो काय ? कीं स्त्री-पुरुष भेदातीत कौतुकाचें व आदराचें पर्यवसान अखेर ईश्वरनिर्मित स्त्रीपुरुष भेदावर आधारलेल्या कुठल्या तरी भावनेंत व आकर्षणांत होतें ? हें पर्यवसान पुष्कळदां परिस्थितिसापेक्ष व स्वभावसापेक्ष असतें हें खरें आहे. प्रारंभींच कुणावर कसला जाणता अथवा नेणता हेतू कसा लादतां येईल ? तो आंतरिक हेतू पुष्कळदां आपला आपल्यालाहि कळत नाहीं. म्हणूनच स्त्रीपुरुषांच्या भेदातीत मित्रत्वाची ऐसपैस भूमिका कुणालाही घेतां येते. ती भूमिका तुलाहि घेतां येईल व ती तूं अवश्य घेशील. स्मरणांत इतकेंच असूं दे कीं माझ्या परिचयाची व मित्रत्वाची इच्छा तूं व्यक्त केली होतीस. ही इच्छा तुझ्यासारख्या एकाकी स्त्रीनें बाळगिल्याविषयीं मी तुला दोष देत नाहीं. विशुद्ध स्त्रीपुरुष स्नेहाची शक्यता मी मानतों. म्हणूनच तुझा स्नेह मी जोडला व माझा स्नेह तुला जोडूं दिला. आंतरिक उद्देश ?—नाहीं. असें कांहीं जाणते उद्देश मी ठेवले नव्हते. कुठल्याहि स्त्रीविषयीं मी उद्देशापासून प्रारंभ करीत नाहीं. ह्या विषयांत खरोखरच फारशी भूक मला उरलेली नाहीं. तूं स्वतःसाठीं घालून घेतलेल्या नीतीच्या व शिष्टाचाराच्या कुठल्याही मर्यादा मीहो अगदीं कांटकोरपणें पाळल्या असत्या. एवढें मी तुला अगदीं निश्चितीपूर्वक सांगतों. मला वाटतें, निश्चयानें कांहीं विशिष्ट मर्यादा घालूं इच्छिणाऱ्या कुठल्याहि सन्मान्य स्त्रीला कुठलाहि सर्वसामान्य पुरुष त्या मर्यादेबाहेर ओढण्याचें धाडस सहसा करीत नाहीं. त्या प्रकारचें अशिष्ट व असंस्कृत साहस करण्याचा विचार मला कधीं स्वप्नांतही शिवला नाहीं. स्त्रीनें स्त्रीत्वाच्या मर्यादा सांभाळाव्यात हेंच खरोखर मला आवडतें. त्या मानरेषेवरून कुणाहि स्त्रीला विचलित करण्याची वासना मी आजन्मांत कधीं बाळगिली नाहीं. पण ती स्त्री स्वतःच विचलित झाली तर ? तर मात्र माझेंहि कुतूहल जागें होण्याचा फार संभव असतो. कुतूहल हा तर माझ्या आयुष्याचा आत्मा आहे. मी स्वतःला कोणी मनोनिग्रही साधुपुरुष म्हणवीत नाहीं. कुतुहलजनक घटनांचा केवळ त्या कुतुहलासाठीं पुष्कळदां मी पाठलाग करीत जातों. त्यांत पापाची वासना सहसा असत नाहीं. पण त्या वासनेच्या आकस्मिक उत्पत्तीची शक्यता मात्र मी नाकारीत नाहीं. मी इतकं मात्र निक्षून सांगतों कीं, कुणी साद घातल्याविना मी पडसाद देत नाहीं. वासनेची चाहूल मला कुणी दिली नाहीं. तर वासना माझ्याहि मनांत उत्पन्न होत नाहींत. आतां तूं मला इतकंच सांग, वासनेची चाहूल तुझ्या मनांत आणि वर्तनांत उत्पन्न झाली होती कीं नाहीं ? तुझी आणि माझी ओळख झाल्यावर जमेल तेव्हां आपण भेटत होतों. तुझ्याकडे नियमित येणं माझ्या फिरत्या आयुष्यक्रमामुळं मला कधींहि शक्य झालं नाहीं. परंतु शक्य होईल तेव्हां मी तुझ्याकडे येत असे. माझ्या येण्यामुळें तुला आणि तुझ्या मावशीलाहि आनंद झाल्याचा मी पहात होतों. परंतु तुम्हां दोघींच्या आनंदाचा प्रकार मला सारखा वाटला नाहीं. तुझी मावशी विधवा, श्रीमंत आणि एकटी होती. आणि तूं सधवा, सुखवस्तू व एकटी होतीस. जुन्या सुधारकांत उथळ, दिखाऊ आणि अहंमन्य माणसांचा जो एक नमुना होऊन गेला, त्यापैकीं तुझी मॅट्रिक मावशी मला एक वाटली. माझ्यासारखा माणूस तिच्या घरीं येतो, ह्याचंच तिला मोठं कौतुक वाटे. माझ्याशीं बरोबरीचा आव आणून फार आढ्यतेच्या, पण फार मूर्खपणाच्या गोष्टी बोलतांना तिला विलक्षण आनंद होत होता. आपण किती कलदार सुधारक आहोंत हें सिद्ध करून दाखविण्यासाठींच मला वाटतं, एक दिवस तिनं मला तुला फिरायला घेऊन जायला सांगितलं. तिची ती सूचना ऐकून मला कांहींसं आश्चर्य वाटलं. कारण स्त्री-पुरुषांनीं घरांत मोकळेपणानं गोष्टी करीत बसणं वेगळं आणि संध्याकाळच्या वेळीं एकत्र फिरावयास जाणं वेगळं. तसंच म्हटलं तर ह्या एकत्र फिरण्याला तात्त्विक आक्षेप कोणता आहे ? स्त्री आणि पुरुषांत भेद नसेलच, तर दोन पुरुष जसे परस्परांबरोबर फिरायला जातात, तसेच दोन स्त्रीपुरुषांनीं जाण्यांतहि आक्षेप असूं नये. पण तुझ्या मावशीची ती सूचना ऐकतांच तुझ्या चेहेऱ्यावरचा रंग पालटला. मला वाटतं, तुझा चेहेरा जितका संकोचला, तितकाच सुखावला आणि तुझ्या मावशीची तुलाहि थोडी धाडसी वाटलेली ती सूचना तूं तत्काळ मान्य केलीस. तूं कपडे पालटायला गेलीस, तेव्हां तुझी मावशी मला म्हणाली, "अधून मधून तुम्ही हिला अशीच जरा बाहेर नेत चला. एखादे वेळीं सिनेमाला सुद्धां न्या." "ठीक आहे. पण यांच्या यजमानांना हें आवडेल कां ?" "तो कुठें हिची आवडनिवड पाहतो आहे ? आणि त्याच्या आवडीनिवडीला विचारतो कोण ? मी तर तिला म्हणते आहे, तूं आपली घटस्फोट घेऊन मोकळी हो ! पण हिलाच तेवढा धीर होत नाहीं."

त्यानंतर आपण दूर फिरायला गेलों. चांदण्यांत आपण किती वेळ तरी फिरत होतों. तुझी नेहमींची वेषभूषा मी पाहिली आहे. ती अर्थातच नीटनेटकी असते. पण मला असं वाटतं कीं, त्या दिवशीं तूं कटाक्षानें चांगले कपडे केले होतेस. तुझ्या वृत्तींत वेगळाच उल्हास दिसत होता. गांवांतून चालतांना तूं माझ्यापासून थोडं अंतर ठेवून चालत होतीस. गांवाबाहेर गेल्यावर तें अंतर तूं फार कमी केलंस. तें अंतर तूं इतकं कमी केलंस कीं चालतांना तुझा हात माझ्या हातांना पुन्हा पुन्हा स्पर्श करूं लागला. तुझा हात माझ्या हाताला प्रथम लागला, तेव्हां मी "सॉरी" म्हणून थोडा दूर झालों. पण माझा तो उद्गार जणूं तूं ऐकलाच नव्हतास. मी उत्पन्न केलेलं अंतर तूं पुन्हा तोडलं होतंस आणि तुझा हात माझ्या हाताला पुन्हा पुन्हा स्पर्श करीत होता. मी मान्य करतों, त्या नंतर तुझा




तो स्पर्श टाळण्याचा मी प्रयत्न केला नाहीं. त्या स्पर्शाविषयींची तुझी आसक्ति मी ओळखली आणि मग माझ्याहि मनांत आसक्तीची लाट उठली. पण माझ्या मोहवशतेकडे माझें लक्ष होतें. तूं टाकलें होतेंस त्यापुढचें पाऊल मी टाकलें नाहीं. तसें कुठलेंहि पाऊल मला टाकावयाचें नव्हतें. तूं मोडशील तेवढ्याच प्रमाणांत मी तुला मर्यादा मोडूं देणार होतों. एखादें नाटक पहावें तशीं मी तुझी व माझी प्रत्येक हालचाल पहात होतों. त्या नाटकांत मी काम करीतहि होतों व माझें काम मीं पहातहि होतों. इतपत बुद्धीची सावधानता तेव्हांहि मी ठेवली होती. एकीकडे तुझ्या स्पर्शानें मी थरारत होतों व दुसरीकडे माझ्या अंगावर येणारा वासनेचा कांटा मी पहातहि होतों. तूं विचारशील, दोन माणसें परस्परांबरोबर चालत असतांना त्यांचे हात एकमेकांना लागत नाहींत काय ? त्या स्पर्शांत अपरिहार्यपणें पापच असतें काय ? दोन पुरुषांचा एकमेकांना स्पर्श होत नाहीं काय ? मालिनी, हे सारे पायघोळ प्रश्न माझ्या परिचयाचे आहेत. मी तुला उलट विचारतों, दोन पुरुषांना किंवा दोन स्त्रियांना एकमेकांच्या स्पर्शाविषयीं सामान्यपणें कधीं आसक्ति वाटत असते काय ? त्या स्पर्शानें त्यांच्या अंगावर कधीं कांटा येतो काय ? त्या स्पर्शाच्या वेडांत कधीं तूं दाखविलीस, तशी लयदार शिस्त असते काय ? ह्या साऱ्या शंकाहि माझ्या परीनें मी लवकरच फेडून घेतल्या. तुला आठवतं ? एकदां आपण रिक्षां-तून लांब गांवाबाहेर फिरायला गेलों होतों. ही रिक्षांतून फिरण्याची कल्पनाहि तूंच मला सुचविलीस. "मला पायीं फिरायला आवडतं" असं तूं प्रथम मला सांगितलं होतंस. मग "आतां तंगड्या तोडत फिरायचा मला कंटाळा येतो. आपण रिक्षांतून जाऊं" असंहि तूंच म्हणूं लागलीस. तुझं हें मतांतर मला जितक कुतूहलजनक तितकंच अर्थपूर्ण वाटलं. तूं टॅक्सीचं नांव काढलं नाहींस, टांग्याचं काढलं नाहींस, बसचं काढलं नाहींस, नेमकं रिक्षा नांवाचं तें निरुंद वाहन तूं आपल्या सहलीसाठीं निवडलंस. आतां रिक्षा हें वाहन प्रेमांत पडूं पाहणाऱ्या अविवाहितांना, किंवा नुकत्याच प्रेमांत पडलेल्या उत्साही उमेदवारांना किंवा नव्यानेंच लग्न झालेल्या दांपत्याला अनेक दृष्टींनीं फार सोयीचें आहे. ठेवूं म्हटल्यानें ह्या वाहनांत बसलेल्या दोन माणसांना परस्परांत फारसें अंतर ठेवतां येत नाहीं. वाहन वळलें कीं, सहजच माणसें येथें एकमेकांवर रेलतात आणि आदळतात. त्यांचा एकमेकांना सतत स्पर्श होतो व न बोलतांच कितीतरी गोष्टी उमगतात व सांगतां येतात. तरीहि या वाहनांत फार जपून व अंग चोरून बसण्याऱ्या बायका मी पाहिल्या आहेत. अगदीं निरुपायास्तव टींच झाला तर त्यांचा शेजारच्या पुरुषांना स्पर्श होतो. तो स्पर्श निरुपायाचा किंवा नेणता आहे हें सांगावें किंवा सिद्ध करावें लागत नाहीं. तें आपोआपच कळतें. आपण त्या दिवशीं रिक्षांत केलेल्या प्रवासांत तुझा तो स्पर्शाचा हव्यास पुन्हा माझ्या प्रत्ययाला आला. माझा स्पर्श टाळण्याचा निसटता प्रयत्नहि तूं केला नाहींस. उलट मला अगदीं स्पष्टपणें कळत होतें कीं तुला तो स्पर्श हवा आहे. सिगरेट घेण्यासाटीं म्हणून त्या वाहनांतून मधेंच एकदां मी उतरलों होतों. पुनः मी आंत बसलों, तो तुझ्या माझ्यांत ठेवतां येईल तेवढें अंतर ठेवून. तुझ्या मनाचा पडताळा पाहण्याचीच माझी इच्छा होती. रिक्षा चालू झाली आणि आपण बोलूं लागलों. पण तूं अस्वस्थ होतीस. तुला केवळ माझ्याशी संभाषण नको होतें. तुझ्या-माझ्यांतलें शारीरिक अंतर कसें तोडावें ह्या विचारानें तूं त्रस्त होतीस. तुझी अडचण मी ओळखली व तत्काळ दूर केली. "नीट बसा ना" मी म्हणालों, "असा अवघडून कां बसतां ?"








अनुक्रमणिका

आणि मग क्षणाचाहि विलंब न लावतां तूं मजपाशीं सरकून मला अगदीं खेटून बसलीस. माझ्या शब्दांचा बिनचूक एकच अर्थ तूं लावलास. मनमोकळेपणा? शारीरिक भेदाविषयींची संपूर्ण विस्मृति! लिंगभेदाविषयीं आटोकाट औदासिन्य? ठीक आहे. वाटल्यास तूं तसें म्हण. पण तें खरें नव्हतें व खरें नाहीं. आपलें तें फिरणें संपल्यावर तुझ्या वृत्ती अधिकच उल्हासित झाल्या होत्या. तुझ्या चेहेऱ्यावर रंग चढला होता. जेवणासाठीं त्या रात्रीं तूं मला तुझ्याकडे ठेवून घेतलेंस. आपण शेजारीं जेवावयास बसलों होतों व तुझी मावशी आपल्याला वाढत होती. फार आग्रहानें मला तूं खाऊं घालत होतीस. चिरोट्यांची एक चळत माझी अगदीं इच्छा नसतांना तूं माझ्या पानांत टाकलीस. "खा-खा" तुझी मावशी म्हणाली, "You are a young man" पण "यंग" असलों म्हणून काय झालें? बकासुराला अजीर्ण करील असा तुझा तो आग्रह होता. "खरोखर मला इतके चिरोटे जाणार नाहींत." तुझ्या मावशीची पाठ वळलेली पाहून चटकन् माझ्या पानांतले दोन चिरोटे तूं तुझ्या पानांत घेतलेस. तुझ्या मनाची दिशा आतां मला ठाऊक झाली होती. तरीहि तुझ्या त्या कृत्यानें क्षणभर मी चकित झालों. अर्थात त्या कृतीचेंहि अगदीं सोवळें समर्थन तुला देतां येईल. तें केवळ एक मनमोकळ्या मित्रभावनेचें, अपवादात्मक आपुलकीचें कृत्य होतें. ठीक आहे. वाटल्यास तूं तसें म्हण. पण मला तें खरें वाटत नाहीं. तुझ्यासारखी एखादी विवाहित स्त्री जेव्हां एका परपुरुषाच्या पानांतला उष्टा घांस घेते, तेव्हां त्या कृतीला फार वेगळा अर्थ येतो. तुझें तें कृत्य अगदीं शुद्ध व सात्त्विक होतें, असेंच तुला वाटतें काय? तुला न आवडणाऱ्या कुठल्याहि पुरुषाच्या पानांतला घांस तूं घेशील काय? आवड व्यक्त करण्याची व आपुलकी दाखविण्याची तुझी ही पद्धत बरीच आक्षेपार्ह व फारच संशयास्पद आहे असें मला वाटतें. मौजेची गोष्ट अशी कीं, माझ्यावर आपुलकीचा एवढा वर्षाव करीत असतां माझ्या बायकोची चवकशी तूं जवळ जवळ कधीं केलीच नाहींस. तुझ्या लेखीं तुझा नवरा जसा अस्तित्वांत नव्हता, तशीच माझी बायकोहि अस्तित्वांत नाहीं असेंच तूं धरून चाललेली होतीस. ज्या बाईच्या नवऱ्याबरोबर तूं सायंकाळच्या सहली करीत होतीस आणि जेवण घेत होतीस, त्या बाईला ह्या कार्यक्रमासाठीं निमंत्रण देणें तुला आवश्यक वाटत नव्हतें. एवढेंच नव्हें तर



*विजेपरी तूं आलिस जेव्हं धक्का देउनि मला*
*तेव्ह पासुन त्या स्पर्शानें चिकटुन बसलों तुला ?*

—वसंत सबनीस

ती गोष्ट तुला फार जड वाटत होती. एकदां कापडहाटांतून तुला कांहीं साड्या विकत घ्यायच्या होत्या. तुझ्याबरोबर साड्या पहायला मी यावें असें तूं सुचविलेंस. "ह्या विषयांत माझ्यापेक्षां माझ्या बायकोला अधिक कळतें" असें मी म्हटलें, तेव्हां मोठ्या कष्टानें तूं उत्तर दिलेंस. "बरं मग त्यांना सुद्धां घेऊन या." तुझ्या निमंत्रणांत उत्साहाचा लवलेश नाहीं हें माझ्या तत्काळ ध्यानांत आलें. तरीहि माझ्या पत्नीला मी बरोबर घेतलें. तुला एकदां पाहण्याची तिची इच्छा होती. तुझ्या वर्तनांतला नेहमींचा उत्साह व गोडवा, माझ्या बायकोच्या अनुभवाला कांहीं तूं आणून दिला नाहींस. कापडहाटांतून हिंडतांना अर्थात्च मी माझ्या बायकोबरोबर चालत होतों. माझी बायको बरोबर असतांना मी तुझ्याबरोबर चालणें कसें शक्य होतें? अर्थात तूं एकटी पडलीस. तुझा चेहेरा उतरून गेला. माझ्या बायकोशीं तूं रुक्षपणानें वागलीस. तिच्याहि तें लक्षांत आलें व ती हळूच मला म्हणाली, "ही बाई चांगली असेल; पण हिला तुम्ही एकटे हवे होतात. हिला मी नको होते."

मलाहि हुबेहुब तसेंच वाटत होतें. आतां तूं तें नाकारशील; पण खरी गोष्ट तीच आहे. तूं म्हणशील, आम्हा दोघांना जोडीनें चालतांना पाहून तुला तुझ्या एकटेपणाची जाणीव झाली व म्हणून तुझा चेहेरा उतरला, म्हणून तूं माझ्या बायकोशीं तुटकपणें वागलीस. पण हें कांहींच मला खरें वाटत नाहीं. माझ्या बायकोलाहि खरं वाटलं नाहीं माझ्या बायकोचें ह्या विषयांतलें मत विश्वसनीय नव्हें असें तूं म्हणशील. सामान्यतः कुठलीहि बायको आपल्या नवऱ्याच्या मैत्रिणीविषयीं हेंच बोलेल असें स्पष्टीकरण तूं देशील. तुझ्या ह्या बोलण्यांत कांहीं तथ्यांश आहे हें एरवीं मी मान्य केलें असतें. पण माझ्या बायकोच्या विषयांत तुझें विधान मान्य करणें मला कठीण वाटतें. तुला ठाऊक नसेल, पण तुझ्या-माझ्या सहलीचें व सहभोजनाचें इतिवृत्त माझ्या पत्नीला मी पूर्वींच दिलें आहे. सुरवातीला तर तुझ्या अवस्थेविषयीं तिला कींवहि वाटत असे. "ह्या मालिनीला मला एकदां पहायचं आहे" असं ती पुष्कळदां मजपाशीं म्हणाली होती. पण तिला भेटण्याची उत्सुकता तूं कधीं दर्शविली नाहींस आणि तिची व तुझी भेट झाली, तेव्हांचें तुझें वागणें जिव्हाळ्याचें तर नव्हतेंच, पण औपचारिक शिष्टाचाराचेंहि नव्हतें.

त्यानंतर कित्येक आठवडे आपली भेट झाली नाहीं. मग आपली भेट झाली ह्या लग्नसमारंभांत. आणि काय आश्चर्य सांगावें! ह्या भेटींत तूं मला ओळखहि दाखविली नाहींस. शब्दानें नाहीं, स्मितानें नाहीं, नमस्कारासारख्या एखाद्या निःशब्द उपचारानें नाहीं! ह्या मधल्या अवकाशांत तुझ्या मनात काय घडामोडी झाल्या असतील तें तुझें तुला ठाऊक. कदाचित तुला मी फार मंद वाटलों असेन, थंड वाटलों असेन, घडाडींत फार उणा वाटलों असेन, निष्क्रिय वाटलों असेन, निराशाजनक वाटलों असेन, फाजील संयमी किंवा विशेष धूर्त वाटलों असेन. कदाचित् हेंहि शक्य आहे कीं, खरोखरच तुझें मन पालटलें असेल. तुला पश्चात्ताप झाला असेल. ह्यापुढें जपून वागण्याची तुझी इच्छा असेल. तुझ्या कुठल्याहि वाटण्याला वा वागण्याला माझा आक्षेप असण्याचें कारण नाहीं. तुझें व माझें जे कांहीं संबंध होते, ते टिकलेच पाहिजेत असाहि माझा आग्रह नाहीं. पण मी तुला इतकेंच विचारतों कीं, अगदीं अकस्मात व अगदीं पूर्णपणें तुटलेल्या तुझ्या माझ्या संबंधाविषयीं तूं लोकांत कुठल्या प्रकारचें स्पष्टीकरण आणि समर्थन देणार आहेस? कारण तुझ्या इतक्या आमूलाग्र पालटलेल्या वृत्तीचें स्पष्टीकरण

कुणी ना कुणी तुजपाशीं मागणारच आहे. कुणी ना कुणी मागितलेंहि असेल. त्यांना तूं काय काय सांगितलेंस किंवा काय सांगणार आहेस? "तुम्हांला तर तो माणूस ठाऊकच आहे" असें तूं म्हणशील? "तो माणूस असा असेल ह्याची मला प्रथम कल्पनाच नव्हती" असें म्हणशील? "आजकाल कुणाशीं चांगुलपणानं वागण्याची मुळीं सोयच नाहीं" असं म्हणशील? का "हे पुरुष इथून तिथून सारखे" असं म्हणशील? तूं कांहींहि म्हणालीस तरी तें सत्य असणार नाहीं. तूं कुठलेंहि स्पष्टीकरण दिलेंस तरी तें प्रामाणिक असणार नाहीं. वस्तुस्थितीचें तें संपूर्ण चित्र असणार नाहीं. तें केवळ एक तुझ्या वर्तनाचें तूं दिलेलें समर्थन असेल. तें केवळ एक कुभांड असेल. तुझ्या इतिवृत्तांत तूं कांहीं घटना उठावानें मांडशील व कांहीं पूर्णपणें गाळशील. शब्दांचे ते अर्थ तूं फिरवशील. व कृतीचा अर्थ चुकीचा लावशील. आपण किती चांगल्या आहोंत हें सिद्ध करण्यासाठीं मी किती वाईट आहे हें तूं आपोआपच सांगशील किंवा सुचवशील. कांहीं न बोलतां तूं नुसती गप्पा बसलीस, नुसतें नाक उडविलेंस, किंवा मानेला हिसडा दिलास, तरीहि त्याचा अर्थ तोच होईल. एका कुभांडाला तेवढा अबोल अभिनय पुरतो. येवढें भांडवल बस होतें हें तुलाहि ठाऊक असेल. वस्तुतः आपला संबंध संपविण्यासाठीं ह्या कुभांडाची कांहीं आवश्यकता नव्हती. तूं चांगली आहेस हें सिद्ध करणें आवश्यकच आहे काय? ह्या तुझ्या प्रयत्नांत कदाचित् तुला वाटेल तेवढें यशहि तुझ्या पदरांत पडणार नाहीं! येवढ्या वाईट माणसाच्या सहवासांत इतके दिवस तूं अगदीं निर्लेप राहिलीस तरी कशी अशी शंका घेणारेहि कांहीं विचक्षण निघतील. तूं आणि मी ह्यापैकीं कोणीच निर्लेप नाहीं असा निष्कर्ष ते काढतील. हा निष्कर्ष सत्याच्या फार जवळ आहे; पण तो तुला मानवेल का? मी बोटहि न उचलतां हें कुभांड कदाचित् तुझ्याच अंगावर कोसळेल, ह्याची तुला कल्पना आहे का? पण हें सारं तुला सुचलें तर मग तूं स्त्री कसली? कारण सुशिक्षित झालेस, सुधारलेली असलीस, तरी अखेर तूं स्त्रीच आहेस. पूर्वापार स्त्रिया वागत आल्या तशीच तूंहि वागली आहेस.

आणि पूर्वापार पुरुष वागत आले, तसाच मीहि वागणार आहे. तुझ्या कुभांडाचा कुठलाहि शाब्दिक व अन्य प्रतिकार मी करणार नाहीं. तूं माझी ओळख दाखवलीस किंवा टाकलीस तरी त्याचें मला सोयरसुतक नाहीं. तुझ्याविषयीं मला मोठासा स्नेह नव्हताच. प्रेम अर्थातच नव्हतें. होतें केवळ कुतूहल! आणि तें कुतूहल आतां संपलें. वर्तनाचा एक नवा नमुना मी पाहिला, एक नवी गोष्ट मला मिळाली. तेथेंच तुझें अवतार-कार्य माझ्यापुरतें संपलें. धन्यवाद मालिनी!

• • •

**अट्टाहास!**

हजारों बाजारीं कविवर कवित्वास विकती
'रसज्ञांनो घ्या घ्या' म्हणुनि विनयानें विनवती
तरी यांनीं द्याया फुकट फुटकी एक कवडी—
जगापाशीं नाहीं; तरिहि कवि आयुष्य दवडी!

—कै. बोडस

# निःश्वास



'सिनिक्'

*भरतीच्या लाटा उसळत होत्या. समुद्रकिनारा लाटांच्या रौद्र संगीतानें निनादून गेला होता.*

*लाटा जणुं गर्जून येत आहेत असे भासत होतें. लाटांवर हा भावनांचा आरोप करीत असतांना मी वाळूंत पाय रोवले होते. पाण्याच्या तडाख्यानें ते डगमगत, परत फिरणाऱ्या पाण्याबरोबर पायाखालची वाळू सरकत होती. वाळू सरकतांना तळव्यांना गुदगुल्या होत. डोळ्यांत गरगरल्याची बारीक छटा तरळून जाई.*

*वारा शरीरावरोवर लगट करत होता. वृत्ति वहरत होती. त्याच्या शीतल स्पर्शानें खूप हिंदकळावें, हुंदडावें, ओरडावें ही खोड जोरांत डोकं वर काढत होती. सगळें वातावरण असें होतें कीं बेफाट बनावें, बेधडक व्हावें.*

*खारा वारा नाकांत शिरत होता. 'ओझोन' मेंदूला उष्णता पोहोंचवत होता. खाऱ्या पाण्याचे तुषार तोंडावर, गालावर पडतांच स्नायुन् स्नायु रोमांचित होत होता. कानशिलें लाल पडत. बुबुळांत वाफ सामावे. कणाकणांतून यौवनाची साद उठे.*

*भेळवाल्याकडून जादा तिखट-आंबट करवून घेतलेली भेळ जिभेला पोळत होती. प्रकृतीला उत्तेजित करत होती. ओठावरून जीभ फिरवतांना रसनेचें सुख जाणवत होतें.*

*नजर सगळीकडे फिरत होती. सारें पाहत होती. पाहून न पाहिल्यासारखें करत होती. कांहीं कांहीं मात्र अधीरतेनें टिपून घेत होती. आधाशाप्रमाणें आस्वादत होती.*

*एक तरुण आणि तरुणी एकमेकांना बिलगून त्या भरतीचा मनसोक्त आनंद लुटत होतीं. एकमेकांचीं चुंबनें घेत होतीं. अलिंगनें देत होतीं. भोंवतालच्या जगाचें त्यांना भान नव्हतें.*

[अनुक्रमणिका](#)






प्रथम चोरून अन् मग निढावलेल्या दृष्टीनें मी तो शृंगार पाहूं लागलों. चाखूं लागलों. रमलों त्यांत मी. अशी मजा वाटूं लागली........

वासना भुकेजली आणि मला खटकलें कीं मी एकटा आहे ! ती माझ्या कवेंत नाहीं. माझ्यापासून अनत योजनें दूर आहे. कांहींच माझें नाहीं. कशांतच मौज नाहीं.

छेः, ही कां जागा आहे असे चाळे करण्याची? कांहीं औचित्य—? [illegible] कां ह्या लोकांना एकांत लाभत नाहीं. पण येथील खुमारी तिथें कशी येणार? आपल्या नशिबीं नाहीं हेंच खरें !

परंतु सभ्य माणसें अशी वागत नाहींत. कौटुंबिक नागरिक शालीनतेनें वागतात. संयम दाखवतात. नक्कीच ह्या 'संवंशांत' पाणी मुरत असलें पाहिजे. ह्या मुंबईत पैसा खर्च केला तर काय मिळणार नाहीं?

—मग आपल्याला काय हरकत आहे? मला अधिक एकटें वाटूं लागलें. सर्व आहे आणि आपल्याला कांहींच मिळत नाहीं अशा चलबिचलतेंत मी समुद्रकिनाऱ्यावर फेऱ्या मारूं लागलों. किती वेळ त्यांत गेला कळलें नाहीं. मात्र पाणी ओसरूं लागलें होतें. ओहोटी सुरूं झाली होती. जसें पाणी आंत चाललें होतें, तसें थंड रेतीवरून माझे पाय पाण्याबरोबर पाठशिवणीचा खेळ खेळत होते. जिथें पाणीच पाणी होतें, तिथें रेतीच रेती दिसत होती. पाण्याकरतां पुढें जावें आणि तें सारखें कमी व्हावें असा क्रम चालला होता. तोंच जोरांत कुणी तरी ओरडलें, 'मागें फिरा.... मरायचें आहे काय?'

एकदम चटका बसला. कसली तरी तंद्री लागल्यासारखें झालें होतें. ती भंगली. साऱ्या द्रुत हालचाली कशानें तरी भारावून चालल्या आहेत असें वाटत होतें. विकलता होती तीच गतिमान होऊन शरीराला हिसळून होती. त्यांत भान हरपलें होतें. भानावर आलों आणि पुन्हा अस्वस्थ झालों. किती खळबळजनक (Disturbing) अस्वस्थता होती—मरणार होतों मी, —एवढें कळलें नाहीं मला !





**जुनें तें सोनें !**

जुने धान, जुनी पोथी,
जुनें मध, जुना कवि
जैसे जैसे जुनें होती
तैसी गोडी नवी नवी

—कै. वोवडे

**काव्यगायन : शोककथा :**

"एकत्र गुंफून जीवित धागे
प्रीतीचें नर्तन नाचलों मागें—"
एका कोळियानें एकदां आपुलें
प्रेम वाखाणलें उंच स्वरों ॥
—अढाई ऐकून कावली कोळीण
घेई तोंडसुख त्याच्यावरी ॥
"नाचविलें तुला मीच गा बावळ्या
धाग्यामाजीं माझ्या फसलास ॥
कोळी मी, तूं माशी; नर माझें भक्ष्य
मादीचें तूं लक्ष्य—गोड घांस !"
ऐकून हा बोल प्रियतमेचा
कष्टी कोळी लावी फांस धाग्याचा !




**त्या** दिवशीं सारेंच कांहीं विपरीत घडलें.

गोकुळाष्टमीचा दिवस होता. संध्याकाळीं सहज चक्कर मारायला बुधवारांत गेलों. गंध्याच्या दुकानांत हिन्याचा फाया घेतला, तो कानांच्या पाळींत ठेवीत होतों, तोंच पाठीवर थाप पडली; इतक्या जोरात कीं तोल संभाळण्यासाठीं मला दोन पावलें टाकावीं लागलीं; तेवढ्यांत खांद्यावर जाडजूड पंजावी पकड पडली व मी फिरवला गेलों; थोडा चमकलों, बराच चिडलों; वर पाहिलें, पाहतों तो आमचे बालमित्र बंडोबा! देह केवढा प्रचण्ड, मुद्रा किती प्रसन्न!

त्याची माझी भेट आज किती तरी वर्षांनीं होत होती. मी मान वर करून पाहिलें न पाहिलें व त्याचे स्नेहानें ओलावलेले डोळे दिसले न दिसले, तोंच त्यानें मला घट्ट मिठी मारली. दृढ मैत्रीचें असें प्रात्यक्षिक शहरी वातावरणात साजणारें नाहीं अशी जाणीव झाल्यामुळें लगेच मला जरा दूर उभा करून त्यानें माझ्याशीं हस्तांदोलन केलें. हस्तांदोलन कसलें, त्या हिसड्यांत माझा खांदाच उखडून टाकला त्यानें. परस्परांचें अवसान अजमावण्यासाठीं पहिल्वान सुद्धां इतकी चुरशीची सलामी देत नसतील!

बंडोबा मुळापासूनच असा अडदांड. लहानपणीं माझ्या संगतीमुळें तो सुधारला कीं त्याच्या संगतीमुळें मी बिघडलों, राम जाणे; एवढें मात्र खरें कीं माझ्या आग्रहामुळें तो शाळेंत येऊं लागला आणि त्याच्या हौसेसाठीं मी तालमींत जाऊं लागलों. शाळेंत तो कधीं माझ्या वर गेला नाहीं आणि तालमींत मी कधीं त्याला खालीं आणूं शकलों नाहीं. विद्याभ्यास करून आम्ही सरकारी नोकरींत शिरावें अशी आमच्या पालकांची इच्छा; ती आम्ही दोघांनींही धाब्यावर बसवली. मी पांढरपेशा, वहावलों व तुटपुंजी ठेकेदारी करूं लागलों. त्याच्या घराण्याचीं पाळेंमुळें धरित्रींत रुजलीं होतीं. डोकें अभ्यासांत अधू असलें तरी व्यवहारांत बळकट होतें,

*एकमेकांच्या मनाची खुषी असली म्हणजे झालं ... जागेची अडचण काय कशीहि सोडवतां येते!—*

अगदीं त्याच्या मनगटासारखें. खतमातीची लाज वाटूं लागण्यापूर्वीच त्यानें शाळा सोडली व शेती सुरू केली. पांढऱ्या कागदावर पोलादी टोकानें काळ्या रेघोट्या ओढण्यापेक्षां काळ्या मातीवर लोखंडी फाळानें भाग्यरेखा ओढणें त्यानें पसंत केलें. लढाईच्या काळांत गुळाला तेजी आली तेव्हां त्यानें अलोट पैसा कमावला असें मी ऐकून होतों. तो लक्षाधीश झाला होता हें खास, किती लाखांचा धनी होता हें मात्र त्याच्या स्वतःशिवाय दुसऱ्या कोणालाही माहीत नव्हतें.

एवढा श्रीमंत झाला, आतां तरी त्यानें रांगडी रीत सोडावी कीं नाहीं? निदान शिकवायला आमच्यासारखा मास्तर ठेवावा. पण रामाचें नांव. म्हणतो कसा-

"अरे गिरस्ता, सक्काळपून तुझ्यापायीं चार ग्यालन प्याट्रोल जाळलं, अन् आतां हितं गवसलास. चल आतां आमच्यासंगं."

त्याचा अवतार पाहून मला धास्ती पडली कीं आतां माझे सारे नियोजित कार्यक्रम चुकणार आणि रात्रभर होईल त्या धिंगाण्यांत माझा निभाव कसा लागणार? मी विचारलें,

"कुठें चलायचें?"

"चल, चल; जरा हिंडूं, खाऊं, पिऊं, रातभर मजा करूं. पहाटच्या पारीं मला कोपरगांवीं जायला होवं; तिथं माम्दाराम्होरं तारीख हाय."

त्याच्या तावडींतून निसटणें शक्यच नव्हतें. मी मोकळाच होतों. भुकेला होतों, तहानला होतों. त्याच्या पाहुणचाराचा अनुभव घ्यावयास उत्सुक होतों. धुंद वातावरणात त्याच्याशीं जिव्हाळ्याच्या गांवरान गोष्टी छाटावयास उत्सुक होतों, इतका मी शहरी शिष्टाचाराला उबगलों होतों.

मी त्याच्याबरोबर चालूं लागलों.



फरासखान्याच्या हौदासमोर एक मोटर उभी होती. जंगी, दुरंगी, चकाकित, तुळतुळीत व आजतागाईत. चैनीसाठीं, शिकारीसाठीं किंवा जागोजाग मुक्काम करावे लागतील अशा प्रवासासाठीं असल्या गाड्या वापरतात असें मी ऐकून होतों. मला वाटलें दिल्लीहून कोणी बडा अधिकारी तपासणीला आला असेल, त्याची ही गाडी असेल. पण नाहीं, ही गाडी बंडोबाची होती. आम्ही जवळ येतांच गाडीचें दार उघडलें आणि आमच्या मित्रवर्याच्या तोडीचा एक जाडजूड इसम बाहेर आला.

त्याच्या व माझ्या खांद्यावर एक एक हात ठेवून बंडोबा म्हणाला,

"अरे, आपला अप्पासाब गवसला. बामण हाय, पण मर्द हाय अन् दर्दी बी हाय; हो आमचा सोपानराव, माझा मैतर अन् जोडीदार."

सोपानरावानें आंदोलनासाठीं हात पुढें करण्यापूर्वीच खांद्याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें मी त्याला ब्राह्मणी नमस्कार केला. माझ्या आविर्भावांतलें मर्म समजलें नसलें तरी जरा हंसून तो म्हणाला,

"लै दिसापून ऐकत होतों तुमच्या गोष्टी. आज योग आला!"

आम्ही तिघेही गाडींत चढलों.

आंतला सरंजाम पाहून मी चाट पडलों.

एका करंडींत उंची व्हिस्कीच्या तीन बरण्या, बीअरच्या बाटल्यांचें एक खोकें, सोड्याच्या बाटल्यांचा हंपर, आणखी एका करंडींत मसालेदार घमघमाट सुटलेले जेवणाचे डबे, रसरशीत फळांचा भला मोठा करंडा- आज कांहीं विशेष बेत आहे हें मी ओळखलें. हा बेटा खरोखरीच मला धुंदीत हिंडला, कीं दुसरी कांहीं एखाद्या अधिकाऱ्याची सरबराईची योजना फसली व जातां जातां मी दिसलों म्हणून त्यानें दंडवताची बतावणी केली? कोण जाणे, आपल्याला काय करायचें खोल पाण्यांत शिरून?

"गाडी कोठें घेऊं?" ड्रायव्हरनें विचारलें.

"येरंडवण्याला. पहिल्या छूट आपल्या महादबांच्या बंगल्यांत अन् मग त्यांच्या मळ्यांत." बंडोबा म्हणाला.

गाडी निघाली. सिद्धि प्राप्त झालेले पुरुष पाण्यावरून किंवा जमिनीवरून अधांतरीं चालूं शकतात, असें आपण ऐकतों; पाण्यावरल्या लाटांनीं ते हेलकावत नाहींत किंवा जमीनीवरल्या खांचखळग्यांवर ठेंचाळत नाहींत; जशी त्यांची, तशी या गाडीची अलगद गति!

आम्ही नारायण पेठेच्या गेटाजवळ आलों तेव्हां समोरून येणाऱ्या एका छिचोर व बांधेसूद तरुणीकडे माझें लक्ष गेलें. गाडीचा भोंगा वाजतांच ती जरा दचकली व डावीकडे सरकली. तेवढ्यांत तिच्या मुद्रेवर जणूं ओळखीची लकेर चमकली.

"सोपानराव, अरे तुझी ध्यनशी चाललीया पग," बंडोबा उद्गारले.

मालकाच्या व त्याच्या मित्राच्याही मनांतला आशय ओळखण्याइतका चाणाक्षपणा ड्रायव्हरचे अंगीं होता. त्यानें गाडीचा वेग कमी केला व बोळांत वळून कोणाच्याही दारासमोर हमखास नाहीं अशा जागीं ती थांबवली. मागून येणाराजाणारांचें प्रतिबिंब दिसावें म्हणून आरसा इष्ट कोनांत लावला आणि खुणेसाठीं खिडकींतून हात बाहेर काढून ठेवला.

ती येणार कीं नाहीं, या संभ्रमांत थोडा वेळ गेला. तेवढ्यांत भिवयानें खूण केली. तो ओळखून सोपानरावानें डावीकडचें दार किलकिलें करून ठेवलें.

इतक्यांत ती बयां आलीच. आंत येण्यापुरतेंच दार उघडून, ओंचे सांवरीत अंग चोरून ती आंत आली. लगेच दार बंद झालें आणि गाडी चालूं लागली. सोपानरावानें खांदे दाबून बाईला मधल्या सतरं-






जीच्या घडीवर बसवलें. आजूबाजूच्या कोणाची तिच्यावर नजर असलीच तर ती त्यांच्या टेहळणींतून निसटावी यासाठींच ही हालचाल झाली होती हें मी हेरलें. मैदानांत शत्रूचा गोळीबार चुकविण्यासाठीं सैनिकांना मिळेल त्या आडोशाचा आश्रय नाहीं का करावा लागत?

दुरून क्षणभरांत वाटली त्याहून आतां डोळे भरून पाहतांना ती मला अधिक गोजिरी दिसली. काळी सांवळी पण तजेलदार; उंच व सडपातळ गुलछबूच्या छडीसारखी! सौंदर्यस्पर्धेत तिला साम्राज्ञीपद मिळालें नसतें, कदाचित् अंतिम स्पर्धेसाठीं होणाऱ्या प्राथमिक चांचणींतही तिची निवड झाली नसती. जीवनसखी म्हणून नव्हे किंवा स्नेह्यांना नामोहरम करण्यासाठीं बरोबर घेतलेली संध्याकाळची सोबतीण म्हणून नव्हे, एकाद्या दुसऱ्या बैठकीची जोडीदारीण म्हणून निवड करावयाची पाळी येती तर जाणत्यानें सुंदर पुतळ्यांना झिडकारून हिलाच पसंत केलें असतें. इतकें लैंगिक आकर्षण हिच्या अंगीं ओतप्रोत भरलेलें होतें. शरीराच्या सौष्ठवापेक्षां अंतर्यामींच्या प्रेरणांच्या स्फुरणांवर व आवाहनांच्या तीव्रतेवरहि आकर्षकता अवलंबून असते. या बाबतींत ज्याची ओळख त्याला पटते आणि माहितगाराचा अपेक्षाभंग क्वचितच होतो.

एकाद्या नागिणीनें सांदींत वेटोळें घालून बसावें अशी ती पाल्याच्या कडेकडेनें लावलेल्या करंड्यांच्या मधोमध मुटकुळें मारून पडली होती. तिचा देह तसाच लवचिक होता. मानेखालीं घेतलेला हात थोडा वर डोकावत होता. नागफणीसारखा. वाटलें कीं ही तशीच विषारी असावी. विषारी, म्हणूनच आकर्षक.

गाडी थोडी पुढें गेल्यावर बाटल्यांच्या करंडीकडे बोट करून तिनें ओठ मुरडले. तिचा अविर्भाव पाहून बंडोबानें विचारलें,

"इतक्यांत इसरलीस व्हय?"

"नाहीं हो, विसरेन कशी?"

अरे तिच्या. भाषेला पुणेरी वळण दिसतें आहे.

तिच्या ढुंगणावर चापटी मारून सोपानरावानें विचारलें,

"कुठं चालली व्हतीस यवढ्या नखऱ्यांत?"

"जात व्हतें देवळांत," त्याच्याच सारख्या हेल्करी आवाजांत, पण हंसऱ्या मुखावर पदर घेऊन आणि गालावरल्या खळीवर बोट ठेवून, बंडोबाकडे काण्या डोळ्यानें पहात ती म्हणाली.

"निघाली व्हतीस देवाला अन् वाटेंत ह्यो सैतान भेटला," बंडोबा म्हणाला.

"नाहीं तर काय?" ती नखऱ्यांत म्हणाली.

सोपानरावाशीं बोलतांनाची ग्राम्य पद्धत व त्याला यत्किंचित लेखणारी सूट आणि बंडोबाशीं बोलतांनाची नागरी धाटणी व त्याच्याकडे पाहतांनाची लाडिक लगट—यांमधील फरक एवढ्या सवाल जबाबांत माझ्यासारख्या तिऱ्हाइताच्याही ध्यानांत आला. आपला प्रियकर कोण व त्याचा पोशिंदा कोण याची तिला जाणीव असावी व ती तिला बोंचत असावी, असें स्पष्ट दिसत होतें. आपण फसलों, यापुढें तरी अदलाबदल करतां येईल का—अशी तिची कुचंबणा होत असावी असें वाटलें.

तेवढ्यांत आमची गाडी क्रीडांगण वसाहतींतल्या एका बैठ्या बंगल्या-समोर थांबली. भोंगा वाजतांच एक ठेंगणी, हंसतमुख मूर्ति सामोरी आली. आगाऊ वर्दी असल्यासारखे ते बरोबर येण्याच्या तयारींत दिसले.

खिडकीजवळ येऊन ते बंडोबाला म्हणाले,

"कॉफी घेऊन मग बागेंत जाऊं."

त्यांची विनंति ऐकून बंडोबा हंसला. त्यानें सतरंजीवरच्या मुटकुळ्या-कडे बोट केलें. महादबा उमजले आणि गाडीला वळसा घालून डावीकडे गेलें. भिवबानें त्यांच्यासाठीं तिकडलें दार अगोदरच उघडून ठेवलें होतें. त्यांना तशा भानगडींचा तिटकारा आहे हें त्याला ठाऊक होतें.

लवकरच डांबरी रस्ता सोडून गाडी शेतरस्त्याला लागली. आतां अंधार झाला होता. गाडीचे दिवे झगझगीत होते आणि महादबा जरूर तेव्हां इषारा देत होते. तरी गाडी हेंदकळत होती.

एवढा वेळ आपल्याला डुलकी लागली होती, या हेलकाव्यांमुळेंच आपल्याला जाग आली असा आविर्भाव करून अनुसया बसती झाली आणि कण्याला फिरकी मारून व माझ्या गुडघ्यांचा आधार घेऊन उठली आणि पुढल्या हादऱ्यानें झोकांडी गेल्याचें ढोंग करून माझ्या अंगावर कलंडली, पण दुसऱ्याच क्षणीं तोल सांवरून माझ्या शेजारीं, जरा खेंटूनच बसली.

किती गरम गरम, विशेषतः त्या गारव्यांत; किती नरम नरम, विशेषतः त्या अडदांडांच्या सहवासांत.

"अनशे, त्या ब्राम्हणाला कशापायीं तुझा तरास? मपल्या जोडीदारावाणी त्यो भानगडी गडी न्हाई. ऊठ—" बंडोबा गरजले.

"अग बया—खरंच कीं—" जरा दचकून, बाजूला सरकून, हनुवटीवर बोट ठेवून ती उद्गारली आणि माझ्याकडे पाहून जरा शरमिंद्या स्वरांत, मान डुगडुवीत म्हणाली, "क्षमा करा हं."

"अहो, त्यांत एवढें क्षमा मागण्यासारखें काय आहे? अंधार आहे, रस्ता खराब आहे. तुमचा काय दोष?" मी औपचारिक आवाजांत म्हणालों.



अनुक्रमणिका








माझ्या बोलण्यांतले आहो जाहो ऐकून ते दोघेही खदखदां हंसले !

मला बिचाऱ्याला तेथेंच सोडून ती ताडकन् उठली. समोरच्या बांकावर बंडोबा व सोपानराव होते, त्यांच्यामध्यें जाऊन बसली. उच्चारण्यास सोपी, पण लिहिण्यास अभद्र अशी एक शिवी तिला हांसडून बंडोबा तावातावानें उठला व माझ्या शेजारीं येऊन बसला.

बामण, बामण, हा मला जिथें तिथें असा कां आडवा येत आहे ?

या साऱ्या प्रकारामुळें मला किती चीड आली म्हणून सांगूं? थोड्या वेळापूर्वी बंडोबानें माझें वर्णन मर्द व दर्दी असें केलें तेव्हां मला किती बरें वाटलें होतें. मर्द म्हणजे केवळ विधीनें केलेल्या भेदामुळें पुरुषाच्या जन्माला आलेला मनुष्य नव्हे आणि दर्दी म्हणजे नुस्ता अपेय व अभक्ष्य सेवन करणारा खादाडपिणाड नव्हे. पण यानें तर आतां मला अगदीं शेळपटांत काढलें ! त्यालाही शिकावे लागतील असे चार डाव मला अवगत होते, पण बऱ्याच वर्षांत भेटच झालेली नसल्यामुळें दरम्यान मी संपादन केलेलें प्राविण्य त्याला कसें माहीत असणार ? मला वाटलें हा पैजा बोलतो आहे, मला धुडकावतो आहे. मी काय आगांतुकी केली होती ? माझीं व्यसनें भागविण्यास मी समर्थ होतों. वाटलें, चार शब्द सुनवावे. पण तो यजमान होता व मी त्याचा पाहुणा. जेवायला बोलवायचें, समोर वाढलेलें ताट मांडावयाचें आणि त्यावर नजर जाते न जाते तोंच तें उचलून न्यावयाचें, हा काय पाहुणचार झाला ? हीं माळगंडें—,

पण ही माझी भटुरगी विचारसरणी चुकीची होती असें त्यानेंच माझ्या प्रत्ययास आणून दिलें.

माझे हे विचार चालू होते तोंच आमची गाडी बागेंतल्या बंगल्यासमोर उभी राहिली होती प्रथम सोपानराव खालीं उतरला व त्याच्या मागोमाग अनशी. गाडींतलें सामान उतरून घेण्यासाठीं गडी आला. तें निमित्त साधून बंडोबानें खांद्यावर हात टाकून मला जवळ ओढलें व तो माझ्या कानांत कुजबुजला,

"ती त्याचीच हाय्, त्यानंच तिला काढून आणून ठेवली हाय्. तीबी हाय उडाणटप्पू, तुझा जीव गुतला असल तर आजची रात जाऊ दे, उद्यां पगूं."

बंगल्यांत बैठक मांडून तयारी केलेली होती. सोपानरावानें कोट फेटा खुंटीला लावला. बंडोबानें मात्र कोट काढला नाहीं आणि फेटा काढून शेजारींच ठेवला. लवकरच संध्यां सुरू झाली. हळूहळू बैठकीची गति द्रुत झाली. आचमनांवरून घोटावर आलें आणि पेल्यामागून पेले फस्त होऊं लागले; मुख्यत्वेंकरून महादबांच्या आग्रहामुळें.

खुद्द महादबा मात्र आम्हांला सामील झाले नाहींत. कारण म्हणे त्यांना आज गोकुळाष्टमीचा उपास होता. उपास मोडलेला पहावयाला येथें घरचें कोण येणार होतें कोण जाणे. पण त्यांना म्हणे घरचा फार काच होता !

ताकतीच्या व सरावाच्या गुर्मीत सोपानराव फारच जोशांत आला. स्नायूंवरला ताबा ढिला झाल्यामुळें त्याचा एक पेला लवंडला. तेव्हां महादबा म्हणाले,

"हरे राम, सोपानराव, जरा दमानें घ्या."

सोपानराव जरा बेफामपणेंच ओरडला,

"महादबा, ठावं हाये आम्हांसनी, मुखमें राम बगलमें छुरी. त्यापून आम्ही बरे, मुखमें बरांडी, बगलमें रंडी."

बोलतां बोलतां त्यानें अनुसयाला खरोखरीच बगलेंत घेतलें. रंडी असली तरी तिला रंडी म्हटलेलें रुचत नाहीं. या न्यायानें तीही कावली. पण करते काय? अडाण्याशीं संग, प्राणाशीं गांठ.

मोठ्या संयमानें मनोविकार आवरून महादबा म्हणाले,

"रागावूं नका, सोपानराव. माल तुमचाच आहे, जरा दमानं घ्या, एवढेंच मी म्हटलें."

त्यांनीं सोपानरावाला ग्लास फिरून भरून दिला व ते सोडा ओतूं लागले. सोपानराव उसळून म्हणाला,

"पाणी कशाला? इस्कीच घाला."

फुशारखोर सोपानरावाला बेहोष करावयाचा महादबांनीं विचार केला. ते त्याला ग्लासामागून ग्लास भरून देऊं लागले. बंडोबाही त्यांना सामील झाला.

मंडळींची ही वृत्ति पाहून त्या स्थितींतही अनुसया आरंभीं जराशी बावरली; कारण किती झालें तरी सोपानराव हा तिचा यजमान होता. पण पुढें तीही रंगली व गमतींत सामील झाली.

मग काय उशीर? सोपानरावाचें जहाज झालें. समुद्रांतलें वाहन लाटांवर हेलकावूं लागलें म्हणजे उतारू करतात ते सारे प्रकार त्यानें सुरू केले. म्हणून त्याला तेथेंच सोडून आम्ही दोघे बाहेर उघड्यावर आलों. साफसफाईला गडी व सांभाळायला अनुसया आंत गेलीं. आमच्या सरबराईची सोय करून महादबा पायींच घराकडे निघून गेले.

एकांत मिळतांच आम्हां मित्रांच्या सुखदुःखाच्या गोष्टी किती तरी वेळ चालल्या होत्या. बंडोबा एवढा श्रीमंत झाला होता, पण पोटीं पोरबाळ नसल्यामुळें दुःखीकष्टी होता. एक नाहीं, दोन नाहीं, तीन बायका केल्या, तरी त्याची मनीषा पूर्ण झाली नव्हती. कशी होणार? रोज नवे उकिरडे धुंडायचे आणि सुया टोंचून घ्यावयाच्या. घरच्या लक्ष्मीला मुलें होणार कशीं? खोटें कशाला सांगूं? त्यालाही दुःख आहे हें ऐकून मला जरा बरें वाटल्यावांचून राहिलें नाहीं. आमचेंही चारित्र्य जवळ जवळ तसेंच, पण या मार्गाला लागण्यापूर्वीच आम्ही वंश चालू ठेवण्याची व्यवस्था केलेली होती! त्यानें आपले कांहीं पराक्रम मला सुनवले आणि मीही त्याला.

"ल्हानपणीं आपण संगं अनाडक्या करायचों, पण तूं बी अशा भानगडी करशील असं न्हवतं वाटलं."

"कां रे बुआ? मीही माणूसच आहे ना?"

"माणसा माणसांत लै फरक न्हातो. तुम्ही बामणं–इटाळ व्हायचा!"

मी पुन्हां खवळलों. हा वारंवार असें कां बोलत आहे? निवडणुकीसाठीं उभा राहणार आहे कीं काय?

अकराचे टोले पडले तेव्हां बंडोबानें विचारलें,

"चलतोस का गाडींतून जरी चक्कर मारायला?"

"कुठें जायचें?

"कुणाला ठावं? गाठूं एकादा दलाल. न्हाई तर तमाशाला जाऊं. तुमच्या पुन्यांत त्या कुण्डलच्या कमळाची बारी आलीया न्हवं?"

काय ह्या लोकांना बातम्या असतात पहा!

पण त्याला हें कुठें माहीत होतें कीं कमळाची बारी आली तेव्हांपासून माझी रोजची हजिरी होती!

कीं आदल्या दिवशीं मला तेथें पाहिल्यामुळेंच यानें आतां हा विषय काढला होता?

अरे चोरा!

तरुणपणापासून मला संगीताची आवड; विशेषतः ठुमरीची व लावणीची. ठुमरीपेक्षां मला लावणीच अधिक आवडते. ठुमरींत तारुण्याला आवाहन असतें व लावणींत आव्हान! ठुमरीची लकेर मैदानावर लहरणाऱ्या वाऱ्याच्या मंद झुळकीसारखी आणि लावणीची पठारावर घुमणाऱ्या वादळासारखी. ठुमरीची लज्जत थंडगार व मधुर शरबतासारखी आणि लावणीची कडक मद्यासारखी. ठुमरींत भावनांची उघडझांप असते आणि लावणींत त्यांचा उद्रेक. म्हणूनच मंद्र ठुमरीपेक्षां तार लावणी मला अधिक आवडते.

कुण्डलच्या कमळाची बारी पुण्याला आली तेव्हांपासून माझा रात्रीचा कार्यक्रम अगदीं ठरून गेला होता. विशेष नामांकित व लोकप्रिय बारी मध्यरात्रीच्या सुमारास सुरू करावयाची अशी व्यवस्थापकांची योजना असते. कमळाची बारी साडे अकराच्या सुमारास सुरू व्हायची. त्या सुमारास त्यासाठीं त्या नाट्यगृहांत जायचें, रंगभूमीशेजारीं उजव्या ओवरींत पंखांच्या आडोशाला बसायचें, तिची बारी संपली कीं त्या रात्रीं तिनें म्हटलेल्या गवळणी व लावण्या आपल्याशींच गुणगुणत डुलत डुलत घरीं परतायचें, हा क्रम मी तेव्हांपासून नियमितपणें पाळीत होतों. कारण तोंवर कोणी लावलें नव्हतें असें वेड मला कमळानें लावलें होतें; तिच्या भरदार लावण्यानें व ढंगदार लावणीनें.

कमळाचा वर्ण होता काळा सांवळाच, पण कृष्णाकांठच्या मळईत दिसते तशी तांबूस तकाकी त्यावर चमकतेशी भासे. तिचा बांधा होता ठेंगणा ठुसका, पण त्यांत उत्साहाची उभारी अशी होती कीं जणूं वातचक्राची हिरीरी. वरिष्ठ समजल्या जाणाऱ्या वर्गांत मुग्धा गणली जाईल एवढीच तिची उमर होती. त्या वर्गांत या वयांत जें अप्रत्यक्षपणें अवगत झालेलें असतें, जें केवळ कुजबुजलें जातें किंवा एकीमेकींपासून छपवलें जातें तें प्रत्यक्षपणें अनुभवलेलें असल्यानुळें आणि ते अनुभव सशब्द करण्याचा सराव असल्यामुळें तिच्या वृत्तींत बाणलेली निर्भयता तिच्या अंगप्रत्यंगांत प्रत्ययाला येत होती. पुरुषांच्या तहानभुकांचा व त्यांच्या मर्यादांचा प्रत्यक्ष प्रत्यय आलेला असल्यामुळें वयोमानानुसार अंगीं



**आशय आणि आकृति**
**(साहित्यिक प्रेम!)**

*ती म्हणाली—मान्य अपलें ज्ञान अन् वाक्कौशल*
*मर्मग्राही शब्दशैली, भावनिकता कोमल*
*प्रेम तुमचें माझ्यावरी—उमगला हा आशय*
*—आरशांत पहा आपली आकृति ही महाशय!*









खळखळत असलेल्या नैसर्गिक अवखळपणांत अंतिम आव्हानाच्या छटा अधून मधून प्रकट झालेल्या दिसत. अर्धोन्मीलित पापणींत स्वीकार तर आकृष्ट जिवणींत इनकार—अशा बाह्यतः परस्परविरोधी पण अंतर्यामीं परस्परपोषक अशा विभ्रमांचा आविष्कार तिच्या आविर्भावांत दिसत असे. एकीकडे ऊन असतांना दुसरीकडे आभाळ भरून यावें व विजा चमकूं लागाव्यात किंवा भरल्या आभाळांतून टपोऱ्या थेंबांचा वर्षाव सुरू असतां एकाद्या कोंपऱ्यांतून उन्हाची तिरीप यावी, तसे तिच्या हंसत मुखावरील आविर्भाव पाहतां पाहतां भावनांच्या अनुरोधानें पालटत असत. अन्यत्र कोठें न दिसे असें हें, सौंदर्य पाहून वेडावलेला, संगीत तल्लीन करीत आहे, नृत्यांत संपूर्ण बेभानलेला, असा मी तिच्या हरेक कार्यक्रमांना हटकून हजर रहात असे.

तोंवर मी पुष्कळ तमाशे ऐकले पाहिले होते; भिन्न वातावरणांत, भिन्न संगतींत व भिन्न पठडींतले. पण असा रंग कधीं कोठें भरलेला माझ्या स्मरणांत नाहीं. परस्परांच्या कौशल्याच्या आविष्काराला अनुकूल आणि नायिकेच्या गीत नृत्याला पोषक असें वातावरण निर्माण करण्याला उत्सुक व लायक असा तमासगिरांचा संच मी तोंवर पाहिला नव्हता आणि त्यांच्या साथीचें चीज करील अशी नायिकाही.

याला कारण तसेंच होतें. कमळाची आई बकुळा हिची कार्यक्रमाच्या तपशीलावर जाणती नजर आणि करती करवती हुकमत असे. बकुळा ही गेल्या पिढींतली नांवाजलेली गायिका व नर्तिका; आमच्या पूर्वींच्या पिढीशीं विशेष परिचित; अजूनही अशा उमेदींत होती कीं कधीं त्या काळची मंडळी जमली म्हणजे कोंवळ्या कन्येपेक्षां मुरब्बी माताच पसंत करीत. आणि कधीं कधीं तर आमच्या पिढींतले प्रेक्षकही. कारण गाण्यांतले, नाचण्यांतले व मनुष्यस्वभावांतले असे कांहीं अडाखे तडाखे तिला अवगत होते कीं आम्हांला कल्पनाही नसावी! पण असे प्रसंग अलिकडे क्वचितच येत आणि आलेच तर फक्त दिवाणखान्यांतल्या बैठकींत. नाट्यगृहांतल्या कार्यक्रमांचे वेळीं ती पेटीजवळ उभी राहून संचावर व गल्ल्यावर देखरेख ठेवी आणि कमळाची धांवपळ सुरू झाली कीं प्रोत्साहक हंसतमुखानें लावणी धांवती ठेवी.

बकुळाच्या नेतृत्वाखालीं गंमतीच्या रंगतीसाठीं सारे साथी कसबाची व परिश्रमांची पराकाष्ठा करीत, आणि एकजीव, एकतान होऊन नादब्रह्म निर्माण करीत. या पार्श्वभूमीवर भरदार सौंदर्यानें बहरलेलें व आकर्षक आविर्भावांनीं नटलेलें कमळाचें रंगदार गायन व ढंगदार नृत्य सुरू झालें कीं प्रेक्षक जणूं मायेच्या भूलभुलैयांत फसल्यासारखे कावरेबावरे होत. दारिद्र्याचा गळफांस सुटावा म्हणून देवाची अखेरची आळवणी करणाऱ्या भक्त याचकापुढें सभामण्डपांतल्या दगडी फरशीवर कुबेरानें उंचावरून सुरती रुपयांचे तोडे एकाएकीं ओतावेत, तसा तिच्या नृत्याचा खळखळाट होता. नृत्याच्या पहिल्या फेरींत चापल्य, लालित्य व सौष्ठव यांची चुणूक दाखविल्यानंतर साथीदारांच्या मध्यभागीं त्रिभंग मुद्रेंत उभी राहून, नखऱ्यानें पदर सांवरून, ईर्ष्येनें चवड्यांवर जरा उंच होऊन, गायनाचें आसन घेण्याकरतां तिनें उजवा हात जरासा उंचावला म्हणजे तोंवर गजबजलेल्या श्रोतृसमुदायांत एकाएकीं इतकी शांतता होई कीं कोणा सामान्य प्रेक्षकानें प्रोत्साहनार्थ वानगी म्हणून रंगभूमीवर एकादी अधेली भिरकावली तर तिचा छनत्कार साऱ्या नाट्यगृहांत घुमावा! तिनें उंच व उन्मादक, मृदु व भेदक, रंगील्या व रसील्या सुरांत एकाद्या लावणीचा मुखडा म्हटला कीं तोंवर नेत्रीं आलेले प्रेक्षकांचे पंचप्राण आतां जणूं त्यांच्या कर्णीं एकवटत आणि लावणी रंगूं लागली कीं त्यांच्या ज्ञानेंद्रियांचा हुतूतू सुरू होई. केवळ कुतूहल म्हणून एकादें कामोत्तेजक रसायन घ्यावें आणि तें शरीरांत भिनलें कीं त्याच्या उत्तेजकतेमुळें बेचैन व्हावें—अगदीं अशीच अवस्था कमळाच्या कंठांतून स्रवणाऱ्या लावणीच्या श्रवणानें व्हावयाची

तिनें एकादी ठेवणींतली लावणी काढावी :

वय माझें ल्हान्—
बाई ल्हान्—
भीती वाटते!

खरेंच, खरेंच हो खरेंच. ही किती, कित्ती लहान आहे. वयानें तशीच कुडीनें; इतकी लहान कीं नुसत्या डोळ्यांनीं तिला कुरवाळतांना आपली आपल्याला धास्ती वाटावी! विशेषतः अजूनही उमेदींत असलेल्या तिच्या आईच्या सान्निध्यामुळें, आणि भोंवताले कोंडोळें करून उभ्या असलेल्या या टोणग्यांच्या मानानें! पण अगदीं थरकांपण्यासारखी हिला भीती कशाची वाटते आहे? ज्या समाजासाठीं असलीं गाणीं रचलीं व म्हटलीं जातात त्यांत बालविवाह व सासुरवास प्रचारांत असल्यामुळें श्रोत्याला वाटतें की घडीघडी छळणाऱ्या सासूची हिनें धास्ती घेतलेली असावी. पण नाहीं.

मुखडा बदलून लावणी सुरू होते :

वय माझें ल्हान—
आले न्हाण—
भीती वाटते

आणि हें ऐकून श्रोते चमकून उठतात आणि रंगभूमीवर चवल्या पावल्यांचा पाऊस पाडतात. रंगभूमीच्या दोहों बाजूंना पंखांआड बसलेले प्रतिष्ठित प्रेक्षक दौलतजादा सुरू करतात. संपन्न रसिकांची दौलत कणांकणांनीं लुटतांना कराव्या लागणाऱ्या झटापटीमुळें व घालाव्या लागणाऱ्या झटपट येरझारांनीं बिचारीची अगदीं तारांबळ उडते. आणि डोळ्यांनीं तिचा पाठलाग करणाऱ्या न कर्त्या प्रेक्षकांचीही. बिचारी अगदीं घामाघूम होई; जणूं रंगभूमीवर पडलेल्या पैशांच्या पावसानेंच ती चिंब होई! पण याच झटापटीमुळें तिच्या अंगप्रत्यंगांचें स्थिर व चल सौंदर्य आणि लालित्य प्रत्येकाच्या प्रत्ययास येई.







मी काय सांगत होतों ? मी तमाशाला गेलों कीं रंगभूमीशेजारीं पंखां-आडच्या पाऱ्यांत बसायचा. कारण मी पांढरपेशा. तमाशा ही बोलून चालून कुटाळ व खट्याळ, कामकरी व शेतकरी अशा हलक्या लोकांच्या धांगडधिंग्याची जागा; जेथें अचकट विचकट गाणीं म्हटलीं जातात आणि असभ्य व अश्लील आविर्भाव केले जातात, तें का आम्ही वरिष्ठ दर्जाच्या शिष्टांनीं ऐकावयाचें व पहावयाचें ? आणि तें सामान्य लोकांच्या घोळक्यांत बसून ? कोणी म्हणेल, सामान्य मनुष्याच्या मनांत जें घोळत असतें तेंच येथें व्यक्त व सशब्द होतें, म्हणून हेंच बहुजनसमाजाचें काव्य व नाट्य. पण म्हणून का तें एवढ्या स्पष्टपणें बोलावयाचें व उघडपणें प्रदर्शित करावयाचें ? भावना, मग त्या कितीही अशिष्ट वा उत्तान असोत, त्या जोंवर संस्कृत शब्दांत व्यक्त होतात किंवा समवर्गांत कुजबुजल्या जातात तोंवर त्या आम्हांला रुचतात किंवा सहन होतात. आभिजात्याच्या कृत्रिम व स्वसंतुष्ट कल्पनेमुळें जें एकांतीं, मनांत व मनापासून आवडतें तें आम्हांला जनांत व प्राकृतांत मानवत नाहीं. म्हणूनच आम्ही वरिष्ठ दर्जाचे लोक तमाशासारख्या कनिष्ठांच्या करमणुकींपासून अलिप्त असतों; निदान अलिप्त आहोंत असें भासवतों. मनलज्जा गुंडाळून ठेवून कांहीं शिष्ट लोक तमाशे पाहतात, पण जनलज्जा सांभाळण्यासाठीं पडद्याआड बसून आपला षोक पुरा करतात. तकलुपी प्रतिष्ठेच्या आहारीं गेल्यामुळें मीही असाच एक तोंड लपविणारा शिष्ट. पण केवळ तोंड लपविणारा, म्हणून शिष्ट—असें मात्र नाहीं हं.

आणि या लब्धप्रतिष्ठित संकोचामुळें येथेंही एकलकोंडा असतों. वरिष्ठ व म्हणून सन्मान्य गणल्या जाणाऱ्या वर्गांतले माझ्यासारखे शिष्ट येथेंही असतातच. त्यांच्याशीं मी समरस होऊं शकत नाहीं. हा नेहमीं इकडे येणारा, म्हणून व्यसनी, म्हणून त्याज्य आणि आपण मात्र कधीं काळीं विरंगुळा म्हणून येणारे, म्हणून रसिक, फार फार तर षौकीन, अशी या मंडळींची माझ्याबद्दलची व स्वतःबद्दलची भावना असावी असें मला वाटे. त्यांच्या या भावनांचा स्फोट होऊं नये म्हणून मी त्यांच्यापासून दोन पावलें दूरच रहात असे. तमाशाला जाणें हें माझ्या इतकें अंगवळणीं पडलेलें आहे ना, तरी मला कधीं कधीं वाटतें कीं आपण करीत आहोंत तें पाप आहे, निदान असभ्य आहे. आपण दिवसां ज्या समाजांत वावरतों त्यांतील चारचौघांत याची वाच्यता होऊं नये, आपण समाजाच्या उपहासाला पात्र होऊं नये, असें वाटत असल्यामुळें अशा शिष्टांपासून मी अलिप्त रहावयाचा. सामान्य वर्गांतले सुसंपन्न आणि संपन्न म्हणून शिष्टांत गणले जाण्यास उत्सुक असेही बरेच लोक या पाऱ्यांचा आश्रय करतात. जनलज्जेच्या संकोचामुळें नव्हे, दौलतजाद्याच्या सोयीसाठीं, नर्तिकांशीं लगट करतां यावी म्हणून. माझ्या मनोवृत्तीचा बाण त्यांच्यासारखा भरड नसल्यामुळें मी त्यांच्याशींही समरस होऊं शकत नाहीं. ही झाली सांगण्यापुरती सबब. खरें सांगावयाचें म्हणजे त्यांच्या मानानें माझा खिसा आंखुड, म्हणून मी त्यांच्याशीं दौलतजाद्याच्या बाबतींत स्पर्धा करूं शकत नव्हतों, म्हणून मी त्यांच्यांतही मिसळूं शकत नव्हतों. दौलतजादा करतांना नर्तिकांचे हात चुरावे, त्यांच्या अंगलटीस जावें, काय मला असें कधीं वाटतच नव्हतें ? खोटें कशाला सांगू ? वाटलें, अजूनही वाटतें; पण परिस्थितीमुळें पंगू आणि सामाजिक निर्बंधांमुळें जवळजवळ षंढ्वाप्रत पोंचलेला. म्हणूनच मी म्हणावयाचा, आमच्यासारख्या पांढरपेशांनीं फार तर पाऱ्यांआडून तमाशा पहावा, पण अशा धिंगाण्यांत सामील होऊं नये.

आज मी तमाशाला रोजच्या सारखा एकटा गेलों असतों तर पखांच्या आडोशाला नेहमींसारखा एकलकोंडा बसून राहिलों असतों; लावण्या ऐकल्या असत्या—कांहीं पुरत्या आणि कांहीं हौशी श्रोत्यांच्या ईर्ष्येमुळें त्रुटित; लावणी तुटल्यामुळें त्रस्त होऊन नेहमींप्रमाणें मनांतल्या मनांत दौलतजादा करणारांचा तिरस्कारपूर्ण निषेध केला असता आणि बारी संपल्यावर ऐकलेल्या लावण्या गुणगुणत घरीं गेलों असतों.

पण तसें व्हावयाचें नव्हतें; कांहीतरी विपरीत व्हावयाचें होतें.

कारण मी आजच्यासारखा तर्र होऊन कधीं नाट्यगृहांत गेलों नव्हतों; कारण आज मी नेहमींसारखा एकटा नव्हतों. माझा बाळमित्र बरोबर होता. आज कोणाची डर नव्हती, प्रतिष्ठेची किंवा अप्रतिष्ठेची, कारण माझा अडदांड मित्र बरोबर होता. आज कशाची ददात नव्हती, कारण माझा श्रीमंत सोबती सांगातीं होता. इकडे यायचें ठरलें तेव्हांच त्यानें ठांसून सांगितलें होतें कीं नामर्दासारखें पडद्याआड बसायचें नाहीं, प्रेक्षकांच्या पहिल्या रांगेंत बसायचें, प्रेक्षकांशीं समरस व्हायचें, लोकांची लाडकी लावणी कोणालाही केवळ पैशाच्या जोरावर तोडूं द्यावयाची नाहीं आणि दौलतजाद्याची धूम उडवायची, त्यानें व मीही. यासाठीं तरतूद म्हणून त्यानें वाटेंतच माझा खिसा नोटांनीं भरला होता, मी नको नको म्हणत होतों, तरी. यासाठीं त्यानें आपल्या कोटाच्या गुंड्या काढल्या तेव्हां त्याचे तट्ट फुगलेले खिसे मला दिसले होते ! कितीही श्रीमंत झाला म्हणून काय रात्रीं बेरात्रीं एवढी रोकड बरोबर घेऊन हिंडायचें ? आणि उघड्या डोळ्यांनीं मवाल्याच्या अड्ड्यांत घुसायचें ?

आम्ही नाटकगृहाच्या दरवाजांत आलों न आलों तोंच मालक अबदुल-

तुमची जन्म-रास जर



# वृश्चिक

असेल तर तुमच्या अंगीं जबरदस्त इच्छाशक्ति
आणि सहनशक्ति वास करीत असलीं पाहिजेत.
परंतु स्वत:ला अनेक शत्रूही
निर्माण करण्याची तुमची प्रवृत्ति आहे.



तुमच्या मुलाची जन्म-रास कोणतीही असो तुम्ही
निश्चितपणें अशी खात्री बाळगा कीं
तो किंवा ती ड्यूमेक्स बेबी फुडवर जोमदारपणें
वाढतील. तें तयार करण्यास सोपें
आहे, तें सहज पचतें आणि शिवाय, तें वापरल्यास
खर्चही अगदीं कमी येतो.

**त्यांना ड्यूमेक्स द्या आणि त्यांची
कशी जोमदार वाढ होते तें पहा!**

अनुक्रमणिका

भाई व ठेकेदार म्हमूलाल वंडोबाच्या स्वागताला धांवले. मी एवढा रोज येणारा, व म्हणून स्वतःशींच फुषारणारा, पण याची कोणाला दादही नाहीं! कधीं आला, किती मुक्काम वगैरे विचारपूस केल्यानंतर मालक आम्हांला घेऊन आंत निघाले. डावीकडल्या ओट्यावर त्या रात्रीं नाच-गाण्याच्या बसल्या होत्या. त्यांनींही आमच्या मित्रवर्यांचें स्वागत केलें. कोणी आदाबर्ज केला, कोणी रामराम केला. एका चटकचांदणीनें तर वाकून नमस्कार केला! वंडोबांनीं तिच्या गालावर टिचकी मारली आणि तिनें 'इष्य' म्हणून मुरका मारला तेव्हां तिच्या हातांत एक नोट ठेवली!

आम्ही सभामंडपाच्या दाराशीं आलों तेव्हां ठेकेदारांनीं विचारलें,

"आमच्या या मास्तरांना कोठें गांठलें?"

अरे तिच्या, आमची मास्तरकी येथपर्यंत पोंचली वाटतें? ही संज्ञा त्यांनीं पांढरपेशा या अर्थानें वापरली होती कीं विशिष्ट वर्गांत माझा पेशा म्हणून मी सांगत असे त्या संदर्भानें? कोण जाणें, कसें ही असो. मलाही थोडीबहुत मान्यता आहे हें ऐनवेळीं माझ्या मित्राला दाखवून देणारा एक तरी हरीचा लाल निघाला हें पाहून मला समाधान वाटलें! मी बरोबर होतों म्हणूनच म्हमूलालनें वंडाबाला विचारलें,

"आंत बसणार कीं बाहेर?"

"आंत न्हाई, भायेर, अन् दोघं बी."

वंडोबाच्या तरारलेल्या आवाजावरून आजचा रंग न्यारा आहे हें ठेकेदारानें ओळखलें. आतां सभागृहांत एकही खुर्ची रिकामी नव्हती. म्हणून आमच्यासाठीं दोन खुर्च्या टाकण्यांत आल्या. आसनस्थ होऊन मी आजूबाजूला पाहिलें. केवढी ही गर्दी! केवढी विविधता! बहुजन-समाजाच्या सर्व थरांतलीं माणसें येथें उपस्थित होतीं. चरितार्थासाठीं घाम गाळणारे व गाळविणारे, निःशंकपणें खांद्याला खांदा लावून जिवाला रिझवीत होते. घामाच्या व तंबाकूच्या दर्पानें सभागृह कोंदाटलें होतें. आमच्यासाठीं करण्यांत आलेल्या खास व्यवस्थेमुळें आम्ही कोणी तरी मालदार लोक असूंत अशा समजुतीनें सर्व प्रेक्षकांच्या नजरा क्षणभर आमच्यावर रोंखल्या गेल्या. तोंच रंगभूमीवरील गायिकेनें चालू लावणीची एक लकेर घेतली आणि आमची क्षणभंगुर महति विलीन झाली!

आपण प्रेक्षकांच्या थव्यांत बसलेले असतांना रंगभूमीवरील नटानें, विशेषतः नटीनें, आपल्यावर नजर लावावी आणि स्मितानें जानपछानची ग्वाही द्यावी असें अनेक षौकीनांना वाटत असतें. आपलें आपल्याला बरें वाटतें आणि आजूबाजूच्यांना असूयामिश्रित आश्चर्य वाटलेलें पाहून आणखी बरें वाटतें. बकुळानें वंडोबाकडे पाहिलें आणि एक डोळा किलकिला करून पूर्वपरिचयाचें प्रेमळ प्रात्यक्षिक दाखविलें. भिवयांचें धनुष्य उंचावून आणि कळीदार ओठांच्या पाकळ्या उमलवून कमळानें-ही माझ्याकडे पाहिलें; त्या दृष्टिक्षेपांतही पूर्व परिचयाची छटा होती, पण ती भावना दुय्यम होती. हें काय नवीनच? हा चष्मेवाला चिक्कू ताल्या आडोशाला बसायचा तो उघड्यावर कसा आला? याला आंकडा लागला कीं काय? कांहीं देवाण घेवाण करायचा विचार आहे कीं काय? हेंच शरमिंदे करणारे प्रश्न तिच्या मुद्रेवर दिसत होते!

नव्या व नामवंत श्रोत्याला खूष करण्यासाठीं बकुळानें नवी लावणी लावली :

"माळ्याच्या मळ्यामध्यें,
ग बाइ, मी लावित होतें मका—"

तबल्याच्या तालावर घुंगरांचा झणत्कार झाला. वंडोबानें खिसा गांठ ओळखली. तो उठला, ओट्याजवळ गेला, कमळाच्या हातांत त्यानें दहा रुपयांची एक नोट ठेवली आणि बकुळासाठीं दुसरी हातीं धरून तो उभा राहिला.

कमळाच्या बारीचे कार्यक्रम मी किती तरी वेळां पाहिले होते, पण बकुळाशीं कोणी अशी लगट केली नव्हती. तिची ख्याति तशी होती. पण आजचा प्रसंगच वेगळा होता. तिनें मानेनें दोन तीनदां नकार दर्शविला, पण तिच्या डोळ्यांत तेवढा इनकार नव्हता. वंडोबा हलेना. त्यानें आणखी एक नोट काढली आणि दोन्ही नोटा चिमटींत धरून त्यानें तिला खूण केली. मोठ्या नाइलाजानें ती पुढें आली. त्या नोटा घेऊन साथीदारांच्या मध्यें उभी राहिली. नोटा धरलेला हात उंचावून तार स्वरांत तिनें आपल्या दुय्यम दिग्दर्शकाला विचारलें,

"या नोटांचें काय म्हणणें आहे?"

"टांसून झाली पाहिजे," साथीदार गरजला.

लावणी सुरू झाली.

बकुळाच्या प्रौढ देहांत असें सौष्ठव होतें, तिच्या आविर्भावांत असा नखरा होता व तिच्या स्वरांत अशी झारदार माधुरी होती कीं प्रेक्षक मनातल्या मनांत पुटपुटले, बाः! किल्येकांना वाटलें, किती आपण अडाणी? पक्का कलमी आंबा सोडून कच्च्या कैरीला लालचावलों! फार काय, आईचें लालित्य पाहून कमळाही क्षणभर स्तिमित झाली!

लावणी सुरू झाली :

"माळ्याच्या मळ्यामधें,
ग बाइ, मी लावित होतें मका,
अन्, तिकडुन आला सका
अग बाइ, त्यानें घेतला माझा मुका!"

कडवें संपण्याच्या सुमारास एका साथीदारानें कमळाशीं जरा लगट केली. ती दचकली. तबल्याच्या तालावर घुंगरांचा झणत्कार करीत तिनें एक फेरी घेतली. साथीदारांचें वर्तुळ रुंदावलें. नर्तिका पदर बांधून मोठ्या नखऱ्यांत चवड्यावर बसली आणि मका लावूं लागली. तिचा साथीदार










अनुक्रमणिका

हंसतमुखानं तिच्या पाठीकडून तिच्या दिशेनें चोर पावलें टाकूं लागला. ती आपल्या कामांत गर्क होती; एक एक पाऊल पुढें सरकत होती व पावलागणिक आपल्या सौष्ठवाचा एक एक आविष्कार प्रकट करीत होती. इतकी गर्क कीं जणूं सख्याच्या हालचालीची तिला चाहूलही नव्हती.

ही लावणी म्हणजे खरोखरीच लावणीची लावणी! बहुसंख्यांच्या व्यवसायाची लावणी. ती सुरू झाली तेव्हां श्रोते होते ते आतां प्रेक्षक झाले. सारे तल्लीन झाले. गायिका व नर्तिकाही. कारण ज्या समाजांतले ते त्यांतल्याच त्या! कोणाला आपल्या मळ्याची आठवण झाली. वाटूं लागलें, पूर्वजन्मीं आपण काय पाप केलें होतें म्हणून त्या प्रसन्न सुबत्तेतून या कंगाल कोंदट वातावरणांत चरितार्थासाठीं येण्याची आपल्याला दुर्बुद्धि झाली? कोणाला आपले पूर्वायुष्यांतले पराक्रम आठवले. शेतांत गडी माणसें व बायाबापड्या कामाला लागल्या आहेत, एक तरणीताठी पोर उंसाच्या वाफ्यालगत उभी आहे, आंत यावें म्हणून आपण तिला खुणावीत आहोंत, ओटीत आहोंत आणि ती म्हणते आहे–

'नका ओल्या वाफ्यामागें मला नेऊं!'

तुझी खुषी असली म्हणजे झालें. जागेची अडचण काय केव्हांही दूर करतां येईल.

तेवढ्यांत रंगभूमीच्या पंखांतून एक कर्कश शिटी वाजली.

मला वाटलें अभिनय असभ्य व लावणी अश्लील, म्हणून तमासगिरांविरुद्ध कांहीं कारवाई करण्याकरतां पोलिसांची धाड आली!

नाहीं. बेसावध कमळाला सख्याच्या आगमनाची सूचना देण्याकरतां सोंगाड्यानें ती शिटी वाजवली होती.

शिटी ऐकतांच कमळा दचकली आणि उठून उभी राहिली. तिनें इकडे तिकडे पाहिलें, तो तिचा सखा अगदीं जवळ आला होता. ती चमकली व बाजूला सरकली. बिचाऱ्या सख्याचा केवढा हिरमोड झाला. त्याला आणखी खिजवण्याकरतां सोंगाड्या पुढें आला. त्यांचा आविर्भाव पाहून प्रेक्षक पोट धरून हंसले.

ही माळ्याच्या मळ्याची लावणी लांबवावी तितकी लांबते. मळा सुपीक असला म्हणजे त्यांत किती तरी पिकें होतात आणि त्यांचीं श्रृंगाराशीं यमकें जमतात. त्यांची कडव्यांत जडण करणारे शीघ्रकवि तमासगिरांच्या प्रत्येक संचांत असतातच. लांबते तरीच ती तोडावी तेथें रसहानि न होतां तुटतेही. या लावणीच्या बाबतींत प्रेक्षकांपैकीं कोणीही विशेष उत्साह दाखवीना. गायिकेला प्रोत्साहन देण्याला कोणी पुढें येईना आणि तीं तोडायलाही कोणी धजावेना. यामुळें बंडोबा अस्वस्थ झाला व मला म्हणाला,

"तिला एखादी गवळण म्हणायला सांग."

कोणी सांगायचें? मी? नुसत्या कल्पनेनें कानांचे चांफे गरम व लाल होण्याइतका मी शरमलों. आडोशाला बसूनही मी आजपर्यंत कधीं दौलतजादा केला नव्हता, कधीं फर्माइश केली नव्हती आणि आतां या तुडुंब भरलेल्या सभागृहांत, सर्वांच्या देखत हीं कर्मे करावयाचीं? मी आडोशाला बसलेला असतांना जिची नजर माझ्यावरून अलीकडे पलीकडे गेली तरी मी स्वतःला धन्य समजायचा, माझ्या शेजाऱ्याच्या हातून नोट घेण्याकरितां जी घाईघाईंत लचकत मुरडत आली म्हणजे माझी छाती धडधडायची आणि त्यावेळीं जिच्याशीं लगट करणाऱ्या लंपटांच्या विचकट लीला पाहून माझा जीव खालींवर व्हावयाचा, त्या कमळाला रंगभूमीसमोर उभा राहून मी खूण करायची, ती आली व ओणवी झाली म्हणजे तिच्या हातांत नोटा द्यावयाच्या आणि ती आणखी वांकली म्हणजे तिला गवळणीचा मुखडा सांगायचा! मी कधीं असा प्रकार करीन असें तोंवर माझ्या कल्पनेंतही आलेलें नव्हतें!

मी स्वस्थ बसलेला पाहून बंडोबानें माझ्या कुशींत कोंपर ढोसलें. तो म्हणाला,

"ऊठ कीं."

"छाती होत नाहीं." मी पुटपुटलों.

"आपलं काय ठरलं व्हतं?"

"सारं खरं, पण हिंमत होत नाहीं."

"बामण तो बामण," बंडोबा चवताळून म्हणाला, "मगां तुझ्या खिशांत कोंबल्या त्या नोटा उद्या ब्यांकेत टाकणार व्हय?"

हे घाव माझ्या वर्मी लागले. मी तिरीमिरीनें उठलों. रंगभूमीसमोर उभा राहिलों व कमळाला खूण केली. निराश झालेल्या भुकेल्या कोळ्याच्या





गळाला माशाचा झटका लागला म्हणजे तो चमकतो, तशीच मला पाहून ती चमकली. हंसतमुखानें ती मला सामोरी आली व ओणवी झाली. खिशांत हात घालून आल्या तेवढ्या नोटांचा पुंजका मी तिच्या पुढें केला. तीहि चमकली. तिला त्या ओंजळींत घेण्यासाठीं गुडघे टेकावे लागले व त्या घ्याव्या लागल्या. त्याच आसनांत तिनें मला-होय, मला विचारलें,

"काय हुकूम आहे मास्तर?"

आतां मी चमकलों. माझा स्वर गळ्यांत घोंटाळला. आवंढा गिळून मी म्हणालों—

"वारियानें कुंडल हाले—"

ती उठली. आपल्या साथीदारांच्या अर्धवर्तुळांत उभी राहिली. नोटांच्या पुंजक्याची चवड लावून तिनें उजवा हात उभारून त्या फडकावल्या.

सोंगाड्यानें विचारलें, "या नोटांचं काय म्हणणं आहे?"

"वारियानें कुंडल हाले"

पेटीवाल्यानें मुखडा वाजवला; तबलजीनें ताल धरला. बकुळानें गवळण सुरू केली:

"वारियानें कुंडल हाले—
डोळे मोडित राधा चाले!"

सारे रंगांत आले. त्या सर्वांची ती आवडती गवळण होती; त्यांची आणि श्रोत्यांचीही. शिवाय आज गोकुळाष्टमी!

या गवळणीची गोडी अशीच अवीट आहे; कारण तिची लल्कारी सुरू झाली कीं सारे तल्लीन होतात. त्या गाणाऱ्या व ऐकणाऱ्या स्त्रियांना वाटूं लागतें कीं आपण राधा आहोंत आणि आपण कृष्ण आहोंत असें पुरुषांना वाटूं लागतें. मग या गवळणी सामुदायिक भजनांत गाण्यांत येत असोत किंवा तमाशांत.

काय चमत्कार पहा. त्या दिवशीं कमळानें खरोखरीच कुण्डलें धारण केलीं होतीं!

कुण्डलें डोलवीत व डोळे मोडीत राधा चालूं लागली. नूपुरांचा झणत्कार करीत आणि लयत्रगीनें; नितंबांचें स्पंदन करीत आणि ऊर्ध्वांगाला हेलकावीत; कांसोट्याची पट्टी उडवीत आणि पदराचा लफ्फेदार समला फडकावीत! चालतां चालतां ती एकाएकीं थबकली, तिनें डोईवरून पदर घेतला आणि मान जराशी कलती करून डोळा मोडला.

आभाळांत भराऱ्या मारणाऱ्या ससाण्यानें भक्ष्यावर लक्ष केंद्रित होऊन एकाएकीं झेंप घ्यावी तसें त्या दृष्टिक्षेपानें मला घायाळ केलें. मी जागच्या जागींच जरासा डगमगलों. माझा कणा एकाएकीं वितळलासें मला वाटलें. मी आजूबाजूला पाहिलें. हें काय? मी अजून येथेंच उभा आहे. मी भानावर आलों, मागें वळून पाहिलें. माझा गोंधळ उडाला. हें पाहून प्रेक्षकांनीं टाळ्या पिटल्या व कोणी शिट्या फुंकल्या. तल्लीनतेचें समर्थन करण्यासाठीं मी पुन्हां खिशांत हात घातला आणि नोटांचा आणखी एक चुरगळा बाहेर काढून वर केला.

कमळा पुन्हां पुढें आली. तें धनधन मी तिच्या हातीं दिलें. इच्छिलें होतें पण कल्पिलें नव्हतें तें त्या क्षणीं झालें; तिनें स्वयंस्फूर्तीनें माझ्या हाताला हात मिळवला!

प्रेक्षकांनीं पुन्हां टाळ्या वाजवल्या, शिट्या फुंकल्या. मी परतलों व खुर्चीवर येऊन बसलों.

बंडोबानें माझी पाठ थोपटली.

पुन्हां गवळणीचें धृपद सुरु झालें,

"वारियानें कुंडल हाले—
डोळे मोडित राधा चाले!"

राधा पुन्हां कुंडल डोलवीत चालूं लागली. पावलापावलाच्या गतीची धर्ती बदलीत जागोजाग डोळे मोडूं लागली.

मी भुकताच त्या प्रसंगांतून निभावलों होतों, त्याच्या आठवणीनें मी इतका शरमिंदा झालों होतों कीं अजून मान वर करायाची मला धीर होत नव्हता.

तेवढ्यांत सोंगाड्यानें पुन्हां शिटी वाजवली. दौलतजादा करण्यासाठीं सामने आलेल्या पौकीनाची कमळाला वर्दी देण्यासाठीं.

राधेशीं ती इतकी तद्रूप झाली होती, आपल्या मागावर असलेल्या कृष्णाला इषारा द्यावयाचा आहे या भावनेनें इतकी तल्लीन झाली होती कीं सोंगाड्याला पुन्हां एकदां शिटी वाजवावी लागली. ती भानावर आली. तिनें सभागृहाकडे पाहिलें.

पाहते तों काय? नाटकगृहाच्या मालकाचा मेहमान जमालभाई, हातांत दहा दहाच्या पांच नोटा घेऊन उभा होता. तिचा मोहरा खर्कन् उतरला. कालच त्यानें तिच्याशीं लगट केली होती व तिनें त्याला झिडकारलें होतें











आणि तिच्या आईनें त्याला टरकावलें होतें. पण येथें काय करणार? व्यवसायाचे आचार व निर्बंध पाळलेच पाहिजेत. त्यानें दिलेल्या नोटा तिनें हातीं घेतल्या, त्याची मागणी ऐकली आणि साथीदारांच्या मध्यें उभी राहून तिनें हात वर केला,

सोंगाड्यानें विचारलें,

"या नोटांचें काय म्हणणें आहे?"

"मेरे मौला बुलाये—"

पेटीवाल्यानें मुखडा वाजवला, तबलजीनें ताल धरला.

श्रोते नाराज झाले. रंगाचा बेरंग होत असलेला पाहून आणि तोही केवळ पैशाच्या जोरावर, आपणां सर्वांच्या भावना दुखवून. प्रेक्षकांची चुळबूळ पाहून ते मुरलेले तमासगीरही गोंधळले.

रात्रीच्या प्रथमार्धांत सेवन केलेल्या मद्याचा अंमल चढल्यामुळें बंडोबा सुस्तावला होता. सभागृहांतली गडबड ऐकून त्यानें मला विचारलें,

"अप्पा, काय भानगड रे?"

मी झाला प्रकार त्याला सांगितला.

त्यानें विचारलें,

"कोण जमालभाई?"

मागल्या रांगेंत बसलेल्या एका अनोळखी प्रेक्षकानें सांगितलें,

"थेटरच्या मालकाचा साला, वांद्याचा दलाल."

बंडोबा खडबडून जागा झाला. त्यानें कोटाची बटनें काढलीं. तो रंगभूमीजवळ जाऊन उभा राहिला. त्यानें खिशांतून शंभर रुपयांच्या नोटांची एक चवड बाहेर काढली. म्लान झालेली कमळा सामोरी आली तेव्हां ती तिच्या हातीं देऊन तो गरजला—

वारियानें कुंडल हाले—ठांसून झाली पाहिजे."

तत्क्षणीं बकुळाची मुद्रा प्रफुल्ल झाली आणि कमळाची कळी खुलली. पेटीवाल्यानें झोकांत मुखडा वाजवला, तबलजीनें कडाडून ताल धरला. बकुळानें गवळण सुरू केली आणि कमळानें एक फेरी घेतली.

तिकडे जमालभाई उभा होता, त्यानें दोनशें रुपयांच्या नोटा मोजून घेतल्या व हात वर केला; मेलेल्या उंदरासारख्या त्या बरच्यावर उचलून घेऊन कमळानें सोंगाड्याला विचारलें,

"या नोटांचें काय म्हणणें आहे?"

कपाळावर हात आपटून सोंगाड्या म्हणाला,

"मेरे मौला बुलाये—"

जणूं त्याला स्वतःलाच वर्दी आली आहे, असा त्याचा आविर्भाव पाहून प्रेक्षक खदखदां हंसले.

तेवढ्यांत बंडोबानें पांचशें रुपयांच्या नोटांचें पुडकें काढलें आणि कमळा पुढें आली तेव्हां स्वतःच तिला खड्या स्वरांत विचारलें,

"या पांचशें रुपयांचं काय म्हणणं हाय?"

मनमोकळेपणानें हंसून ती म्हणाली,

"वारियानें कुंडल हाले—"

गवळण ठेक्यांत सुरू झाली.

तेवढ्यांत नाटकगृहाचे मालक व ठेकेदार तेथें उपस्थित झाले. आंत चाललेल्या झुंजीची वर्दी त्यांना दारवानाकडून मिळाली होती. त्यांनीं जमालभाईला आवरलें आणि बाहेर नेलें. तो ओटाताण करीतच होता. म्हणत होता,

"नहीं, नहीं; लढेंगे, और लढेंगे; बरबाद हुवा तो फिक्र नहीं."

हें ऐकून बंडोबा म्हणाला,

"पंचवीस हजार तय्यार हायेत. दलालीचा न्हवं—घामाचा पैका हाय. लढतुयास तर लढ कीं."

जातां जातां मालकांनीं बंडोबाला दटावलेंच,

"क्यूं, बंडोबा शेट, ये ठीक नहीं किया. आज आप इतने कैसे बिगड गये?"

"अरे चिचा, आज आमचा तिवार हाये—गोकुळष्टमीचा; आज गवळण कशी तुटू द्येयाची?"

जमालभाई बाहेर गेल्यावर प्रेक्षकांनीं टाळ्यांचा कडकडाट केला.

मी बंडोबाला विचारलें,

"आज गोकुळाष्टमी हें तुझ्या ध्यानांत कसें राहिलें?"

"उपास केला महादबानं अन् चाट बसला मला!"

प्रेक्षकांचा उफाळता उत्साह जरासा शांत झाल्यावर गवळण सुरू झाली.

तबला खणखणूं लागला. बकुळाचा सूर चढला, कमळाचा नूर खुलला.

गवळण कशी ठांसून, बोलून सुरू झाली.

> वारियानें कुंडल हाले—
> डोळे मोडित राधा चाले।
> राधेला पाहुन भुलले हरी
> बैल दोहितो नंदाघरीं।
> हरिला पाहुन भुलली चित्ता
> राधा घुसळी डेरा रिता।
> मना मिळालेसें मन
> एक भुलला जनार्दन॥

कमळाची बारी संपल्यावर आम्ही बाहेर आलों. भिवबा गाडींतच झोंपला होता. बंडोबानें त्याला उठवलें व बाजूला नेलें. त्यांचें काय बोलणें झालें तें मला ऐकूं आलें नाहीं.

थोडक्याच वेळानें तो एकटाच परत आला व गाडीच्या चाकावर बसला. गाडी जवळच्याच एका बोळांत उभी करून तो मला म्हणाला,

"अप्पासाब, तुम्ही जरा पडा सतरंजीवर, मी हा आलोंच."

बराच वेळ झाला तरी तो आला नाहीं, म्हणून मी जरा कलंडलों. रात्र बरीच झाली होती. मला जरा डुलकी लागली.

गाडीच्या हादऱ्यानें मी जागा झालों. अजून रात्रच होती. शेजारीं गरम गरम, नरम नरम असें कांहींसें भासलें; गजऱ्याचा व घामाचा सुगंध आलासा वाटला.

मी खिशांतल्या विजेचा चाप दाबला—माझ्या शेजारीं कमळा होती! प्रकाशाचा झोत मी समोर आणला. बंडोबाच्या खांद्यावर मान टाकून बकुळा पडली होती.

आणि गाडी भरधांव चालली होती!

अनुक्रमणिका










—पु. ल. देशपांडे

कोणत्याहि सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक, धार्मिक अथवा कसल्याहि 'इक' अगर ईय–प्रत्ययांत चळवळीपासून दूर रहायचें नाहीं हा बटाट्याच्या चाळीचा निर्धार सर्वश्रुत आहे. थोरांच्या जयंत्या, मयंत्या, सर्व-धर्मीयांचे उत्सव, सत्कार, निषेध, अभिनंदनांचे ठराव असले कार्यक्रम चाळीय पातळीवरून करण्याचा शिरस्ता आज बटाट्याच्या चाळींत युगानुयुगें चालू आहे. अण्णा पावश्यांकडे (म्युनिसिपालिटी पाणी खातें) सार्वजनिक वाढदिवस समारंभ आहेत; तर लखूअण्णा आगस्त्यांकडे 'श्राद्ध विभाग' आहे. अण्णांना सूतिकागृहांकडून वार्ता येते आणि लखूअण्णा सोनापुराशीं सतत 'इन् कॉरस्पोण्डन्स' असतात. पावश्यांनीं घुगऱ्या घातल्या कीं आगस्त्यांनीं 'पिंड' टाकलेच. एच्. मंगेशराव सर्व घराण्यांच्या गवयांच्या पुण्यतिथ्या व सत्कार साजरे करतात. अर्थात् हद्दू हस्सूखांची पुण्यतिथि असो किंवा कु. शैलबाला शेरतुकडेला सार्वजनिक सत्यनारायण स्पर्धा-गट तीनमध्यें मिळालेल्या बक्षिसाबद्दल तिचा सत्कार असो, कार्यक्रम एकच! आचार्य बाबा बर्व्यांचें 'भारतीय संगीत कला' ह्या विषयावर भाषण (आणि गाणें चालू झालें की डुलक्या–) आणि वरदाबाईचें 'क्लासिकल' गायन—साथ संगत एच. मंगेशराव 'ऑन् तबला'. आतां कांहीं कुजकट मंडळी कार्यक्रमाचें गांभीर्य लक्षांत न घेतां वरदाबाईचें 'खुलखुल ज्या' सुरू झालें म्हणजे कॉफीला येतात ह्या गोष्टीचा माफक निषेध करणें आवश्यक आहे. एच. मंगेशरावांच्या सान्निध्यांत संगीताची आस्था चाळींत व्हावी तितकी निर्माण झाली नसली, तरी वरदाबाईचें 'खुलखुल जा बाजूबंद' सुरू झालें कीं त्या नंतर दहापंधरा मिनिटांनीं कॉफी मिळते एवढा अंदाज मात्र मंडळींना आल्यामुळें त्या चीजेचा भैरवीपेक्षां कॉफीशीं संबंध अधिक जोडला गेला आहे. मुद्दा एवढाच कीं, बटाट्याच्या चाळींत सर्व चळवळी होतात!

लोकशाहींत 'जागृत लोकशाही' ह्या शब्दप्रयोगाला कांहीं विशेष मोल आहे. आणि बटाट्याच्या चाळींतील ह्या चळवळींमुळें बटाट्याचीच काय परंतु आसपासच्या दोनपांच चाळी जागृतच रहातात! रात्रीं वरदाबाईची तालीम, सकाळीं समेळकाकांचीं (न्यू गजकर्ण फार्मसी–) एकतारीवर भजनें, दुपारीं मेनांनी झोंपण्याच्या निमित्तानें गायिलेले पाळणे आणि दिवसभर जवळ जवळ प्रत्येक 'नंबरांतून' ऐकूं येणारीं भावगीतें ह्यामुळें जागरूकता हा या चाळींचा स्थायीभाव आहे. संगीताखेरीज नळावरील भांड्यांच्या आवाजांशी स्पर्धा करणारे तात्त्विक मतभेद आहेतच. (ह्या संबंधीं विशेष चौकशी केल्यावर असें कळलें कीं, कालव्यावरून जर जागतिक भांडण पेटतें, तर नळाच्या तोटींतून वहाणाऱ्या पाण्यावरून चाळींत भांडणें पेटलीं तर बिघडले कुठें?–एकमेकांना 'पाण्यांत पहाणें' हा शब्दप्रयोग नळाच्या पाण्यावरून तर स्फुरला नसेल ना? "आमच्याच चाळीला हसायला नको कांहीं—चाळोचाळीं पितळेच्याच तोट्या!" असें बटाट्याच्या चाळींतल्या एक प्रवक्त्या म्हणाल्या!)

परंतु गेले कांहीं महिने 'चाळ' पूर्वीसारखी कांहीं नांदत नाहीं असे वारे चाळींत वाहूं लागले. बटाट्याच्या चाळींत वारे वाहिलेले

*गच्चीचं कुलूप निघालं आणि 'गच्ची कुणाची?' अशा हैराण आरोळ्या बटाट्याच्या चाळींत रात्रीं अपरात्रीं उठूं लागल्या!*

असे हेच. ह्या पलिकडे वाऱ्याचा आणि चाळीचा संबंध नाहीं. पूर्वी चाळींत मतभेद होते; परंतु ते तपशिलाच्या स्वरूपाचे होते. प्राध्यापक नागूतात्या आढ्यांच्या स्वभावाला स्पष्टवक्तेपणा म्हणावें कीं, आगाऊपणा म्हणावें; गुत्यांची कुमुद चंदू भाटकरचा 'हात धरून गेली' म्हणावें कीं, तिचा प्रेमविवाह झाला म्हणावें; द्वारकानाथ गुप्त्याला स्टोअरकीपरची जागा मिळाली की कॅशरची? आतांशा वेणाक्कांचं चंद्रामावशींशीं (गंगूच्या मावशी असाहि एक पाठभेद आहे.) सूत जमलंय् कीं मेतकूट? बाबलीबाई त्रिलोकेकर आणि गुलाबबाई मानकामे ह्यांची जात एकच कीं नुसता 'पोट' भेद आहे—असा केवळ तपशिलांतला मतभेद होता. परंतु आतांशा खोल्याखोल्यांतून "तुमचं आमचं पटणं शक्य नाहीं—" "मग जा हवं तर मफतलाल पार्कांत रहायला—" "वरच्या मजल्यावर रहातां म्हणजे कांहीं स्वर्गाला हात नाहीं लागत" "तळमजला म्हणजे कांहीं रौरव नरक नाहीं" अशीं स्फोटक वाक्यें चाळीच्या फटीफटींतून. आणि शेजाऱ्याशेजाऱ्यांतून घुमूं लागली. त्यांतून बटाट्याच्या चाळीचा आद्य मालक कै. धुळाप्पामा बटाटे याच्या चालू वंशजानें,



*अस्खलित शब्द नसले तरी अस्खलित भावना असलेला आत्मू !*

बहुतेक श्रीमंतांचे वंशज पुढें पुढें जे करतात ते धंदे केल्यामुळें चाळीच्या मालकीचाहि खांदेपालट झाला आणि चाळीची मालकी बटाटे घराण्यांतून मेंढे पाटलांच्या घराण्याकडे गेली. मेंढे पाटील कोथिंबिरीचे होलसेल मर्चंट. मालकीचा थारेपालट झाल्यादिवशीं सर्व चाळींतल्या मंडळींनीं 'चाळदिन' म्हणून साजरा करायचें ठरवलें. नवा मालक कमालीचा प्रेमळ होता. त्यानें कोणत्याहि अधिकारारूढपक्षाला लाजेनें खालीं पहायला लावतील इतकीं आश्वासनें चाळकरी मंडळींना दिलीं. त्यांत प्रत्येक खोलींत पंखा, धावनपात्री (ज्याला इंग्रज लोक वाशबेसीन म्हणतात—) शौचकुंडाची सफाई, गॅलरींत दिवे, चाळीला तेलाचा रंग, मूत्रस्थडिलांतील समस्त फुटक्या फरशांची दुरुस्ती, जिन्याच्या कांहीं पायऱ्या गायब होत्या त्या बसवणें, मधला चौक साफ करून तेथें बॅडमिंटन् कोर्ट, अशा अनेक सुधारणा जाहीर केल्या. इतकेंच नव्हे, तर चाळींतल्या मुलांची फुकट शिक्षणाची सोय, मुलींच्या लग्नांची तरतूद, प्रौढ स्त्रियांसाठीं शारीरिक शिक्षणाचे वर्ग आणि पुरुषांसाठीं पळण्याच्या शर्यती, तरुणांना दर आठवड्याला फुकट सिनेमा, मुलींसाठीं भावगीत स्पर्धा, म्हाताऱ्यांसाठीं दर गुरुवारीं स्वखर्चांत प्रवचनें आणि वृद्ध स्त्रियांसाठीं प्रापंचिक चर्चामंडळें स्थापन करून द्यावयाचीहि घोषणा केली. चाळीची अशी ही सर्वांगीण विकासाची कल्पना त्यानें जाहीर केली, त्या दिवसापासून बटाट्याच्या चाळींत उत्साहाचें वारें खेळूं लागलें. (चाळींत खेळलेलें कालमानपद्धतीप्रमाणें हें पहिलें वारें आणि असंतोषाचें मागाहून—) ह्या सुधारणा जाहीर करतांना चाळीच्या गच्चींत जाण्याचा छोटा जिना जो आजवर बंद होता, तो सगळ्या चाळीला खुला करून देण्याची त्यानं घोषणा केली आणि इथें सारें कांहीं बिघडलें.

वादाला तोंड फुटलें तें 'गच्ची कोणाची?' या विषयावर!! आणि तिन्ही मजल्यांतल्या लोकांचीं रणें माजलीं तीं ह्या विषयावर—'गच्ची कोणाची?' आजवर हा जिना बंदच होता. आणि शतकानुशतकें चाळींत राहिलेल्या मंडळींना आपल्या चाळीला एक गच्ची आहे ह्याची दादहि नव्हती. परंतु नवीन मालक मेंढे पाटील यांनीं गच्चीसकट बटाट्याची चाळ भाडेकरूंच्या हवालीं केल्याबरोबर 'गच्ची कुणाची! गच्ची कुणाची?' अशा हैराण आरोळ्या चाळींतून रात्रीं अपरात्रीं उठूं लागल्या. गच्चीवरील आपला हक्क शाबीत करण्यासाठीं तीनहि मजल्यावरील मिळून तीस त्रिक नव्वद बिऱ्हाडांतील मंडळींनीं गच्चीवर तळ ठोकला. नवरे कचेरीला गेले कीं, उन्हापावसाला न जुमानतां बायकामंडळी ते परत येईपर्यंत गच्चींत बसून राहूं लागल्या. संध्याकाळीं पुरुष परतले कीं, 'खो' दिल्यासारख्या बायका नवऱ्यांना जागा करून देऊन आपापल्या बिऱ्हाडांत स्वैंपाकपाण्यासाठीं येऊं लागल्या. चोवीस तास प्रत्येक बिऱ्हाडांतला कोणीना कोणी तरी गच्चींत बैठा संप करीत बसलेलाच असे.

तिसऱ्या माळ्यावरच्या लोकांचा दावा 'गच्ची आमची.' कारण गच्चींत जायचा रस्ता त्यांच्या गॅलरींतून आहे. भौगोलिक दृष्ट्या गच्ची आमची आहे. तर तळमजल्यावरील भाडेकरू म्हणत, आमच्या भिंतींच्या आधारावर तर सगळी चाळ उभी आहे! तळमजल्यावरील मंडळी जरा सधनपैकीं म्हणजे एका खोलींत बिऱ्हाड आणि



*अध्याहृत अवस्थेंतला शा. चापसी !*

समोरच्या खोलींत दुकान अशा थाटांत रहाणारी. त्यामुळें त्यांची पुरुषमंडळी दिवसभर घरांतच! त्यांतून तळमजल्यावरील पांचसहा गाळे शा. चापशी मुळशीच्या किराणाभुसार दुकानानें व्यापले होते आणि चाळीचें भाडें वसूल करणारे गृहस्थ रामसहाय दुबे ऊर्फ भय्या ह्याच्याशीं संगनमत करून तो सारा तळमजला गिळंकृत करून बसला होता. त्यामुळें बाकीचे सर्व त्याचे पोटभाडेकरू झाले होते. वास्तविक खुद्द चापशी हा चाळींत कधींच रहात नसे. किंबहुना त्या दुकानाला चापशीचें दुकान म्हणत, आणि चापशी कुठला हें कोणीच पाहिलें नव्हतें. बटाट्याच्या चाळींतला 'बटाटे' हा जसा भूमितींतल्या त्रिकोणाप्रमाणें "समजा हा बटाटे आहे" अशा अध्याहृत अवस्थेंत असतो, त्याप्रमाणें 'चापशी' ही देखील व्यक्ति नसून अध्याहृत संस्था होती. त्यांतून चालू चापशी हा वजनानें व आकारानें समोरच्या पोत्यांप्रमाणें स्थाणुत्वांतून गतिमानतेकडे गेलाच तर स्वतःच्या पायांनीं जाणार नाहीं याची सहज खात्री पटली असती. तरीहि गच्ची ही मालक मेंढे पाटील यांनीं केंद्रशासित करावी अगर स्वतःला भाड्यानें द्यावी म्हणजे धान्य वाळवण्यासाठीं आपण त्याचा उपयोग करूं; त्या निमित्तानें दहा बारा मंडळींना काम मिळेल आणि चाळीच्या आर्थिक अभिवृद्धींत भर पडेल असें त्याचें म्हणणें होतें असें कळतें. वास्तविक ह्या बाबतींत त्याचें म्हणणें कधींच कळलें नाहीं. परंतु भय्या रामसहाय दुबे हाच त्याच्या वतीनें बोलायचा. बरें, चापशीचा गच्चीला विरोध म्हटल्यावर सारा तळमजला उलटला! चापशीच्या पोटभाडेकरूंत उजव्या हाताला आत्मू सत्यवान् माईणकराचें 'सत्यवान मटण प्लेट हाऊस!' तें सदैव चापशीच्या

उधारीवर चालायचें. त्यामुळें तो चूप. वास्तविक आत्मू तोंडाचा जबरा! सदैव अमक्याचा खिमा करीन, तमक्याची शागुती करीन, ह्या शिवाय भाषा नाहीं. संध्याकाळीं दिवेलागणीनंतर शब्द अस्खलित नसले तरी भावना अस्खलित असायची. "गच्ची काय ह्यांच्या बापसाची? ज्यादा वकवक करील कोण तर गच्चीसाठीं खची करीन. रे अर्जुना, त्यांनला भेजा पाहिजे बघ— ×! ×!? ×! च्या हाटलांत नोक्री करतुस काय हज्जामती करतोस—गच्ची मिळवीन तर नांवाचा आत्मू—" अशी भाषा. पण द्वारकानाथ गुते 'गच्चीसकट बटाट्याची चाळ–दिनाच्या सभेंत बोल' म्हणून सांगायला गेले तर 'गुतेशेट हां भासनाभिसना काम आमचा नाय्–सुक्का मटन् देंव बांदून' म्हणून मुद्दा डावलूं लागला. आत्मूची ही अवस्था तर त्याच्या उजव्या हाताच्या जगन्नाथ फ्रंबरची इस्सेभी जादा! "हाय काय त्या गच्चींत? साली पान्याची टाकी हाय येक फुटकी. साली पलंबरशिवाय पाहिजे कशाला गच्ची ह्या लोकान्ला? काय उडी मारून जीव द्यायचाय्—" असा खुला विरोध. तिसरा आगष्टिन् फर्टाडो. टेलर्स ॲन्ड आऊटफिटर्स. आचार्य बाबा बर्वे त्याला ही "गाच्चिक समस्या" समजावून द्यायला गेले, तेर एकदम "अँ!– काय सांगतो रे तूं!" असा एकदम अरे तुरे वर आला. वास्तविक फर्टाडोचा बाबांवर राग होता तो निराळ्याच कारणासाठीं. बाबा नुसता पंचा नेसायचे आणि शाल पांघरायचे. त्यामुळें फर्टाडो उखडून होता. सगळ्या चाळीचा तो 'टेलर'. पण बाबांच्याबाबतींत वचकून रहाण्याचें कारणच नव्हतें. मात्र चाळींतला तो एकमेव ख्रिस्ती. त्यामुळें त्याचें मन अर्थी वळवलें पाहिजे ही बाबांची भूमिका. रविवारीं सव्बाथ असतो ह्या पुस्तकी समजुतीनें बाबा त्याला भेटायला गेले, त्यावेळीं फर्टाडो कुणाचा तरी गळा कीं खिसा कापत तोंडांत चुरुटाची विडी आणि गळ्यांत टेप घालून कामांत गढला होता. फर्टाडोची बायको नवऱ्याच्या फाटक्या विजारीला ठिगळ जोडीत होती. मोठा मुलगा पेद्रू ट्रंपेटवर किती भयंकर सूर निघूं शकतात याची जगाला जाणीव करून देत होता.

बाबा बर्व्यांना फर्टाडोच्या दुकानांत शिरतांना पाहून सारें आसमंत दचकलें! फर्टाडोच्या दुकानांत बाबा बर्वे म्हणजे मासळी बाजारांत ववशांच्या काकू किंवा संस्कृत पाठशाळेंत सोकरजी त्रेलोकेकर अगर आखाड्यांत एच. मंगेशराव शिरण्यापैकीं होतें. खुद्द फर्टाडोदेखील तीन ताड उडाला आणि त्याच्या तोंडांतली चुरुटाची जळती विडी समोरच्या कोटावर पडून कॉलर जळाली. फर्टाडोच्या बायकोच्या बोटांत सुई गेली आणि ती कोंकणींत किंचाळली आणि पेद्रूच्या ट्रंपेटमधून अडाण्याचे सूर निघून गेले.

"गुड मॉर्निंग मिस्टर फर्टाडो" बाबा बर्वे आपल्या आचार्य ढंगाच्या मऊ मुलयम आणि पातळ स्वरांत अभिवादन करते झाले.

"गुड मॉर्निंग! पेद्रू भितर बोस रे—" आपल्या ट्रंपेटवाल्या मुलाला आंत पिटाळून फर्टाडोनें बाबांना खुर्ची दिली. "बोस् रे बोर्वे!—" फर्टाडोला आपलें नांव ठाऊक आहे ह्या कल्पनेनें बाबांच्या अंगावर मूठभर मांस आलें. आश्चर्याचा भर ओसरल्यावर फर्टाडोच्या कोंकणी चेहऱ्यावर मिस्किल स्मिताची रेषा उमटली आणि त्यानें बाबांना विचारलें, "सूट शिवतो काय रे बोर्वे—" फर्टाडोची 'एकेरी' बाबांना रुचली नाहीं. परंतु त्याचें भाषिक अज्ञान ध्यानांत घेऊन





अनुक्रमणिका

बाबांनींहि त्याच्या विनोदाला हंसण्याचा सर्वोदयी प्रयत्न केला.

"मिस्टर फर्टाडो—चर्चमधें गेला नाहीं वाटतं आज?—" धार्मिक भावनांना आवाहन करून, आध्यात्मिक पातळीवरून हा गच्चिक प्रश्न सोडवायचा असा बाबांचा निश्चय होता.

"अँ!!" खास गोमंतकीय तुच्छतादर्शक उद्गाराचा आश्रय घेऊन फर्टाडो म्हणाला, "टायम् कोणाला असतो रे? माझा वाइफ जातो इगर्जीत. मी काय बायको काय रे? मी कोणाचा डेथ झाला, नाय तर वेडिंग असला तर जातों. हाल्लीं तें बी नाय जात. नो ड्रिंक् नो नथिंग—मग वगीच टायम वेस्ट कशाला करतोस मी इगर्जीत"

"पण आत्म्याची उन्नति नको करायला?—"

"आत्मू डांबीस हाय! दोन प्लेट खिमा मांगतो तर कॅश् मनी मांगतो. आनि अजून सिल्क शर्टचा शिलाइ नाय् देत—बास्टर्ड!"

हृदयग्रस्थ आत्मा आणि शेजारचा आत्मू ह्यांत फर्टाडोनें केलेला घोटाळा आचार्य बाबांच्या ध्यानांत आला आणि त्यांनीं 'सोल' हा शब्द वापरून तोच प्रश्न टाकला. पण फर्टाडोच्या डोक्यांत प्रकाश पडेना. शेवटीं सरळ त्यांनीं गच्चीचा प्रश्न केला.

"अरे इथें टॅरेस् कोनाला पावजे? तूं काय तिथें लोळेल काय रे? ते मी काय नाय रे बाबा वरी करत—माझ्या फादर पासून मी हिकडे राहतों तर कोण वगीच टॅरेसवर जातो रे! उगीच झगडीं कशाला रे! तूं तुजा धंदा कर मी माजा करतों! तूं काय धंदा करतो रे बोवें?"

शेवटला प्रश्न चरख्याच्या चातीसारखा बाबांच्या काळजांत रुतला. तुमचा धंदा काय हा प्रश्न आजवर कुठल्याहि आचार्याला कोणीहि विचारलो नव्हता. आचार्य बाबा बर्वे गारठले.

"माझा धंदा जगांत सद्भाव निर्माण करणें"

हा काय धंदा आहे हें कांहीं फर्टाडोच्या लक्षांत आलें नाहीं. परंतु कांहीं तरी तयार करायचा धंदा आहे एवढें त्याच्या ध्यानांत आलें.

"सोल एजन्सी हाय काय रे तुझेकोडे?—"

"हो. एका अर्थी 'सोल' एजन्सीच."

बाबा सोल शब्दांवर कोटी करून म्हणाले. परंतु ती कोटी ऐकायला फर्टाडो, त्याची बायको, पेद्रू आणि पेद्रूचा धाकटा भाऊ डुमीन ही मंडळी असल्यामुळें ती कोटी आणि बाबांची सद्भाव-वृद्धिमिशनची पहिली आध्यात्मिक फैर फुकट गेली.





बटाट्याच्या चाळींतला एकमेव गटेकापू आणि खिसेकापू मिस्टर फर्टाडो!

मात्र फर्टाडोवर जरी त्या मिशनचा परिणाम झाला नाहीं, तरी इथून चळवळीला तोंड लागलें आणि त्याला कारण चाळींतील एकमेव साहित्यिक म्हाळसाकांत पोंबुर्पेकर. वास्तविक बटाट्याच्या चाळींत निष्काम साहित्यसेवा करतांना गेल्याच वर्षी पोंबुर्पेकरांचे हात भाजले होते. आणि ते पोंबुर्प्याला घरचें पहायला गेले होते. मधल्या काळांत पावशांच्या कन्येला विधीनेंच ठरविलेल्या सौभद्रीय संकेताला अनुसरून कोणा एका पतीची निपज झाली होतीआणि चाळींत अलवेल होऊन पुन्हा म्हाळसाकांतांचा तळ चाळीच्या दुसऱ्या मजल्यावर पडला होता. प्रसंग शूराला धीर देतो म्हणतात. बटाट्याच्या चाळींतल्या ह्या प्रसंगानें म्हाळसाकांत पोंबुर्पेकराच्या लेखणीला पुन्हा धीर आला आणि त्यांनीं चाळीय चळवळीला प्रोत्साहन देऊन चाळीय जीवनांत चैतन्य उत्पन्न करण्याच्या उदात्त आणि पवित्र हेतूनें "चाळभैरव" नांवाचें सायक्लोस्टाइल साप्ताहिक काढण्याचा संकल्प जाहीर केला. "गच्ची कुणाची?—चाळकऱ्यांची" हा पहिला अग्रलेख तिन्ही मजल्यावर गाजला. त्यांतील सर्व उतारे देण्याचा मोह स्थळसंकोचास्तव टाळला पाहिजे. नुसते अग्रलेखांचे मथळेच पहाः—

"गच्चीसाठीं स्वातंत्र्याची खच्ची"
"चापशीला टापशी गुंडाळा"
"चाळकऱ्यांनो वाचाळतेहून कृति श्रेष्ठ"
"मेंढे पाटील आणि मेंढरे" इ० इ०

...चाळभैरवाच्या पहिल्या अंकानें अपेक्षेबाहेर खळबळ उडाली. चाळींतल्या भिंतींवर, गॅलरीमधून, खिडक्या—दारांवर खडूनें 'गच्चीसकट बटाट्याची चाळ झालीच पाहिजे' अशीं घोषवाक्यें लिहिण्यांत आलीं. "गच्ची कुणाची?—आमची— नाहीं कुणाच्या बापाची" वगैरे घोषणाहि दुमदुमूं लागल्या. दुसऱ्या आणि तिसऱ्या मजल्यावरील मंडळींनीं संयुक्त आघाडी उभारली. तर चापशीच्या छुप्या नेतृत्वाखालीं आत्मू माईणकर, जगन्नाथ फुंदर आणि तळमजल्यावरचा डॉक्टर हातवळणे ह्यांनीं गच्ची ही मालकांनीं आपल्या स्वतःच्या ताब्यांत ठेवून केंद्रशासित करावी असा डाव सुरू केला. वास्तविक डॉक्टर हातवळण्याचा बटाट्याच्या चाळींत फक्त दवाखाना होता. आणि कांहीं वर्षांपूर्वी समोरच्या चाळींत डॉक्टर रणभिश्यांच्या दवाखान्यांत हा हातवळण्या कांपौंडर होता. रणभिसे डॉक्टरांच्या मृत्यूनंतर ('रणभिसे देवमाणूस होता! पैशाची पर्वा नव्हती त्याला. आमच्या वाइफची डिलिवरी सहा वेळेला मोफत केली.' द्वारकानाथ गुप्ते यांचें डॉ. रणभिश्यांबद्दलचें हें मत 'चिरंत्य' आहे!) त्यांचीं प्रिस्क्रिप्शनें आणि दवाखान्यांतल्या बऱ्याचशा बाटल्या पळवून हातवळण्यांनीं त्यांच्याच पाटीवर बोळा फिरवून आपल्या नांवाचीं अक्षरें रंगवली होतीं. आणि रणभिश्यांच्या एल्. एम्. ॲण्ड एस्. ह्या पदवीचीं अक्षरें पुसट ठेवलीं होतीं. पहाणाऱ्याला वाटावें ह्या ह्याच्याच पदव्या! (अंदरकी बात रणभिश्यांच्या जळत्या जिवाला ठाऊक आणि पेंटर जिवाला ठाऊक!)

• •

संयुक्त दुमली आघाडीची पहिली सभा आचार्य बाबा बर्व्यांच्या अध्यक्षतेखालीं चाळीच्या चौकांत भरली. वास्तविक ही सभा गच्चीवर जाण्याच्या जिन्याच्या दाराला चापसीचा हस्तक रामसहाय दुबे भय्या ह्यानें घातलेलें लठ्ठ कुलूप फोडून गच्चीवर घ्यावी असें चाळींतल्या डाव्या गटाचें मत होतें. परंतु कोणत्याहि हिंसक मार्गाचा आश्रय करावयाचा नाहीं अशी प्रतिज्ञा करून आचार्य बाबा बर्व्यांनीं चळवळीचीं सूत्रें आपल्या हातांत घेतलीं. रात्रीं नवाला चौकांत सभेला सुरवात झाली. मंडळींना पोलिस बंदोबस्त असावा अशी फार इच्छा होती. सभा सुरू होतांना एक पोलीस आलाही होता. परंतु तो दुसऱ्या मजल्यावरील नाना सावंतांचा



अण्णा पावशांचा (माजी) भावी जांवई —म्हाळकांत पोंबुर्पेकर!



अनुक्रमणिका

मेहुणा मालवणहून आलेलें काजूचें पार्सल आपल्या वहिणीला देण्यासाठीं आल्याचें कळलें. सभेची सुरवात प्रथम प्रार्थनेनें व्हावी अशी सूचना एच. मंगेशरावांनीं केली आणि त्याप्रमाणें चाळींतील कवि नाथ लोणंदकर याच्या गीतानें व्हायची ठरलें. एच. मंगेशरावांचें 'म्यूजिक्' आणि वरदाबाईंचें गाणें एवढ्यानेंच मेंढे पाटील वळणावर येतील असें दुसऱ्या मजल्यावरील जनोबा नेरूरकर म्हणाल्याचें त्यांना कळलें आणि त्याबद्दल जनोबावर डिसिप्लिनरी ॲक्शन् कां घेऊं नये असा मंगेशरावांनीं आणि नाथ लोणंदकरांनीं आचार्य बाबांना संयुक्त सवाल केला. परंतु जनोबांनीं आपल्या कानांवर हात ठेवून—'अहो मी हो कशाला असं बोलूं? काय समजलेत? मंगेशरावाच्या गायनाला मी नाव कशाला म्हणेन— काय समजलेत—' अशी पडक्या आवाजांत नाकबुली दिल्यावर प्रकरण मिटलें आणि शेवटीं वरदाबाईंच्या नमनाला सुरवात झाली.

उचलूं या झेंडे—ह्या पहिल्या ललकारीनें सारी चाळ हादरली. मंगेशरावांनीं जवळजवळ सगळे राग त्या गाण्यांत कोंबले होते. एका रागांतून दुसऱ्या रागांत शिरतांना रूळ बदलल्यावर गाडीचा होतो तसा स्वरांचा खडखडाट होत होता. सुरांचा पत्ता नसल्यामुळें जनोबांनीं पेठेमामांच्या कानांत (पोस्टल् डिपार्टमेंट)—'अहो सूर बेपत्ता कीं हो. डेड लेटर हापिसांत टाका—' अशी कोटी केलीच!

वरदाबाई मुक्त कंठानें गात होत्या, 'उचलूं या झेंडे.' तबल्यावर स्वतः एच. मंगेशराव आणि पेटीला काशीनाथ नाडकर्ण्यांचा मुलगा (ह्याच नांवानें हा चाळींत ओळखला जातो—) होता. मंगेशराव तबला वाजवतांना त्याच्यावर सारखे दांत ओठ खात होते. कारण काशीनाथ नाडकर्ण्यांचा मुलगा, वरदाबाईंनीं 'उचलूं या' म्हटलें कीं 'झेंडे' वाजवायचा. त्यामुळें मंगेशरावांचा ठेका चुकायचा. त्यांतून काशीनाथ नाडकर्ण्यांचा मुलगा हा मंगेशरावांचा शिष्य. त्यामुळें मंगेशराव गाणें चालू असतांना "इत्ते करता रे—इत्लें सिंपल् ट्यून वाज्जींच्या यन्ना जाल्यारि..." असें मधून मधून ओरडलेलें ऐकूं यायचें. परंतु मागें सांस्कृतिक सप्ताहांत मंगेशरावांनीं स्वतंत्र तम्लावादन केलें होतें, त्यावेळीं देखील ते धात्तिरिकिड—कत्ता—तुन्ना असें कांहींसें करीत असल्यामुळें मंडळींना तो त्यांतलाच प्रकार वाटला. नमन जेमतेम पहिल्या कडव्यापर्यंत पोंहोंचलें. शेवटीं काशीनाथ नाडकर्ण्यांच्या मुलाची पेटी असह्य होऊन त्याला एका हातानें भाता फुंकायला लावून उजव्या हातानें पेटी आणि डाव्या हातानें डग्गा अशा थाटांत वरदाबाईंची साथ करायला मंगेशराव बसले.

"चाळकऱ्यांनों एकजुटीनें उचलूं या झेंडे
पातले मालक नवे हे चाळीला आतां
गच्चीसह चाळींत नांदणें हवें आम्हा आतां—
गाडुन दुहिला आणिक पळवुन त्या मेंढे
चाळकऱ्यांनो एकजुटीचा..."

'पळवुन त्या मेंढे—' ह्या ओळीला कडकडून टाळी झाली. परंतु त्या गडबडींत 'एक ब्यूटिफुल म्यूजिक पीस वेस्ट' झाला म्हणून मंगेशराव व्याकुळ झाले.

नमनाला एच. मंगेशरावांचें घडाभर रक्त आटलें आणि नमन पार पडलें. सुरवातीला द्वारकानाथ गुप्त्यांनीं आचार्य बाबा बर्वेनीं ह्या चळवळीचें नेतृत्व स्वीकारावें अशी सूचना करतांना म्हटलें—

"गच्चीचा प्रश्न हा आमच्या जीवनमरणाचा प्रश्न आहे. कायस्थाच्या इमानाला—बाजीप्रभूच्या पुण्याईला—मुरारबाजीच्या त्यागाला स्मरून मी प्रतिज्ञा करतों कीं, गच्चीसकट चटाट्याची

चाळ ही आमची मागणी पुरी होईपर्यंत मी स्वस्थ राहाणार नाहीं. माझी दोन महिन्यांची अर्नड् लीव्ह मी रोह्याला न जातां चाळीच्या चळवळीसाठीं खर्च करीन (टाळ्या!)—ह्या चळवळीचें नेतृत्व आचार्य बाबा बर्वे ह्यांनीं स्वीकारलें पाहिजे. (टाळ्या.) आचार्यांची पुण्याई मोठी आहे. (टाळ्या.) त्यांचा त्याग अलौकिक आहे. (टाळ्या.) त्यांचें ह्यावरील (मधले शब्द कोणालाच कळले नाहींत तरीहि टाळ्या.)......" पुढेंपुढें टाळ्या देणारांचा उत्साह इतका वाढला की आधीं टाळ्या आणि मग द्वारकानाथ गुप्त्याचें वाक्य असा प्रकार होऊं लागला. गुप्त्याच्या भाषणाला दुजोरा द्यायला सोकरजी त्रिलोकेकर उभे राहिले. बराच वेळ इंग्रजींतून बोलावें कीं मराठींतून अशा विचारांत त्यांनीं घालवला. आणि सुरवात "फ्रेंडस्" अशी करून पुढें मराठीवर घसरले :

"आत्तांच मिस्टर गुप्ते बोलला की साला वुइ शॅल् युनाइट् ॲन्ड फाइट्. ती गोष्ट आपण आपल्या माइंडमदीं कीप अप कराला पायजे. सुरवातीच्या बिगिनिंग मदीं मिसेस हट्टंगडी जें गाणें बोलल्या, त्यांतलं मीनिंग आपण समजून घेतलं पायजे. की साली वुई मस्ट युनाइट्–ॲण्ड फाइट्! चापशींची चालबाजी आपण टॉलरेट करून चालणार नाय! पण आपल्या-पैकींच कांहीं लोक त्याच्यावर डान्स ॲटेंडन्स् करतात. पण मी सांगतों तो लबाड आहे. आय् डोंट केअर. आपण तर सालं फ्रँक बोलतो. सगळा माल देतो तर साला रॉटन्! एक पण वस्तू चांगली ठेवत नाय (शेम शेम.) गेल्या रविवारची गोष्ट आहे—आमच्या वाइफनी साली बिर्यानी बनवली होती फर्स्टक्लास. आमच्या कम्युनिटींतल्या कांहीं फ्रेंड्सची पिकनीक होती चेण्याच्या डोंगरा-वर. तर ह्या चापशींनीं साला दिल्ली राइस म्हणून ऑर्डिनरी कोळंबा राइस् मारला गळ्यांत. साली सगळी ट्रिप स्पॉइल् झाली आमची! आणि हा आतां आपल्या चाळीचा ओनर आहे त्याचा राइटहॅण्ड मॅन आहे. डिसॉनेस्ट! आपण टॅरेसची स्ट्रगल् जोरात चालवली पायजे. साली खुल्ली हवा आम्ही नाय खायची तर कोणी? आमचा फ्रेंड गुप्ते जें बोलला दॅट् इज् करेक्ट–आचार्य बर्वे बाबा आमचे लीडर होऊन दर्शन दाखवतील (अहो मार्गदर्शन म्हणा—अशी आरोळी)–तेंच तेंच! इथें साले मराठी येते कोणाला? भरडामधें तर सगळ मीडिअम ऑफ इन्स्ट्रक्शन् इंग्लीश होती. (पुरे पुरे—च्या आरोळ्या.)–हे पहा. ही युनिटी नाय आपली—डिसिप्लिन् नाय. इंग्लिश लोक होते तर काय डिसिप्लीन. सालं आमच्या बँकेंत दहाच्या ठोक्याला सगळे हजर. हल्लीं काय—ऑल् गॉन् ("विषयाला धरून बोला"—एक आवाज)—हे बघा मला असा मधीं मधीं हेकलिंग करून मी हारणार नाहीं. साला मी फ्रँक बोलणार–साला हेड क्लार्कला तापवतों मी ऑफिसमधीं, तुम्हांला काय भितो (थापा मारू नका.) मिस्टर प्रेसिडेंड, आय् वोंट अलाव् धिस्–साली काय चाळ हाय का कबुतर-खाना!!—"

"हा चाळीचा अपमान आहे! शब्द मागें घ्या" कुशाभाऊ ओरडले.

"अरे जा–हू आर् यू!"

"तुम्ही चाळीचा अपमान केला आहे! गच्ची नाहीं मिळाली तर बेहत्तर. चाळीचा अपमान सहन करणार नाहीं" असें बोलत बोलत कुशाभाऊ व्यासपीठावर चढले. आणि टेबलाचा आधार घेऊन बोलूं लागले :

"मित्रहो, हा तत्त्वाचा प्रश्न आहे. मिस्टर त्रिलोकेकर स्वतःला काय समजतात. कोण म्हणतो चाळींत एकी नाहीं—"





अनुक्रमणिका

एकदम एक आवाज आला "मी म्हणतों–"

"कशावरून?" कुशाभाऊ ओरडले, "आज गच्चीसाठीं प्राण द्यायला आपण तयार झालों आहों. चाळींतल्या खोल्या गेल्या तरी हरकत नाहीं. पण गच्ची मिळाली पाहिजे. गच्ची हा आपला जन्मसिद्ध हक्क आहे आणि तो आपण मिळवणारच!—बोला शिवाजी महाराजकी जय!!—मित्रहो परंतु त्याला आचार्य बाबा बर्व्यांसारखे पुढारी उपयोगाचे नाहींत. हें मी त्यांच्या तोंडावर सांगतों. त्यांचा हृदयपरिवर्तनावर विश्वास आहे, आमचा नाहीं. आज मेंढेपाटलाच्या घरावर मोर्चा नेऊं-त्याला बाहि भगवान् करून सोडूं—(प्रचंड टाळ्या) तरच हा गच्चीचा प्रश्न सुटेल. बोला संभाजी महाराजकी जय!! गच्ची आपली आहे. गच्चीवरून दिसणारं आकाश आपलं आहे. चौपाटीवरून येणारी हवा आपली आहे. बोला राजाराम महाराजकी जय!! (टाळ्या) ही आपल्या हातून कोण हिसकावणार? पानपतावर प्राणार्पण केलेल्या लोकांचे आपण वंशज आहो—बोला सदाशिवरावभाऊकी जय..." ह्या पुढें कुशाभाऊला मुद्दा सुचेना तेव्हां सुमारे पन्नास एक महापुरुषांच्या नांवांचा जयजयकार झाला. 'जयजय' ओरडून मंडळीहि थकली आणि आपोआप शांतता झाली त्याचा फायदा घेऊन आचार्य बाबा उठले. तेवढ्यांत अण्णा पावशे 'मला बोलू द्या. हा कुशाभाऊ लुच्चा आहे' एवढेच शब्द ते उच्चारूं शकले. कारण अंधारांत कुणी तरी त्यांचा सद्रा ओढून त्यांना खालीं बसवलें.

"माझ्या बंधूनों आणि भगिनींनो" आचार्यांनीं भाषण सुरू केलें, "आपली भारतीय संस्कृति उच्च आहे! जीवनांतील विकास सर्वांगीण व्हावा. प्राचीन ऋषिमुनींनीं आध्यात्मिक पातळीवरून जीवितांतलीं सारीं कोडीं सोडवलीं. त्यांना माझे लक्ष प्रणाम—(इथें दोनतीन मंडळींनीं टाळ्या वाजवल्या. इतर कोणीच न वाजवल्यामुळें ती मंडळी जराशी वरमलीं.)—जीवन म्हणजे गति! जें गतिमान आहे तें चैतन्यमय आहे. चैतन्य आणि मूळ आधार—कशाचे? विकासाचे"

"अरे पण गच्चीचें काय?" जनोबा रेगे काशीनाथ नाडकर्ण्यांच्या कानांत कुजबुजले. "गप्प रे जनोबा. भारी शंका रे मेल्या तुज्या. असां काय! वशाड मेलो—" काशीनाथ नाडकर्ण्यांनीं आपल्याला खास 'कुडाळमें पैदा हुवा' स्वरांत जनोबा रेग्याला चापलें!...आचार्य बोलतच होते. त्यांच्या शांत, संथ आणि विषयाशीं संबंध नसलेल्या बोलण्यातून मंडळी सुस्तावली. सुमारे पाऊण तास आचार्य वेदकालीन जंगलांत वाट चुकून शेवटीं बटाट्याच्या चाळीपर्यंत आले.

"हा लढा केला पाहिजे. मला गच्ची हवी. परंतु ती शांततामय मार्गानें हवी. हिंसात्मक मार्गानें मिळालेलें इंद्रासन देखील मला नको. मेंढे पाटलांकडे आपण जाऊं. त्यांचें मन जिंकूं. आज त्यांनीं गच्ची दिली नाहीं तरी हरकत नाहीं. आज त्यांचं मन आपल्याला हवं आहे. त्यांचं मन मिळाल्यावर ते गच्चीचा सुवर्णनारळ आपल्या हातीं दिल्याशिवाय रहाणार नाहींत. प्रत्येकाच्या अंतःकरणांत परमेश्वर आहे (आणि डोळ्यांत झोप आहे'–एक आवाज व त्यामागून हंशा.) मेंढे पाटलांच्या अंतःकरणाला कौल लावा. गच्ची मिळाल्याशिवाय रहाणार नाहीं...आणि मिळाली नाहीं तरी परमेश्वराचें आकाश आपण कुठूनहि पाहूं शकतों. त्यानें निर्माण केलेला वारा कुठूनहि. ('ह्यांची टोकाची खोली आहे म्हणून मिळतो. काय समजलेत'—काशीनाथ नाडकर्ण्यांच्या कानांत जनोबा रेगे.) आपण चाळींतील प्रातिनिधिक शिष्टमंडळ घेऊन मेंढे पाटलांच्या घरीं जाऊं—"

—त्याप्रमाणें द्वारकानाथ गुप्ते स्वतः आचार्य, सोकरजी त्रिलोकेकर यांचें शिष्टमंडळ मेंढे पाटलांच्या चेंबूरच्या बंगल्यावर भेटायला गेले. जाण्यापूर्वी त्याच चौकांत शिष्टमंडळाचा सत्कार व्हायचें ठरलें. अण्णा पावशांचा शिष्टमंडळाला विरोध होता. असल्या मार्गानें कांहींहि होणार नाहीं, आपण 'डायरेक्ट ॲक्शन' घेतली पाहिजे असें त्यांचें म्हणणें. भाडेबंदीची चळवळ सुरू करावी असें त्यांनी आणि प्राध्यापक नागूतात्या आढ्यांनीं ठरवलें. नागूतात्यांचा एकूण कुठल्याहि गोष्टीला विरोध असतो. गच्ची चाळीच्या मालकीची असावी ह्याहि मताला त्यांचा विरोध होता आणि नसावी ह्याहि मताला होता. चापशीच्या दुकानावर सर्वांनीं बहिष्कार घालायचें ठरवलें, त्या दिवशीं स्वतः नागूतात्यांनीं दुकानांत जाऊन सर्वांच्या देखत धडाभर कांदे आणि बाटलीभर खोबऱ्याचें तेल चापशीकडून आणलें. त्यांच्या सहकार्यामुळें चापशीचे हस्तक आत्मू आणि जगन्नाथ फुंबर त्यांच्याशीं सलगी करूं लागले. तर त्यांच्याहि अंगावर ते खेंकसले. वास्तविक शिष्टमंडळाचे एक सदस्य म्हणून त्यांना घ्यावे अशी एक सूचना होती. परंतु त्यांचें मत कोणालाच पक्कें न कळल्यामुळें मंडळींनीं त्यांना टाळलें.

इकडे पुरुषांची ही संघटना चालू असतांना स्त्रिया कांहीं स्वस्थ नव्हत्या. त्यांनीं आपलीहि एक संयुक्त आघाडी उघडायचें ठरवलें होतें. परंतु कुणाचें नेतृत्व स्वीकारावें ह्याविषयीं एकमत होईना. तिसऱ्या मजल्यावरच्या सुंदरराव सामंतांच्या सरलाबाई ह्या इंटर आर्ट्सपर्यंत शिकलेल्या असल्यामुळें चाळींतील कमाल विदुषी. परंतु आजवर त्यांचें धोरण एकूण इतर सर्व चाळकरी











भगिनी 'म्यानरलेस्–अन् एज्युकेटेड इ. इ.' असें होतें. सुंदरराव सामंत तर कुणाच्या अध्यांत ना मध्यांत! ('बायकोपुढें नंदीबैलासारखा नुसत्यी माना हलवतो' हें एकूण स्त्रीवर्गाचें त्यांच्याबद्दल मत.) कोणीहि कांहींहि विचारायला आले तरी 'आमची वाइफ म्हणते' ह्या ध्रुवपदाखेरीज त्यांचें वाक्य पुरें होत नव्हतें. तात्पर्य, सरलाबाई सामंतांना स्त्रियांच्या संयुक्त आघाडीचें नेतृत्व द्यायला बटाट्याच्या चाळींतल्या भगिनी तितक्याश्या तयार नव्हत्या. त्यांच्या खालोखाल म्हणजे अंबूताई चवाथे, ऊर्फ नर्सबाई. 'पुरुष मंडळींत धिटाईनं बोलूं शकणारी दुसरी मेली आहे कोण चाळींत?'–एवढी एकमेव त्यांची स्त्रियांच्या पुढारीपणाला लायकी! परंतु त्यांनीं साफ नकार दिला. कारण दोनच दिवसांपूर्वी मंढे पाटलांच्या सुनेच्या बाळंतपणांत त्यांना नर्स म्हणून बोलावणार असल्याची वार्ता रामसहाग भय्यानं त्यांना सांगितली होती.

"हें पहा मला माझी ड्यूटी करतां करतां इतकं टायरड् होऊन जायला होतं कीं फॉर अदर थिंग्स् मला टाइम नाहीं—सॉरी हं जानकीबाई–सॉरी ऑल्सो हं विमलाबाई—" ह्या शब्दांत त्यांनीं बायकांची बोळवण केली!—एकूण बायकांच्या चळवळीला कांहीं पुढारी सांपडेना. याचें एकमेव कारण म्हणजे प्रत्येकीला पुढारी व्हायचें होतें!—

• •

मंढेपाटलाच्या बंगल्यावर जायचा दिवस उजाडला. द्वारकानाथ गुत्यांनीं साश्रु नयनानें आपल्या बायकोचा आणि सर्व मुलांचा निरोप घेतला. सोकरजी त्रिलोकेकर बाबलीबाईंना कांहीं तरी सांगून येतो म्हणून आंतल्या खोलींत गेले. त्यांनी आपल्या मिशन्ची इतकी जाहीरात केली होती की, शिष्टमंडळाच्या निरोप समारंभाला त्यांचे सर्व 'रिलेटिव्स्' आले होते. त्यापैकी हरिश्चंद्र चुनीलाल, गणपतराव विजयकर ऊर्फ काव्यप्रभू ह्यांनीं सो. कृ. जी. त्रिलोकेकर हीं अक्षरें गोवून त्यांना निरोपाची दोन शार्दूलविक्रीडितें अर्पण केलीं—आणि शिष्टमंडळ चाळींतून बाहेर पडतांना 'ॲटमॉस्फियर क्रिएट' करण्यासाठीं एच. मंगेशरावांनीं 'ओ दूर जानेवाले' ही रेकॉर्ड लावली...

मंढेपाटलांच्या बंगल्याच्या दारांत त्यांच्या प्रचंड अल्सेशियन् कुत्र्यानें शिष्टमंडळाचें भरगच्च



*"इत्ते करता रे!"*

स्वागत केलें. प्रथम द्वारकानाथ गुत्याच्या कोटाची चव त्यानें घेऊन पाहिली. त्यानंतर सोकरजींना पुढल्या दोन पायांनीं आलिंगन दिलें आणि बाबा बर्व्यांचा पंचा ओढला. (बाबांचा पंचापासून काचा सुटली. पण कमरेपासून पंचा सुटला नाहीं!!) कांहीं वेळानें एक गुरखावजा भय्या अगर भय्यावजा गुरखा धांवत आला आणि त्यानें नुसत्या–'अबे टायगर'–एवढ्या दोन शब्दांनीं त्या भयानक जनावराला लोळण घ्यायला लावली. भय्याच्या (अगर गुरख्याच्या) थाटावरून हेच मंढेपाटील अशी सोकरजी त्रिलोकेकरांची समजूत झाली आणि त्यांनीं त्याला गुड-मॉर्निंग केलें. मंढेपाटलांच्या 'आश्वासनांच्या सभेंत' सोकाजीराव हजर नव्हते. गुते एक डोळा कुत्र्यावर व दुसरा गुरख्यावर ठेवून होते. शेवटीं बाबांनीं तोंड उघडलें,

"नमस्ते—"

"क्या है!—" गुरखा.

"हम बटाट्याची चाळकी ओरसे शिष्टमंडल के नाते श्रीमान् मंढेपाटीलजी के दर्शनके लिये आये है—" आचार्य.

"हम सोकाजी त्रिलोकेकर और हम गुते और बाबा बर्वे आचार्य होएंगा—" त्रिलोकेकरांनीं हिंदीची चिंधी केली.

"जरा थांबा हं—" आचार्य बाबांनीं त्यांना आवरलें, "हमारी प्रार्थना है की श्रीमान् मंढेपाटील हमे दर्शन देनेका कृपा करेंगे!"

"हम करेंगे या मरेंगे—" गुते उगाच ओरडला.

"गुते साहेब, जरा—" बाबांनीं त्यांना थांबवीत म्हटलें,

"जनताकी मांग हम श्रीमानजीकेप्रति निवेदन करने का स्वप्न—स्वप्न—"

"हमारे ऊर में बाळगते हैं!—" त्रिलोकेकरांनीं दुसरी चिंधी फाडली.

इतक्या संभाषणानंतरहि गुरख्याच्या डोक्यांत कांहीं प्रकाश पडला नाहीं.

"काय आहे राव, नीट सांगा की—" गुरख्याच्या (अगर भय्याच्या) तोंडून अस्खलित मराठी ऐकून पाद्यानें अथर्वशीर्ष म्हटल्याचा धक्का तिघांनाहि बसला.

"माफ करा हं मला वाटलं आपण गुरखे आहां—"

"किंवा भय्ये!"

"भले! ह्यो आमच्या मालकाचा चावटपना आहे! समद्यानला ड्रेस घालायची सक्ति हाय! अव सोवळेकऱ्याला बी पांढरी इजार पाटलोण घातलीया त्यांनीं—मालकांना भेटायचंय व्हय्?"

"होय. आहेत ना?—"







"जानू ऽऽ—" आंतून कणखर हांक आली.

"मालक बलावल्यात. आलो. दमा तुम्ही हतंच. चूप बे टायगर. कुत्रंबी असं ठेवल्य, दिवसांतून धा लोकांच्या धोतरांच्या चिंध्या करतय्—"

"जानू ऽऽ – यू फूल –" अशी गर्जना करीत एक सहाफूट उंच आणि जवळजवळ तितकीच रुंद व्यक्ति मुख्य दारांतून बाहेर आली आणि तिघांना उद्देशून त्यांनीं एकदम "व्हाट डु यू वांट?" असा विलायती सवाल टाकला. इंग्रजी ऐकल्यावर सोकरजींना जोर आला. कारण बटाट्याच्या चाळींत ज्यांना इंग्रजी शब्द आठवल्यावेळीं दगा देत नसत असे दोनच. एक सोकरजीराव आणि दुसरे एक मंगेशराव!! (साला भर्डाचा स्टूडंट आहे–साला! सोकाजी)

"गुडमॉर्निंग टु यू सर —"

"यस गुडमॉर्निंग —"

"वींईंग गिवन् टु अंडरस्टँड दॅट यू आर द ओनर ऑफ द चॉल ऑफ बटाट्याज्, वुइ हॅव द ऑनर टु सब्मिट टु यु सर, दॅट वुई हॅव कम् टु धिस् रेसिडेन्शियल् बंगलो ऑफ युवर्स —"

"थँकिंज यू इन् ऑंटिसिपेशन् सर् —" गुप्त्यांनीं पुस्ती जोडली.

ह्या परंतु आठ इंग्रजीसारख्या दिसणाऱ्या वाक्यांनीं मेंढे पाटील जेरीला आल्यासारखा दिसला.

"या —" त्यांनेंहि अस्खलित मराठींत सुरवात केली.

"कोन आपण ? व्हाट बिजनेस ?—"

"आम्ही आपले भाडेकरू — हे आचार्य बाबा बर्वे–"

"मी सोकरजी त्रिलोकेकर लेजर कीपर—"

"मी द्वारकानाथ गुप्ते—"

"आय् ॲम् द मेंढेपाटील! शिट् डाउन्! काय काम आहे?"

"आपल्याला सध्यां बटाट्याच्या चाळींत जी अस्वस्थता निर्माण झाली आहे ती कळली असेलच!" आचार्य.

"हे पहा. अस्वच्छता काय मालक करत नाहीं. तुम्हीच करता—" मेंढेपाटील कडाडले.

"तसं नाहीं. स्वच्छतेबद्दल नाहीं. परंतु चाळींत सध्यां जें एक वातावरण आहे—"

"कसलं वरण !-–"

"वातावरण—"

"मग ॲटमास्फेर म्हना कीं—" मेंढेपाटील.

"तेंच! त्यामुळें मनःशांति ढळली आहे. गच्चीच्या प्रश्नाबद्दल बोलायचा आमचा हेतु आहे—"

"गच्चीचा कसला प्रश्न? आन् काय हो, गची काय तुमच्या बापाची— ?"

"आपण क्रोध आवरा! गची मिळाली नाहीं तरी हरकत नाहीं. पण आपलें प्रेम आम्हांला हवं—" आचार्य.

"आनी आपलं भाडं आम्हांल हवं टायमावर. मग प्रेम भेटेल लागल तेवढं. जंटल्मन् लोक तुम्ही आनी दोन दोन वर्साचीं भाडीं थकवतां—"

"दॅट् इज् अे डिफरंट मॅटर—" गुप्ते एवढं वाक्य म्हणण्याच्या आंत मेंढे पाटील एकदम ओरडले—



*"आय ॲम धी मेंढे पाटील!"*

"मॅटर गेलं खड्ड्यांत. भाडीं भरा वेळेवर. नाहीं तर समद्यांना नोटीस देऊन हाकलून देतो—"

"आपण पुन्हा रागावलांत. तूर्त आपण गचीचा प्रश्न विचारांत घेऊं—" आचार्य.

"गचीचा कसला प्रश्न? मी म्हटलं गच्ची उघडीच पडली आहे. जावा नाचा तिथं जाऊन तर भांडनं काढलीत! मानसं हायेका कोन्?— आमच्या कुत्र्याला अक्कल हाय ती तुम्हांला नाहीं राव!!" टायगरला गोंजारीत मेंढेपाटील म्हणाले.

"हें आपण बरोबर सांगितलंत. आमच्या चाळींत अजिबात एकी नाहीं. एकाचें तोंड इकडे तर दुसऱ्याचं तिकडे. परंतु गच्चीच्या बाबतींत—"

"हें पहा गच्चीबिच्ची जाऊं द्या खड्ड्यांत"

"आपण ह्या प्रश्नाचा विचार करूं–"

"मला असल्या फाल्तू गोष्टीला टाईम नाहीं. अहो आमचा धंदा करायला टाइम नाहीं तर तुमच्या फाल्तू लफड्यांत कोण पडेल? चांगली एज्युकेशनल मानसं तुम्ही. व्हाट इज धिस्— आनी बजाबून ठेवतों गच्ची बिच्ची नो!!"

"पण आम्ही चाळकरी बंधूंची समजूत कशी काढायची?"

"कशा बद्धल?"

"गच्चीबद्दल!" त्रिलोकेकरांनीं तोंड उघडलें.

"पुन्हा गच्ची! त्यांना म्हनावं गच्चींत कोणी पाय ठेवला तर तंगडं मोडीन. हाँ!!—"

"पण आपण चाळ ताब्यांत घेतली त्यावेळीं बरीच आश्वासनं दिलीं होतीं. आपण फुकट शाळा काढणार होता. आपले दोष काढतोय असं नव्हे–केवळ स्मरण देतों–मुलांची शाळा क्रीडांगण—"

"मुलींना स्थळं—" गुप्ते मर्मबंधांतली गोष्ट बोलले.

"आतां काय सांगायचं? अहो राव, चाळ ताब्यांत घेतली तवा प्रत्येकाचं भाडं तुंबलं होतं. म्हटलं लावा मदाचं बोट. पन् तुमी राव कसले फोडगे! भाडं नाहींच वर गच्ची हवी हवा खायला."

"पण..." गुप्ते बोलण्याचा प्रयत्न करूं लागले.

"हे पहा पगवाले—तुम्मी तरी भाडं भरलय काय सगळं?"

"फक्त तीन महिन्यांचं राहिल्यं. अहो बाईफची डिलिवरी झाली—"

"त्याच्याशीं मला काय करायचं आहे? आय वॉंट मनी—इन् क्याश्!! यस—"

"तें आपल्याला देण्याची मी हमी देतों. आपलं म्हणणं बरोबर आहे—" बाबा बर्वे म्हणाले, "आम्ही कष्ट सोसूं. देहदंड भोगूं. जिन्यांतल्या अंधारांत ठेचाळूं. चौकांतल्या घाणींत बरबटूं. परंतु आधीं आपली पैन् पै चुकती करूं. परंतु गच्चीचं लक्षांत ठेवा—"

"सगळं ठेवतों. भाड्याचं बघा—"

"तें माझ्याकडे लागलं—" आचार्यांनीं आश्वासन दिलं आणि शिष्टमंडळ परतलें. पुन्हां एकदां टायगरनें प्रत्येकाच्या काफ्याचा नमुना चाखून पाहिला.

चाळकरी मंडळी आतुरतेनें ह्या प्रतिनिधींची वाट पाहात होती.

चाळभैरवाचें तासातासाला बुलेटिन् काढण्यांत म्हाळसाकांत पोंबुर्पेकर गर्क होता. नुसतें मथळे बदलून तोच मजकूर छापण्याचें काम चालू होतें—

"गच्चीच्या मागणीसाठीं प्रतिनिधि मंडळ"

दिनांक बारा दहा वाजतां:— आज रोजीं सकाळीं येथून निघालेलें







अनुक्रमणिका

प्रतिनिधि मंडळ श्री. मेंडेपाटलांच्या बंगल्यावर पोहोंचल्याची बातमी आमच्या कानीं आली आहे

लगेच दोन तासांनीं दुसरें बुलेटिन् निघालें–

"प्रतिनिधिमंडळाची मेंडेपाटलांशी चर्चा" दिनांक बारा; बारा वाजतां—आमच्या प्रतिनिधींची आणि मेंडेपाटलांची प्रदीर्घ चर्चा झाल्याचें वृत्त आतांच आलें आहे. गच्चीचा प्रश्न हा चाळीच्या जीवनमरणाचा प्रश्न आहे—"

दिनांक बारा; एक वाजतां—

"वाटाघाटी फिसकटल्या ?"

"गच्चीच्या प्रश्नाबाबत चाळींतील कांहीं मंडळींशीं आमच्या प्रतिनिधीनें आज चर्चा केली. तिसऱ्या मजल्यावरील मंडळींचा गच्ची दुसऱ्या व पहिल्या मजल्यावरील लोकांना देण्यास विरोध दिसला. याबाबत तिसऱ्या मजल्यावरील डाव्या बाजूचे पुढारी श्रीयुत बारटक्के म्हणाले कीं, हा प्रश्न वाटाघाटींनीं सुटणार नाहीं. श्री. मेंडेपाटलांच्या बंगल्यापुढें सत्याग्रह आणि भाडेबंदीची चळवळ हा एकच मार्ग आहे—"

"भाडेबंदीच्या चळवळीस वाढता पाठिंबा—"

शिष्टमंडळ अद्याप परतलें नाहीं. त्यामुळें चाळकरी मंडळी हवालदिल झाली आहे. कांहींच्या मतें आचार्य बाबा बर्वे चेंबूरहून पदयात्रा करीत निघाले असावेत. त्यांनी 'गच्चीदान' चळवळीची घोषणा केल्याचें दुसऱ्या मजल्यावरील उजव्या टोकाचे नाना कुडाळकर यांचे शीलण्यावरून कळलें. परंतु डाव्यांचा विरोध वाढतो आहे. भाडेबंदीच्या चळवळीस मुद्दाम पाठिंबा कसा द्यावा ह्या प्रश्नाचा विचार खोलीं खोलींतून चालला आहे. बहुतेकांनीं भाडेबंदी पूर्वीपासूनच अम्मलांत आणली असल्यामुळें ह्या परिस्थितीला चळवळीचें स्वरूप कसें द्यावे हें अजून नीटसें लक्षांत येत नाहीं."

शिष्टमंडळ परतलें त्यावेळीं मंडळींनीं अत्यंत प्रेमानें त्यांचा सत्कार केला. मालकाची 'भूमिका' समजावून देणारीं भाषणें सुरू झालीं. चाळकरी बंधुभगिनींचा उत्साह परकोटीला गेला होता. चाळींतील नारायणभाऊ कुशाभाऊ अक्षीकर, गुते, त्रिलोकेकर आणि बाबा बर्व्यांच्या जयजयकाराचे 'नारे' देत होते.

"द्वारकानाथ गुते झिंदाबाद"

"सोकरजी नानांचा विजय असो"

"आचार्य बाबा बर्वे की जय—"

पाळण्यांतल्या पोरापासून तें जख्ख म्हाताऱ्यांपर्यंत सर्वजण जयजयकार करीत होते. ज्यांच्या ज्यांच्या घरीं रेडियो होते; त्यांनीं ते मोठ्यानें लावले होते. काशीनाथ नाडकर्ण्यांचा मुलगा गळ्यांत पेटी बांधून चाळभर वाजवत हिंडत होता आणि त्याच्या मागून रखळनाथ कामताचा झिलगा नुसताच डग्गा वडवत होता. तळमजल्यावरून चापशी, आत्मू, जगन्नाथ ब्रँदर आणि कंपनीचें धोबे दगागल्याच्या बातम्या सारख्या

येत होत्या. शेवटीं सभेला सुरवात झाली; आणि 'थांबा—थांबा' असा ध्वनि ऐकूं आला.

डॉक्टर हातवळणे आपल्याबरोबर तळमजल्यावरील एक दोन भाडेकरू घेऊन वर आला होता.

"चापशी चोर आहे" हातवळणे डॉक्टर ओरडला.

सभेला आश्चर्य वाटलें.

• "मित्रहो—" सभेच्या मागल्या बाजूनें हातवळणे डॉक्टरांनीं आपलें भाषण सुरू केलें, "चाळकऱ्यांच्या गच्चीसकट बटाट्याची चाळ चळवळीला माझा पूर्ण पाठिंबा आहे–"

"हातवळणे डाक्टरकी–" नाट्यभैरव कुशाभाऊंनी 'नारा' दिला. [illegible] मंडळीं 'जय' म्हणून ओरडली [illegible] झिंदाबाद. त्यामुळें जयजयकाराचा दणका उडाला नाहीं.

"मित्रहो, आपण ही चळवळ नेटानें सुरू ठेवली पाहिजे. चापशीचा मी एके काळचा मित्र. अजूनहि मी त्याचा मित्र आहे. परंतु वैयक्तिक नात्याचा हा संबंध नाहीं. सार्वजनिक सवाल आहे. तसं पाहिलं तर आपले पुढारी सोकरजी त्रिलोकेकर ह्यांनीं कित्येक वेळां माझ्या दवाखान्यांत येऊन द्वारकानाथ गुप्त्यांविरुद्ध मला अनेक गोष्टी सांगितल्या आहेत—"

"साला ब्लफिंग करतो काय डॉक्टर?—" सोकरजी भडकले.

"प्रूफ करून देईन! पण माझं ऐका—(ऐका ऐकाच्या आरोळ्यांत कोणीच कुणाचें ऐकत नाहीं अशी सभेची अवस्था!)–माझं म्हणणं ऐका. चळवळीचें नेतृत्व स्वीकारायला मी तयार आहें. (नको नको! स्वीकारा-स्वीकाराच्या परस्परविरोधी आरोळ्या. आणि ह्या कोलाहलांतून ऐकू आलेलीं कांहीं वाक्यें:—

"डॉक्टर हातवळण्यांनाच लीडर बनवा. ह्या सोक्याला आणि द्वारक्याला काय कळतं—" प्रा. नागूताल्या आढ्ये शांबारावच्या कानांत.

"हातवळणे हेर असेल चापशीचा. पानपतच्या युद्धांत जेव्हां…" इतिहाससंशोधक बाबूकाका खरे.

"पण हातवळणे चाळीचा भाडेकरू कसा? ह्याचा दवाखाना आहे. म्हणजे वस्तीला तो इथें नसतो–" जोगदंडांचा 'लॉपाइंट!'

"ए सरोज चल ना" मधू चौबळ सरोज गुप्तेला उद्देशून.

"अरे त्या कंपौंडरला डॉक्टर रे कशाला म्हणतात?" जनोबा रेग्यांची मूलभूत शंका!!

"ए सरोज चल ना—" मधू चौबळ सरोज गुप्तेला उद्देशून.

"साली चाळींत युनिटी नाय्—" सोकरजी.

"आई ग मोठी माणसं देखील शाळेंतल्या सारखं ओरडतात का ग?" राघूनानांची कन्या आपल्या आईस.

"हाकला रे कुणी तरी त्या हातवळण्याला" भाईसाहेब चौबळ.

"मंगेशराव तुम्हीं गायला सुरवात करा. सभा बरखास्त तरी होईल—" शांबाराव गायतोंडे.

"ह्या देशांत शिस्त केव्हां येणार? ओन्ली गॉड नोज्" देवस्थकर मास्तर.

"ए सरोज् चल ना—" मधू चौबळ सरोज गुप्तेला उद्देशून.

"काय ग मेल्यांनी मासळी बाजार मांडला य्" भीमाबाई जोगदंड.

"अय्या, तुम्ही कधीं मासळीबाजारांत गेलेलांत?" काशीनाथ नाडकर्ण्यांची बायको-



अनुक्रमणिका

—केवळ ओरडून थकल्यामुळें सभा कांहीं वेळानें आपोआप शांत झाली. त्याणि द्वारकानाथ गुत्ते प्रतिनिधिमंडळानें काय केलें तें सांगायला उठले. तत्पूर्वी आचार्य बाबा बर्व्यांनीं डॉ. हातवळण्यांना आपण आपल्यांत घेतलें पाहिजे असा ठराव मांडला व तो पास झाला.

"मित्र हो—" द्वारकानाथ गुत्ते म्हणाले— "आम्ही मेंढे पाटलांना स्पष्ट शब्दांत सांगून आलों कीं, गच्चीवर सर्व भाडेकरूंचा हक्क आहे! आम्ही गच्ची वापरणार. चाळींतील जनतेच्या आवाजानें मेंढे पाटील घाबरले आहेत. आम्ही गच्ची तुला देणार नाहीं असें बजावून आलों आहों. आम्ही त्याच्या दारावरच्या कुत्र्याला



'गाच्चिक समस्येचा शेवट'

दाद दिली नाहीं. गुरख्याच्या सोट्याला घाबरलों नाहीं. मेंढेपाटलाचा बेत ठीक नव्हता. कोपऱ्यांत बंदूक होती तीहि आम्ही पाहिली—पण भ्यालों नाहीं."

द्वारकानाथ गुत्ते सुमारे पाऊण तास बोलला. त्यानंतर सोकरजींनीं भाषण केलें;

"फ्रेंड्स्, मेंढेपाटील चोर आहे. सालं तंगड्या तोडीत आम्ही चेंबूरपर्यंत गेलों तर साला कपभर चा नाय दिल्ला. साला बापकमाईवर मोठे झाले तर मॅनर नाय्. घरीं पण न्हातो काय? इडियट्! आमच्यावर कुत्रा सोडला. माझ्या पायाला कुत्रा चावला, ("कुत्रो मेलों असतलो" जनोबा रेगे—काशीनाथ नाडकर्ण्यांच्या कानांत.) पण आय सेड् गो टु डॉग्ज्! आम्ही गेलों आणि मेंढेपाटीलला वॉर्न केला की टॅरेस् नाय् दिल्ली तर रीजल्ट चांगला नाय होणार. साला एवढा पैसा हाय तर दोन लाइन्स् इंग्लिश् नाय येत बोलायला."

इतक्यांत बाहेर जिन्यांत आरडाओरड ऐकूं आली म्हणून सभेनें मागें वळून पाहिलें. तर एका हातांत मधू चौबळची मानगूट आणि दुसऱ्या हातानें सरोज गुत्तेचें मनगट धरून कुशाभाऊ अक्षीकर आपल्या कमावलेल्या आवाजींत ओरडले,

"थांबा—हा पहा काय प्रकार!!—"

सभेच्या कामाला निराळीच कलाटणी मिळाली.

"मित्र हो, चाळीवर काय प्रसंग आला आहे आणि चाळीची तरुण पिढी काय करते आहे पहा. मघाशीं आपली सभा ऐन रंगांत असतांना ही कारटी आणि हा कारटा हळूच सटकतांना मी पाहिलं. हळूच त्यांच्यामागून गेलों. दोघांनींहि सर्व वडील मंडळी सभेंत गुंतलेली पाहून वर गच्चींत पोबारा केला होता. मी जिन्यांत लपून बसलों. आणि ही सरोज गुत्ते आणि हा मधु चौबळ—मित्र हो, नाहीं. माझ्याच्यानं नाहीं पुढें बोलवत—"

नाट्यभैरव कुशाभाऊंच्या जिभेवर 'नाहीं बोलवत' ह्या वाक्यानंतर पंधरा एक मिनिटें मराठींतील सगळे नाटककार नाचले. सभेंत हलकल्लोळ उडाला. द्वारकानाथ गुत्त्यानें भाईसाहेब चौबळाच्या मुलाच्या कानफटींत मारली आणि मनगट लचकल्यामुळें विव्हळून ओरडूं लागला. भाईसाहेब चौबळांनीं आपल्या बायकोला सांगून द्वारकानाथ गुत्त्याच्या कार्टीच्या झिंज्या ओढवल्या व आपण तिच्या बापाच्या समाचाराला गेला.

"काय समजलेंत. अहो गच्चीचा जर हा उपयोग तर गच्ची हवी कशाला?" जनोबा रेगे ह्या खेपेला कोणाच्याहि कानांत न कुजबुजतां मोठ्यानें ओरडले.

गडबडींत संधि साधून काशीनाथ नाडकर्ण्यांच्या मुलानें चौबळांच्या मधूच्या पाठींत गुद्दा मारून घेतला. सरोजनें वास्तविक त्याला तीन पत्रें लिहिलीं होतीं!



उलट्या उड्या मारणारे वस्ताद!
(डॉ.) कांपौंडर हातवळणे

एकूण गच्चीच्या प्रश्नानें निराळेंच वळण घेतलें. सभा मोडली. प्रा. नागूताल्या आढ्ये आपण हें केव्हांच ओळखलें होतें हें सांगूं लागले. सारी चाळ अस्वस्थ झाली. त्याचवेळीं चापशीचे नोकर धान्य वाळत घालण्यासाठीं सुपें भरभरून गच्चीवर नेत होते आणि रामसहाय भय्यानें जिन्याला नवें भक्कम कुलूप ठोकून किल्ल्या चापशीच्या स्वाधीन केल्या होत्या.

आचार्य बाबा बर्व्यांनीं गच्चीसकट बटाट्याची चाळ नको अशी चळवळ जाहीर केली आणि चाळींतली मंडळी मेंढेपाटलाला वेळेवर भाडें पोंचवत नाहीं म्हणून लवकरच आपण उपवास करणार आहोंत असा फतवा काढला. म्हाळसाकांत पोंबुर्पेकराच्या अंकांची रद्दी चापशीनें दुप्पट भावानें घेतल्यामुळें चाळ-चळवळीचा मजकूर न देतां त्यानें 'सरोजमधूचें गुप्त कारस्थान' ही लेखमाला सुरू केली.

ह्या गोंधळांत दोन महिने गेले. पावसाळा सुरू झाला. चापशीला धान्य वाळवायला चाळीच्या गच्चीचा पावसांत उपयोग नाहीं म्हणून चाळ खूष आणि फुकटांत गच्चीचें भाडें लागूं झालें म्हणून मेंढेपाटील खूष झाले.

धो धो पाऊस सुरू झाला आणि गच्चीचा प्रश्न गच्चीसकट भिजत पडला!!

● ● ●




श्री. म. माटे

येश्या, इट्या, कवतिक अन् म्हाद्या हे चौघे एका 'शिनचे.' ते बरोबरच वाढले; एकाच मातींत त्यांनीं मस्ती केली; अन् थोडेसे गांवाच्या बाहेर राहत असले, तरी गांवांतल्या इतर लोकांबरोबर ते एकाच पांढरींत वाढले. वडील माणसें घरांत होतीं, तोंपर्यंत त्यांची रंगेली वाढतच चालली होती. वाढत्या वयाबरोबर त्यांचे डोळेही लाल होत चालले होते; आणि जातींतले बापई गडी कुठें जातात, रात्रीं केव्हां परत येतात, आणि त्यांच्या दर येण्याबरोबर घरांत कोणच्या गोष्टी जमत चालल्या आहेत. हेंही ते पाहत होते दिवसें दिवस त्यांचे दंडही फुरफुरूं लागले; आणि वयस्कर झालेल्या बापाला अन् चुलत्याला ते गुर्मीनें बोलूं लागले. गांवकऱ्यांच्याही हें ध्यानांत येऊन चुकलें कीं, हीं पोरं टगीं होत चाल्लीं आहेत; अन् वडिलार्जित कसब त्यांच्याही अंगांत लवकरच येईल. जातीचा दहा-वीस उंबरा होता; अन् समोरच्या मोकळ्या जागेंत चराटं वळण्याचा उद्योग बायका अन् म्हातारीं माणसें सकाळ-संध्याकाळ करीत असत. गांवढ्या सडकेनें जाणा-येणारीं माणसें यांच्याकडे उपेक्षेनें पाहत; आणि हे लोक मात्र त्यांच्याकडे रोखून पाहत राहात. येश्यानं अन् कवतिकानं म्हसोबाच्या जत्रेंत दोन कुस्त्या मारल्या होत्या; अन् तेव्हां मिळालेलीं लाल पागोटीं तिढ्यानं कानशिला-पर्यंत बांधून जरीचा म्हणजे कलाबतूचा तोटका पदर ते मानेवर सोडीत. होतां होतां हीं पोरं चांगलींच निबर झालीं. हीं आतां पोटाला मिळ-विल्याशिवाय राहायचीं नाहींत, हें भोंवतालच्या खेड्यांतील त्याच जातीच्या लोकांना दिसूं लागलें; आणि मग यांच्या लग्नाच्या गोष्टी सुरूं झाल्या. लग्नं व्हायचीं तीं वडील माणसांच्या बोलण्या—चालण्याशिवाय व्हायचीं नाहींत, हें या जवानांना माहीत असल्यामुळें ते कांहीं दिवस तरी बापा—काकाशीं मऊसूत वागूं लागले; कारण त्यांचा जीव लग्नासाठीं आसुसला होता. पांच—सहा कोसांवरच्या दोन-तीन वाड्यांतील चॅप्टरचे खटले झालेल्या पण आतां नरमाईनें वागत असलेल्या बहिऱ्या आणि शिऱ्या यांच्या मुली दोन्ही बाजूच्या माणसांनीं ठरवून टाकल्या. देण्या-घेण्याचा मामलाही फारसा चिघळला नाहीं; अन् मग हे चौघे दांड गडी घरांतून बाहेर पडून निराळे राहूं लागले.

त्यांच्या दांडपणाचें कौतुक कोणी झाला तरी करीतच असे; पण या दांडपणाचा उपयोग हे लोक कसा करतात, हें मात्र सर्वांना माहीत होतें!

---

*डोळ्यांतलं पाणी आटलं होतं. पण तीं घरं आणि त्या कारभारणी पुनः दिसल्या! आणि—*

---

येस्या, इस्या, क्वतिक अन् म्हाद्या आतां आपल्या जातीचे पुढारी बनले; अन् जातींतील म्हातारींकोतारीं माणसें त्यांना भिऊन त्यांच्या वाटेंतून बाजूला सरूं लागलीं. मधून मधून हा नाहीं तर तो, तो नाहीं तर हा, किंवा एखाद्या वेळीं चौघेही जण वस्तींत दिसेनासे होत. कुणी विचारलं तर बायका म्हणत, "त्ये गांवाला गेल्येती." "कुटल्या गांवाला?" असें कोणी विचारलें तर, "या बया! आतां त्ये आमाला कां सांगुन जात्याती!" अर्थातच विचारणारांना या बायकांकडून कसलीही माहिती मिळत नसे. केव्हां तरी रात्रीं अपरात्रीं ते परत येत; अन् मग आपण हितंच आसपास कुठं तरी गेलों होतों, असा बहाणा ते करीत. बायका तरण्याताठ्या; त्यांच्या अंगावरचीं धडुतीं केव्हां केव्हां चांगलीं झुळझुळीत दिसत; अन् त्या चांदीच्या येळाही घालीत. बाहेरून गरिबी, पण आंतून श्रीमंती असा डाव असल्यामुळें बायका चांगल्या सरळत चालल्या; आणि वस्तींतल्या इतर तरण्या पोरांची दृष्टि त्यांच्याकडे जाऊं लागली.

• •

गांवचा पाटील शंभुसिंग मोठा रुबाबदार माणूस होता. त्याच्या गुलमिशा कांहींशा करड्या झालेल्या होत्या; अन् त्याच्या डोईवरचें पागोटें जरा जुन्या सरदारी थाटाचें असे. शंभुसिंगाकडे पाहिलें म्हणजे याचे वाडवडील खरोखरच कोणी सरदार असले पाहिजेत, असं कोणालाही वाटलं असतं. शंभुसिंगाचा वाडा, मागून अन् पुढून पडत चाललेला होता; पण मधला गाभा अजून चांगला उभा असून पडक्या इमलाच्या मातीच्या ढिगाऱ्यावरूनच सडकेवर येण्याची वाट शंभुसिंगाच्या मंडळींनीं पाडलेली होती. घराण्याचा मानमरातब मोठा, म्हणून घरच्या बायका



पाण्याउदकाला सुद्धां कधीं ओढ्यावर जात नसत. नोकरदार पुरुष, नाहीं तर शंभुसिंगाचे धाकटे दोघे भाऊ, एकाच दोरीच्या बिटाळ्यानं एकमेकीला बांधलेल्या दोन घागरी दोन खांद्यांवर घेऊन रोज पाणी भरीत. भावांना पाणी आणावं लागतं, याचं शंभुसिंगांना वाईट वाटे. पण घराणं खालावलेलं, आणि बायकामाणसांना असल्या कामाला बाहेर धाडणं, हें घराण्याच्या रुबाबाला शोभण्यासारखं नव्हतं. पण असं असलं तरी अजूनही शंभुसिंगाची पत गांवांत मोठी होती. कधींमधीं येणारा मामलेदारसुद्धां शंभुसिंगाशीं फार सौजन्यानें वागे. कारण त्याला ऐतिहासिक आठवणी असत; आणि मावळत चाललेल्या वैभवालासुद्धां मान द्यावा, असें त्याला मनापासून वाटे. शंभूसिंगाकडे पाहुण्यांची ये-जा मोठी; पण जें काय असेल तेवढ्यावर तो पाव्हण्या माणसांना चांगल्या आदबीनं वागवी.

एकदां असें झालें कीं, शंभुसिंगाकडे तालुक्याच्या गांवचे भवानराव पाटील आले. शंभुसिंगानें पुढल्या माळींत भवानरावांची चांगली बडदास्त ठेवली. भवानरावांबरोबर त्यांचा नोकरही होता. तो भवानरावांचें सारें करी. दोन-चार दिवसांच्या मुक्कामांत भवानरावांचें पुष्कळ बाहेर जाणें-येणें होई; अन् उन्हाच्या तिरपीनें त्यांच्या अंगांतली पैरण घामेजून जाई. अशा चार पैरणी नोकरानं ओढ्यावर धुवायला नेल्या; आणि धुऊन आणल्यावर वाड्याच्या चांदईच्या बाजूला झाडाझुडुपासाठीं आणि वेलासाठीं एक लांबट मांडव केलेला होता, त्याच्यावर त्यानें त्या वाळत टाकल्या. संध्याकाळच्या सुमाराला भवानराव आपल्या गांवाकडे परतायचे होते; आणि म्हणून बांधाबांध सुरूं झाली. "अरे हो हो! गणू, अरे आपल्या पैरणी कुठें आहेत?" असें भवानराव गरजतांच विसरभोळा गणू चांदईच्या बाजूला धांवला. पण पाहतो तों मांडवावर पैरणी नाहींत! "कां कुनी काढल्या जनु?" असें स्वतःशीं पुटपुटत तो इकडे तिकडे पाहूं लागला. इतक्यांत "बेगी बेगी आन" अशी भवानरावांची गर्जना त्याच्या कानीं पडली. पैरणी जर नव्हत्याच तर गणू आणणार कुठल्या? मागोमाग शंभुसिंगाचा धाकटा भाऊ तिकडे गेला. त्याला गणू म्हणतो, "अव हतं घातल्या होत्या हाडकाया. आन त्या गेल्या तरी कुटं?" भाऊ म्हणाला, "त्वां हतंच घातल्या होत्यास ना? मंग गेल्या कुटं?" असें होत आहे, तों स्वतः शंभुसिंगच आले. यांच्या चेहऱ्याकडे पहिल्यावर त्यांनीं ओळखलं कीं, कांहीं तरी बिघडलं आहे. शेवटीं पैरणी गेल्याचं वर्तमान अडखळत भवानरावांच्या कानीं गेलं. गणू खालीं मान घालून अन् तोंड विदुळलेलं करून म्हणाला, "पैरनी न्हाइती." "न्हाइती म्हंजे?" भवानराव गुरगुरले. पण आतां गांवाला निघायची वेळ झाली होती आणि मांडवावरच्या पैरणी कोणी तरी लांबविल्या, हें सर्वांनाच कळून चुकलं होतं. शंभुसिंग अगदीं खिन्न झाले. आलेल्या पाहुण्याच्या पैरणी आपल्या घरनं जाव्यात, याचा त्यांना फार अपमान वाटला; पण भवानरावही खानदानीचेच होते. अवघड प्रसंग ओळखून ते शंभुसिंगांना म्हणाले, "जाऊं द्या हो! गेल्यान्तर गेल्या. पैरणी म्हणजे कांहीं मोठी दौलत नव्हे." असा विषय संपवून त्यांनीं सारी तयारी केली; आणि ते घोड्यावर स्वार झाले. तरी शेवटीं शंभुसिंग त्यांना म्हणालेच, "पैरणीची गोष्ट मात्र माझ्या जिवाला लागून राहिलीय्" "शंभुसिंग, तुम्हीं असं जिवाला लावून घेऊं नका. आपण छप्पन पैरणी करूं" इतकं बोलून भवानरावांनीं घोड्याला टांच दिली; आणि गणू त्यांचा एक बोजा खांद्यावर घेऊन लगालगा मागून निघाला.

भवानराव आपल्या गांवाला निघून गेले; आणि जातांना पैरणीची

मोठीशी मातब्बरी नाहीं, असेंही ते म्हणाले, हें खरें. पण शंभुसिंगांना मोठी चुटपुट लागून राहिली. आपल्या घरीं भवानरावसारखा उमदा तालेवार पाहुणा यावा, अन् त्याच्या पैरणी आपल्या घरांतून नाहींशा व्हाव्यात, या विचारानें शंभुसिंग अगदीं खजिल होऊन गेले. भवानराव-सारखा पाहुणा आल्यानें आपली किंमत वाढते; आणि भोंवतालच्या माणसांना आपण जास्त प्रतिष्ठित वाटूं लागतो, हें तर त्यांना दिसतच होतें. अशा पाहुण्याचें मन आपल्याविषयीं थोडें तरी कलुषित होणार; आणि गांवांत आपला असावा तितका वचक नाहीं असें त्यांना वाटूं लागणार, ही रुखरुख शंभुसिंगांना चैन पडूं देईना. ते ह्याला विचारीत, त्याला विचारीत; कुणाचं काम असेल, म्हणून मनानं शोधून पहात; पण त्यांचा आजमास कांहीं होईना. त्यांना एक वार वाटे कीं, गांवाबाहेरचीं तीं टगीं पोरें तर आसपास फिरकलीं नव्हतीं ना? पण उगीच कुणाचा संशय घ्यावा, असेंही त्यांना वाटेना. अशा दुग्ध्याच्या मनःस्थितींत असतांना त्यांचा धाकटा भाऊ एकदां म्हणाला, "भवानराव इथें आले असतांना हे लाल डोळ्याचे टगे गांवांतच होते. त्यांचंच हें काम कदाचित् असेल." शंभुसिंगांचा संशय बळावत चालला. पण कुणाचा तरी वहीम एकाएकीं घ्यावा, हें त्यांच्या संभावित आणि सात्त्विक मनाला पटण्यासारखें नव्हतें; पण भावानें आग्रह धरला. आणि मग एकदम पोलिसांत जायच्या आधीं आपण ह्या माणसांच्याशींच बोलून बघावं, असं त्यांनीं ठरवलं.

दोन माणसं पाठवून येद्या, इट्या, कवतिक अन् म्हाद्या या चौघांना त्यांनीं आपल्या घरीं बोलावून घेतलं. इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्या. काय करतां, कुठं जातां, अशी विचारपूस त्यांनीं केली; आणि मग त्यांनीं पैरणींचा विषय काढला. म्हाद्या म्हणाला, "वय पाटील, परवा कुन्नु म्हनत व्हतं, कीं तुमच्या पावन्याच्या पैरनी गेल्या; आमाला लई कसनुसं वाटलं." "अवो पाटील, आपल्या गांवाला येवडा पावना यावा, अन् त्येच्या पैरनी गमवाव्या, म्हंजे आतां काय म्हनावं?" कवतिक म्हणाला. इट्या म्हणाला, "अरं, आपल्या गांवाची अब्रूच गेली कीं!" शंभुसिंग उद्गारले, "आपल्या गांवाची गेली का नाहीं कोणाला ठाऊक? पण माझी मात्र गेली." "तें बी खरं; दादा, तेंबी खरं."

असं बोलणं बराच वेळ झाल्यावर शंभुसिंग त्यांना थोडें चांचरत म्हणाले, "हे बघा, तुम्ही रागावूं नका; पण तुमचा कांहीं यांत संबंध नाहीं ना?" "आतां का करावं? बाबा, असं कंदी झाल्या कां? आमी तुमच्या पांढरीला राहनारं; तुमच्या पायाच्या पुन्याईनं जगनारं; अन् आमीच असलं खोटं काम करूं? अन् असल्या पैरनी आमचा घे काय कायमचा झाकनार? असलं वंगाळ काम आपल्या बानंबी कधीं केल नाहीं; अन् आपुन बी कधीं करनार नाय. कायँ रे इस्या?" इस्या म्हणाला, "सायेब, सायेब ह्यो बोलतोयां त्ये अक्शी परमान बघा."

शंभुसिंगांनीं त्यांचं बोलणं ऐकून घेतलं; पण त्यांचं समाधान होईना. तेव्हां ते त्यांना म्हणाले, "तुम्ही शपथ वाहता कां?"

"शिपथ? शिपथ कशापयीं?" कवतिक म्हणाला.

"अन् शिपथ कुनाची?" इट्यानें विचारलें.

"शपथ धाकलवारची." शंभुसिंगांनीं उत्तर केलें.

"अवो पाटीलदादा, यो कुठला धाकलवार तुमीं काडलाया? आमी कां आकरमासं समजतां? आमीं चांगलं अस्सल हाओ; अन् कुनीबी अस्सल मानूस धाकलवारची आन घेयाचा नाहीं."

"बरं, धाकलवार राहिला. खंडोबाची आग घेतां कां? बिरोबाची घेतां कां?" शंभुसिंगांनीं विचारलें.

"आतां लई कार झाला बाबा." कवतिक हसून पुढें म्हणाला, "या आना अन् शिपता कशापायी घेयाच्या? आमी कां कधीं चोऱ्या केल्याती कां दरडं घातल्याती?"

यावर येद्या आर्जवाच्या आवाजानं म्हणाला, "ह्ये बगा, इट्या, कवतिक अन् नू म्हादू, ह्ये आना शपथाचं काम काय आता सुटल, असं दिसत नाहीं. आपला इचार सांगतूं. ह्ये बगा, आपुन जर पैरनी नेल्याच नायती, तर आना घ्यायला का खळखळ करावी? ज्यो चोर न्हाई,-त्याला खंडोबा तरी काय करतो अन् बिरोबा तरी काय करतो!" इतकें बोलून येद्यानें त्यांना एक ठराविक खूण डोळ्यानें केली.

तेव्हां ते तिघे रंजीस आल्यासारखें म्हणाले, "वय पाटीलदादा, अनी समदं बिरोबाची शपत घेतों; आमी पैरनी नेल्या न्हाइती. अन् तुमी गांवचं पाटील; तर तुमच्या पायावरती बी हात मारतूं." पाटलानें पाय मागें घेतले.

"हो हो तर, जर पैरनी नेल्याच न्हाइती, तर कुनाचं भय हाये?"

सारीं मंडळीं आपापल्या घरीं गेलीं. जातांना पाटील आपल्या भावाला म्हणाला, "यांनीं कांहीं चोरल्या नसाव्या; हे शपथा घेत आहेत." भाऊ म्हणाला, "दादा, हें सगळं खोटं आहे. आग कशाची अन् शपथ कशाची? काल आपल्या मावळणीचा ल्योक आला होता; तो म्हणाला,

या चौघाही जणांना त्या दिवशीं मीं तुमच्या चांदईच्या बाजूनं, कांही तरी ओढून झटकतांना पाहिलं"

शंभुसिंग मधेंच थांबले; अन् म्हणाले, "भाऊ, तूं म्हणतोस तरी काय?"

"विचारा वाटलं तर त्याला. दादा, ह्याच माणसांनीं वयल्या आळींतल्या बामनाची मस इख घालून मारली. अन् मग यांनीं शंभर माणूस जमा करून चांगली मेजवानकी खाल्ली."

शंभुसिंगांनीं पोलिसांत वर्दी दिली; आणि जमादाराशीं कानगोष्ट केली कीं, अशा अशा लोकांवर आपला वहिम आहे. पैरणींची बाब अगदींच क्षुल्लक होती; पण जमादारानें शंभुसिंगाचें म्हणणें फार संथपणें ऐकून घेतलें; आणि त्यांना बजाविलें कीं, "तुम्ही आतां या विषयांत कांही बोलूं नका; आणि कुणाला कांहीं सांगूं नका. पैरणी कसल्या होत्या, तेवढं मला सांगा"

"पैरनी रेशमासारख्या कापडाच्या होत्या; अन् त्यांच्यावर करंगळीच्या जाडीचे पिवळे पट्टे होते."

"पैरणी भवानरावच्या ना?"

"होय भवानरावाच्या."

येवढें होऊन शंभुसिंग आणि जमादार यांची मुलाखत संपली.

तालुक्याच्या गांवच्या पोलिसखान्यांत बरीच हालचाल चालू होती, आणि रात्रींच्या वेळीं फौजदारांची आणि भवानरावांची मुलाखतही झाली. पण भवानराव गेल्यावर फौजदारानें कांहीं खारव्याचे रुमाल सोडले. आणि जमादार, हे स्वतः अन् एक साधा भोळा दिसणारा एरवींचा माणूस यांची एकमेकांत खूप वेळ कुजबूज होत राहिली. शेवटीं फौजदार म्हणाले, "ठीक आहे. मग टरलं तर. एकांतनं दुसरं; दुसऱ्यातनं तिसरं, असं निवेलसं वाटतं. पण जमादार, आपल्यापाशीं जीं वर्णनं आलेलीं आहेत, तीं मुद्देमालाशीं जमलीं पाहिजेत; अन् हे दरोडेखोर बदमाष त्या दिवशीं इथनं पन्नास कोसांवरच्या गांवांत असले पाहिजेत."

"हां, प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय मुद्देमाल जमतो कां, हें सांगतां यायचं नाहीं; पण हे बदमाष त्या दिवशीं, आधीं एकदोन दिवस आणि मागून एकदोन दिवस इथें नव्हते, एवढं तरी खरं आहे."

दोनतीन महिने गेले. येश्या कवतिक्याला म्हणाला, "ल्येका, तें संपलंय म्हणून समज. अरं, दीड दमडीच्या पैरनीपायीं कोन पोलिसांत जातूया? अन् कोन पोलिस असल्या कामांत मन घालतोया?"

"हां, तें तर खरंच. आतां पालीची जत्रा आलीं आहे. तर आपुन तकडंच चला. मंजी, या पाटलाची भुनभुन बी संपल अन् सगळंच संपल."

मग त्यांनीं चांगले कपडे बरोबर घेतले; थोडा पैका अडका घेतला आणि चौघांच्या सवाऱ्या पालीच्या जत्रेला गेल्या. जत्रा तुफान भरली होती. खंडोबाचं अन् म्हाळसाईचं लग्न व्हायचं होतं. नवरामुलगा नवरीच्या मंडपाकडे मिरवत जायचा होता; अन् लगीन लागलं म्हणजे जत्रा फुटायची होती. जत्रेला हजारोंच्या हजारो माणसं लोटलीं होतीं. त्यांत एक भोळासा दिसणारा माणूसही होता. तो मधून मधून बंदोबस्ताला आलेल्या शिपायांच्याकडे पाही; आणि आपल्यामागें इकडे तिकडे रेंगाळत असलेल्या अन् साधीं कांबुणें घेतलेल्या माणसांच्याकडे पाही. खंडोबाच्या पुढें हातांत टिकारणी घेतलेल्या जवानांची रांग लागली होती. येश्या कवतिकला म्हणाला, "ल्येका कवतिक, उडीव भंडारा." कवतिक म्हणाला, "ल्येका, लोकं उडवित्यात त्येवढं पुरं. चांगल्या पैरनी पिवळ्या होत्यात." या चौघांच्या मागल्या रांगेंत तें भोळं दिसणारं ध्यान मान उंच करून अन्

# निर्दय



'सिनिक्'

*तो, ती आणि मी.*

*तो आणि ती पति पत्नी.*

*मी त्यांचा विश्वनीय मित्र.*

*चांदण्याचे दिवस. रात्रीची वेळ.*

*समुद्रकिनाऱ्यावर सहलीस निघालों आम्ही तिघे.*

*चांदण्यांत वाळूचे कण चमचमत होते. सागर उभार होता. वातावरणांत मादकता होती. धुंद वारा अंगावरच्या तलम वस्त्रावर झेंपावत होता. शरीर सुखावत होतें. सुस्तावत होतें. चालण्यापेक्षां वाळूच्या शुभ्र चादरीवर पहुडावें वाटे.*

*वाळू पाठीत रुतत होती. पण जाणवत नव्हतें. नील नभांतील चंद्राच्या विहाराचें आकंठ पान चाललें होतें. तिचें डोकें त्याच्या मांडीवर होतें. तो तिचा हात हातांत घेत मला म्हणाला, 'काय बहार आहे, नाहीं!'*

*"इश्श, ही काय विचारण्याची गोष्ट आहे? तो काय ह्याबाबतींत तभेद दाखवणारा अरसिक थोडाच आहे......"*

*चंद्र एका क्षणांत एका चिमुकल्या ढगाच्या आड झाला व ती ओणवली.*

*विशेष कुणीच बोलत नव्हतें. मधून- मधून तोच एखादा शब्द, एखादें वाक्य उच्चारी. आम्ही एकमेकांकडे पाहत होतों. संकेतहीन स्मित झळके व लगेच अदृश्य होई.*

*तिची पाठ उघडी पडली होती. अर्धा सैल सुटलेला शेपटा पाठीवर वाकडा झाला होता. हनुवटी दोन्ही हातांच्या उताण्या पंजावर स्थिरावली होती. कपाळावरचे केस भुरभुरत होते. त्यांतली एक बट डाव्या डोळ्यावर स्थिरावली होती. चहाटळ वाटत होती. खट्याळ दिसत होती. गळ्यांतील एकदाणी रेतींत घुसळली होती. चंदेरी झिलईवर सोनेरी झांक सळसळत होती.*

*मी तिच्याकडे पाहत होतों. आक्षेप नव्हता. विरोध नव्हता. संशय नव्हता. मला आपलें अपरूप वाटत होतें. बरें वाटत होतें. ही संवदना चघळत राहावी असें सारखें वाटत होतें.*

*निर्दय (पुढें चालू)*

*'बराच वेळ झाला नाहीं ?'*

*'किती वाजले ?'*

*'माझें रिस्टवाच घरींच राहिलें......किती वाजले ?'*

*—मला प्रश्न विचारला गेला होता. परन्तु माझें लक्ष तिकडे नव्हतें. नव्हतें म्हणण्यापेक्षां अर्धवट होतें. कारण मनगटावरच घड्याळाशीं चाळवचाळव करीत मी तिच्या प्रश्नाची दखल घेत म्हणालों, 'काय म्हणालीस ?'*

*ती हंसली. हंसून त्याच्याकडे पाहूं लागली. मी किंचित् बावरलों. शरमलों. अपराधी वाटूं लागलें. तिनें आपल्याला 'पकडलें' ह्या संभ्रमांत मी पुन्हा बावळटासारखा उद्गारलों, 'काय ? काय झालें ?'*

*'कांहीं नाहीं. घड्याळ असून तूंहि आमच्यासारखाच. किती वेळ गेला हें तुला पण कळलें नाहीं.' ती प्रसन्नपणें म्हणाली. अवखळपणानें बोलली व उठून बसली. एकदाणी वर झाली. एकदाणींतून डोकावणारे उरोज शरीरांत लपले, माझ्या नेत्रांचें 'श्रेय' हरपलें—*

*ओणव्यानें बराच वेळ पडल्यानें तिच्या उन्नत वक्षाचें शिल्प रेतींत उमटलें होतें. उठतां उठतां तें बिघडणार तर नाहीं असें भय मला स्पर्शून गेलें. माझी नजर त्या शिल्पावर खिळली. ती रेती तशीच संभाळावी, जपून ठेवावी अशी वासना माझ्या मनांत निर्माण झाली.*

*'अरे, उठ आतां—'*

*'उठवणार कां आहे ?'*

*'होय खरें आहे. वातावरण गुगवणारें आहे...'*

*'पण उठलेंच पाहिजे...'*

*'हो, चल बाबा, झोंप येतेय्' आळोखेपिळोखे देत ती म्हणाली. तसें करतांना तिची सांवली रेतींतल्या त्या वक्षाच्या ठशावर लपंडाव खेळून गेली. चेटूक करणारें होतें सारें.*

*ती उभी राहिली. मोहि. मला म्हणाला, 'चल.' चालूं लागा. एका फटक्यासरशीं तो रेती मिसळली गेली.*

*मी पुटपुटलों, 'निर्दय कुठला !'*

• • •



तोंडाचा आ करून खंडोबाच्या पालखीकडे बघत होतं. "काय मानूस जमलंया !" इट्या म्हणाला. "व्हय व्हय, न्हाई न्हाई त्या तऱ्हेचीं मानसं लोटल्यात." त्या बावळ्या माणसानं या दोघातिघांच्या पाठीवर हात ठेवले. मात्र डोळे खंडोबाच्या पालखीकडे लावलेले; अन् तोंडानें येळकोट चाललेला.

लगिन लागलं अन् जत्रा फुटूं लागली. त्याबरोबर ते बंदोबस्ताचे शिपाई अन् ते मागें रेंगाळणारे लोक सपकन् पुढें आले; अन् त्यांनीं त्या चौघांच्या दंडाला भराभर काडण्या बांधल्या.

"अव आमी देवाच्या दरसनाला आलोंया. अव आमी देवाच्या दरसनाला आलोंया."

"तुमाला देवाच्या दर्शनाला न्यायलाच आम्ही आलों आहोत, चला तुम्हांला देव दाखवितों. तिथं घासा नाक."

चौघे दांड गडी. पण पोलिसांचा गराडा मोठा. तो पाठीवर हात ठेवलेला भोळा बावळा कुठं निसटला कोणाला ठाऊक! पण आतां या आडदांड माणसांच्या ध्यानांत आलं कीं यात्रेकरूंसारखे दिसणारे आणि साधीं कांबुणें घेतलेले लोक शिपाईच होते; अन् तो भोळा दिसणारा माणूस पक्का लुचा होना. पण मागून ध्यानांत आलेल्या या गोष्टीचा आतां कांहीं उपयोग नव्हता. त्यांच्या अंगांत रगेली फार; आणि म्हणून जखडलेले असतांनासुद्धां मधून मधून ते थोडी मस्ती करीत; पण या दंगामस्तीचें बक्षीस म्हणजे पोलिसांच्या दंडुक्याचे रट्टे येवढेच होतें!

"अरं कवतिक, तरी मी तुला म्हनत व्हतो, या पैरनी आपन घालंु या नग."

"तू कंदी म्हनाला व्हतास रं ? आतां तुला शेनपना आठवतोया. पन हें पग म्हाद्या, नुसत्या पैरनींपायीं इतकी शिपाईमानसं जमलीं असत्याल, ह्ये काय गड्या खरं वाटत न्हाई."

"तूं म्हनतुयास, त्येंच बरुबर!" इट्यानें शेरा मारला, अन् हळूं बोला म्हणून त्यानें खूण केली. "अरं, पैरनींपायीं पोलिसांचा एवडा गराडा कसा पडल रं ? ह्ये काय गड्या बरं दिसत न्हाय."

"तूं ल्येका सदान् कदा भेल्येला! काय व्हतया ? नेत्याल गेटावर अन् दोन धक्कं देऊन सोडून देत्याल."

इकडे जत्रेची दंगल चालू असतां आणि खंडोबा आणि म्हाळसा यांच्या लग्नाचा जल्लोष चालूं असतांना तिकडे या टग्यांच्या गांवीं एक निराळाच प्रकार चालूं होता. हे चौघे लोक यात्रेला गेले आहेत ही बातमी पोलिसांना होतीच. चौघांचींहि नांवें वहिमी लोकांच्या यादींत पोलिसांनीं केव्हांच घातलीं होतीं. पण अजून त्यांचें पुरतें भरलें नव्हतें. त्यांच्या भरल्या गाड्याला पैरणींचें सूपसुद्धां आतां जड झालें ! शंभुसिंगानें हें सूप पुरविलेलें होतें. कसलीही चाहूल लागूं न देतां आणि त्या वस्तींतील लोक पुरते गाफील आहेत असें पाहून पोलिसांनीं त्या चौघांच्या घरांवर पैरणींसाठीं अचानक छापा घातला. वेळ रात्रीं बाराची होती. आळींतले दुसरे दांड गडी कदाचित् आपल्या कसबाला दुसरीकडे गेले होते; अन् ते तीन वाजेस्तोंवर यायचे नाहींत ही पोलिसांची माहिती बरोबर होती. छापा बसतांच बायकांनीं बोंबाबोंब केली.

"आमचीं मानसूं यात्रला गेल्याती; अव शिपायीदादा, अमी बायका मानसं आन् तुमी घरांत कसं शिरतां ?"

"खबरदार ओरडलांत तर. तुमच्या अब्रूला धक्का लागायचा नाहीं. पण ओरडाओरडा केलात"—कमरेला लटकलेल्या सोटग्याकडे बोट दाखवून—"हं बगितलंत का काय आहे ? चूप बसा."

बायामाणसें गप्प झालीं. आळींतलीं इतर माणसेंसुद्धां आपापल्या ठिकाणीं सर्द होऊन गेलीं. आणि पोलिस पैरणींसाठीं झडती घेऊं लागले तों पोलिसांना नाना प्रकारचा माल सापडूं लागला. त्यांत उंचीं उंचीं वस्त्रें, दागदागिने असले जिन्नस वाटेल तेवढे सांपडले. बरोबर आणलेल्या पंचांच्या देखत पोलिसांनीं ते जप्त केले. हा सगळा श्रीमंती गल्ला नाहींसा झाल्यावर त्या चौघांच्या घराच्या नरवंड्या मात्र शिल्लक राहिल्या. बायका रडत भेकत होत्या; कपाळावर मारून घेत होत्या; "आतां हे कवां येत्याल हो! आतां आमीं कुनाकडं बघावं?" अशीं आक्रंदनें त्या करीत होत्या. फौजदार, जमादार, पोलिस शिपाई आणि ते पंच, मुद्देमालाचीं ओझीं बरोबर घेऊन निघून गेले. सारी वस्ती आकांतानें हादरून गेली; आणि यात्रेला गेलेले मर्द केव्हां येतात म्हणून वाट पहात बसली. आश्चर्याची गोष्ट म्हणजे ते पहाटेच्या वेळीं नेहमीं परतून येणारे तगडे वस्तीवाले आज दूरच्या दूरच राहिले. अन् सकाळ झाल्यावर आपापल्या घरीं आले.

येसा, म्हाद्या इत्यादिकांच्या बायका जरी आतां त्यांची वाट पहात होत्या, तरी नवऱ्यांची आणि यांची गांठभेट आतां घरीं होण्यासारखी नव्हती. पालीहून पकडून आणलेल्या त्या चौघांना घेऊन पोलिस लौकर तालुक्याच्या गांवीं गेले; आणि तेथें त्या छापेवाल्या पोलिसांची गांठ पडून जप्त केलेला मुद्देमाल दृष्टीस पडतांच यात्रेंतील धरपकड अगदीं बरोबर झाली असें सर्वजण एकमेकांना सांगूं लागले. त्या चौघांना त्यांनीं निरनिराळ्या खोल्यांत डांबून ठेवलें. चिमा, रखमी, भागी अन् येसा आपल्या गांवाहून तालुक्याच्या गांवीं आल्या; आणि फौजदारांच्या हातींपायीं पडूं लागल्या. शिपायांना बरोबर घेऊन फौजदारानें त्यांना त्या कोठड्यांकडे पाठवलें. मात्र बजावून ठेवलें कीं, "आतां न्हवऱ्याचं नुसतं दरशान घ्या!" आणि त्या चौघांनाही शिपायांच्या द्वारां खडसावलें कीं बायकांशीं एक शब्द बोललांत तर खबरदार. दूर अंतरावरून त्या बायकांनीं नवऱ्यांकडे पाहिलें. आणि त्या ढसढसा रडूं लागल्या. नवऱ्यांचे चेहरे पडलेले होते. रात्र येवढ्या थोड्या दिवसांतसुद्धां त्यांच्या अंगांतील रगेली मावळल्यासारखी झाली होती. दहा पांच मिनिटांत "चलो" असें म्हणून शिपायांनीं बायकांना पिटाळून लावलें.

इतक्यांत बारा एकच्या सुमाराला तिथें शंभुसिंग दिसूं लागले. शंभुसिंगांच्या मागोमाग भवानरावही आले. ते पंचही आले. आणि कुणाच्याच ओळखीची नसलेलीं अन् निराळेच पोशाख केलेलीं परप्रांतांतील कांहीं माणसेंही आलीं. त्या चौघा गड्यांना ज्या आवारांतील खोल्यांत डांबून ठेवलेलें होतें, त्या आवाराच्या समोरूनच ही मंडळी कचेरीकडे गेली. त्यांच्याकडे पाहातांच म्हाद्या इस्या इ. चौघेजण आपापल्या खोल्यांत जिथल्या तिथं थिजून गेले. शंभुसिंग आणि भवानराव येवढे दोघे जगच जर त्यांना दिसले असते, तर त्यांच्या मनानें येवढा ठाव सोडला नसता. पण जेव्हां तीं परप्रांतांतील माणसें त्यांनीं पाहिलीं, तेव्हां मात्र आपल्या कंबक्तीची वेळ आली आहे हें त्यांनीं पक्कें ओळखलें. कुंपणावरच्या पैरणीच आपण नुसत्या नेल्या असत्या, तर हा प्रसंग ओढवला नसता हें हेरायला त्यांना मुळींच वेळ लागला नाहीं. आपण यात्रेला गेलों असतां घरांच्या झडत्या झाल्या; म्हणून तर बायका माणसें इकडे रडत भेकत आलीं, येवढें, असल्या धंद्यांत बरेच दिवस घालविलेले असल्यामुळें त्यांच्या ध्यानीं आलें.

चौकशी, जाबजबान्या फौजदारांनीं सुरू केल्या. त्या परप्रांतांतील माणसांच्याकडून, चोरीस गेलेल्या जिनसांच्या याद्याही त्यांनीं आधींच घेतलेल्या होत्या; आणि भवानराव जरी नुसतेच आलेले होते, तरी त्यांचें काम फक्त पैरणी ओळखण्याचें होतें. मात्र त्यांनीं पैरणींचीं वर्णनें भवानरावांकडून तपशीलवार घेतलीं होतीं. त्या चोरट्यांच्या अंगावरून यात्रेच्या जागींच पोलिसांनीं ओरबाडून घेतलेल्या त्या पैरणी पुढें करून फौजदारानें त्या भवानरावांना दाखविल्या. त्यांनीं आपल्याच म्हणून त्या ओळखल्या; आणि शंभुसिंगांनींही आपण या भवानरावांच्या अंगावर पाहिल्या होत्या असें सांगितलें. मग सीलबंद पेटारा उघडून फौजदारानें एकेक अलंकार बाहेर काढला. आणि आधींच मिळालेल्या यादींतील







अनुक्रमणिका

वर्णनाबरहुकूम तो आहे कीं नाहीं, हें पाहून परप्रांतांतील त्या त्या मालकाला त्यांनीं तो दाखविला. त्यांतल्या दोघांनीं तक्रार केली कीं, गळ्यांतील सोन्याच्या सांखळ्या गेल्या आहेत; व त्याची नोंद यादींतही आहे. पोलिसांनीं हेरलें कीं, चोरीचा माल विकत घेणाऱ्या अमुक एका शेट्याकडे त्या असल्या पाहिजेत आणि हें सारें पंचांच्या देखत झालें.

चौघांवरचे खटले सुरू झाले. नाहीं-होय म्हणण्याची त्या चौघांना सोयच नव्हती. डोळ्यांत तांबडे तिखट घातलें तरी हूं कां चूं करायचे नाहींत, असे ते अट्टल लोक होते. पण अशाही माणसांच्या कडून कबुलीजबाब घेण्याचें महाभयंकर तंत्र पोलिसांच्याही जवळ होतें. आतां त्या चौघांच्या नशिबीं काय आहे, हें सर्वांनींच ओळखलें. अवश्य तेवढें कोर्टांतील कामकाज तडीला गेलें, आणि कोर्टानें सांगितलें कीं, "तुम्ही चौघांनीं अनेक गुन्हे केलेले आहेत; भारी किंमतीचे दागदागिने तुम्हीं पळविले आहेत; सोन्याच्या सांखळ्या तुम्हीं विकलेल्या आहेत. चोऱ्या करतांना तुम्हीं बायकामाणसांना मारहाण केली आहे आणि त्यांतील एक बाई आज मरायला टेकली आहे. भवानरावांच्या पैरणींची चोरी शंभुसिंगांच्या घरीं केली आहे; आणि शंभुसिंगांनीं तुम्हांला भलेपणानें गुन्हा कबूल करा म्हणून म्हटलें; पण तुम्हीं शपथेवर सांगितलें कीं, आपण पैरणी चोरल्या नाहींत. तुमची गुन्हेगारी अनेक ठिकाणची अनेक प्रसंगांची आणि फार भयंकर आहे. म्हणून तुम्हांला मी दहा-दहा वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा सांगतों."

इतकें बोलून कोर्ट उठतांच चौघांनीं माना टाकल्या; आणि कोर्टाच्या बाहेर उभ्या असलेल्या त्यांच्या बायकांनीं जोरानें बोंब ठोकली. रखमी आरडली ओरडली; भागीनें कपाळ पिटलें; येशीनें तोंडांत माती घातली; आणि चिमीनें धरणीवर घालून घेतलें. पण आतां त्यांच्याकडे कोणी पाहीना. बेड्या ठोकलेल्या चौघांना पोलिस लोक कोर्टांतून तुरुंगाकडे नेऊं लागले, तेव्हां त्या चौघांनीं बायकांच्याकडे पाहिलें; बायकांनीं त्यांच्याकडे पाहिलें; आणि सर्वांना हुंदके येऊन डोळे गळून पडतील कीं काय, असें वाटूं लागलें. थांबण्याची सोयच नव्हती. पोलिस लोक दंडुक्यानें मागून येत होते. हाय रे दैवा! चार पैरणी चोरल्या; आणि चार असाप बाया कपाळ पिटीत बसल्या.

पण ही करुणकथा येथेंच थांबेना. आतां रखमीनें काय करावें? भागीनें बुगाच्या तोंडाकडे पहावें? येशीनें पोटाचा दरा कसा भरावा? आणि चिमीनें कुठें जाऊन तुकडा खावा? त्या आपआपल्या घरीं गेल्या; आणि रडत भेकत बसल्या. बायका म्हणून त्यांची पूसतपास वस्तींतल्या लोकांनीं केली इतकेंच. पण ते चौघे असे उर्मट आणि ज्याला त्याला दडपणारे होते कीं "यांचं कांहीं कां होईना" अशीच भावना पहिल्या पहिल्यानें तरी आळींतल्या साऱ्या लोकांच्या मनांत वावरूं लागली. पण हळू हळू त्यांची माणुसकी जागी झाली. आणि ते रगेल गडी जरी असे उंडारलेले होते, तरी बायकांनीं काय केलंय् हा विचार वस्तींतल्या लोकांत बळावूं लागला; आणि शंभुसिंगाकडे कांहीं थोडी रदबदली करून बायांच्या पोटापाण्याची कांहीं व्यवस्था होते कां हें त्यांनीं पाहिलें. पण तें कांहीं पुरेसें जमेना; आणि जमलें असतें तरी बायकांच्यानें दिवस निघेनात. त्या झुरणीला लागल्या. एकीच्याही पोटीं पोर नव्हतें कीं ज्याच्याकडे बघून तिनें दिवस काढावेत. त्यांचीं घरें जरी खोपटासारखीं दिसत असलीं, तरी नवरे ठिकठिकाणीं वाधाडे मारून घरांत पैका जमा करीत; आणि खाण्या-पिण्याची चंगळ ठेवीत. आतां कुठं काम मिळालं, तरी ओलाकोरडा तुकडा फार झालं तर त्यांना मिळायचा. त्या सुकूं लागल्या; आणि त्यांच्या अंगांतील तरुणपणाची कळा मावळूं लागली. आतां रखमीनें काय करावें? भागीनें कुठें जावें? येसानें झुरून मरावें कां? आणि चिमानें हरळ्या देत कुठें हिंडावें? पोलिसखान्यांतील जाबजबानीचें आणि कोर्टांतील खटल्यांचें मनोरंजक नाटक चालू होतें, तेव्हां खूप लोक जमत; आणि या बायकांच्याकडे केविलवाण्या दृष्टीनें पहात. पण या लोकांना आपापलीं कामें होतीं. जो तो आपल्या उद्योगाला गेला. गोष्ट टरून गेली. पोरींचें नशीब फुटलें; आतां देवाच्यानेंसुद्धां गोष्टी फिरत नाहींत हें ओळखून आळींतले म्हातारेकोतारेसुद्धां गप्प बसले; आणि या चौघी बाया दुःखानें अन् कदाचित् भुकेनेंसुद्धां झुरत आणि वाळत चालल्या.

तालुक्याच्या गांवींही या लोकांची वस्ती होतीच. या जातींतील कांहीं तरुण माणसें पोलिसखात्याच्या थोडीशी मर्जीचीं बनलीं होतीं. पोलिसांच्या विश्वासांत शिरावें, कांहीं शेलकी बातमी त्यांना द्यावी, रोजच्या हजेरीची आपल्या खेडेगांवच्या नातलगांना माफी मिळवून द्यावी आणि आपण पोलिसांच्या मर्जींतले म्हणून कोर्टकचेऱ्यांच्या आवारांत थोडी फुशारकी मिरवीत फिरावें, असा पेशा या तरुण लोकांनीं पतकरलेला होता. त्यांना म्हाद्या, कवतिक इत्यादिकांची सारी हकीगत पाठ झालेलीच होती. रखमी, भागी इत्यादि तरण्या पोरींची उडालेली दुर्दशा आणि होत असलेले त्यांचे हाल त्यांच्या कानीं गेलेच होते. त्यांचीं लग्नें झालेलींच होतीं; आणि ते थोड्याशा इतमामानेंही वागत असत. दुर्दशा उडालेल्या या बायांच्याकडे त्यांचें लक्ष हळूं हळूं जाऊं लागलें. जातींतील असाप स्त्रियांच्या संबंधीची माया म्हणून अन् त्यांत तरण्या नाकेल्या पोरींच्य



अनुक्रमणिका

संबंधानें थोडीशी ओढ लागली म्हणून! पण ह्या तरण्या माणसांचं लक्ष तिकडे जास्त लागूं लागलें; आणि त्या खेडेगांवच्या वस्तीकडे त्यांची पैरवी जास्त वाढूं लागली. वस्तींतील म्हाताऱ्या लोकांनीं आणि बापई गड्यांनीं हें काय आहे, हें एकदमच ओळखलें. पण त्यांत त्यांना कांहीं गैर दिसलें नाहीं. दोन-दोन बायका असणें ही त्यांच्या सरावांतली गोष्ट होती. शिवाय, म्हाताऱ्यांना असें वाटलें कीं या पोरी आपल्या बापई-गड्यांच्या घरांत घुसण्याऐवजीं दुसरीकडे कुठें गेल्या तर बरेंच. आणि बीपयांना वाटलें कीं, 'शारच्या' तालेवार लोकांच्या घरीं या गेल्या, तर त्यांच्या द्वारां पोलिसांचा आपल्यावरचा दांत जरा कमी होईल. वृद्धांच्या आणि प्रौढांच्या मनांतील ही भावनांची चलबिचल, त्या पोरींच्यावर लक्ष ठेवूं लागलेल्या उमेदवारांच्याही ध्यानांत आली. आणि मग या कामीं कसलाही धोका नाहीं हें पटल्यामुळें ते उघडपणें त्या वस्तीवर येऊं लागले.

येतांना बरोबर कांहीं धान्य आणावें, दोडका, मुळा, नाहीं तर 'भाजी' आणावी. एखाद्या वेळीं चार धडुतीं घेऊन यावें असें ते करूं लागले. बरें, त्या बायांना तरी नको म्हणण्याची सोयच नव्हती. एक तर पोट जळायला हवं होतं; आणि दुसरें म्हणजे मर्दांचा आश्रय मिळत राहिला, तर आपल्यावर कोणी भलतीं माणसें डोळा ठेवणार नाहींत, हेंहीं त्यांनीं ओळखलं होतं. यांतून पुढें काय निघेल, याची मानसिक कुणकुण त्यांनाही अर्थात् लागली. पण त्या तरी "हे जिन्नस आम्हांला नकोत" असं कोणत्या तोंडानं म्हणणार होत्या? अन् आयत्या मिळत असलेल्या रक्षणाच्या छायेंतून मुद्दाम बाहेर पडणें त्यांना साधण्यासारखें नव्हतें.

त्या पहिल्यापहिल्यांदां एकमेकींत; आणि मग शेजारणींशीं म्हणूं लागल्या, "बया आतां आमी की करावं, कुनाच्या तोंडाकडं पगावं, आन् आमाला तुकडा तरी कोन देनार?" त्या चौघींचे हाल सारखेच होते; आणि म्हणून त्यांच्या मनाची घडणहि सारखीसारखीच होत चालली. पण यांत कांहीं आश्चर्य नव्हतें. त्या शेजारणीपाजारणीसुद्धां दया येऊन, डोळ्यांत पाणी आणून त्यांना म्हणत, "आमी संमदं वळाकतुं. परमेसराच्या खिरपेनं तुमचं हाल संपलं तर बरंच होईल." या शेजारणींना त्या पोरींची दया तर येत असेच; पण अगदीं खोलांत त्यांच्या मनांतही एक सूक्ष्म मत्सराचा भाव होताच. या नाकेल्या पोरी आपल्या कुणाच्या घरांत शिरल्या, तर गोंधळ माजायचा. त्याच्याऐवजीं, या दुसरीकडे गेल्या तर त्यांना हवंच होतं. होतां होतां मिळत असलेल्या आश्रयानं या पोरींनीं पुन्हा अंग धरलीं. त्या पहिल्यासारख्याच थोड्या तजेलदार दिसूं लागल्या. त्या शेजारणींना म्हणूं लागल्या, "बया, आमी तरी काय करावं? धा-धा वरसं कशीं घालवावीं अन् कुनाच्या हातींपायीं पडून पोट जाळावं? आमास्नी काय आमचं बापई नकुसं झालं व्हतं कां? पन आतां त्ये तर जाऊन पडलं खोड्यांत. अन् जगत्यात का मरत्यात? आन आमी बी जगतूं कां मरतूं? कुनी सांगावं?"

जीवनाचें पाणी उतारानें वाहत चाललें; त्यानें अनुकूल भूमि शोधली; आणि विसाव्याचें किंवा मीलनाचें स्थळ गांठलें. माणसाला भूक असतेच; पण त्याच्या रक्ताला वासनाही असतात. भूक पोटांत कुरतडत राहते; आणि रक्त शरीराला आंतून धडका देतें. दोन्ही एक झालीं म्हणजे माणूस अगतिक बनतें; आणि बाकीचे सारे विचार मागल्या मुक्कामाला राहून, ज्याला लोक कोडगा म्हणतील, तो देह दुसऱ्या मुक्कामाला धांवतो. इथें तर देहाला 'आंबातणें' आलें होतें. पण नवरे अजून जिवंत होते, लग्न तर मोडायला हवें होतें. तें मोडलें तरच दुसरा घरोबा होणार होता. हें मोडणार कसें? पण असले प्रश्न दर पिढीला उत्पन्न होत राहतात; आणि त्यांची निभावणी जातीला करून ठेवावी लागते. या जातीचे जे वन्द्य पुरुष जातीची व्यवस्था पाहत, त्यांना 'साधु' असें म्हणत. या साधूकडे हा अवघड मामला बायांनीं अन् त्या तालुक्याच्या गांवच्या विवाहित तरुणांनीं नेऊन पोंचवला. साधु गप्प बसला. त्याच्यापुढें हात जोडून एका अंगाला बाया उभ्या राहिल्या; आणि दुसऱ्या अंगाला ते तरणे जवान उभे राहिले. साधूनें डोळे मिटले अन तो जणूं कांहीं ध्यानस्थ झाला. हीं माणसें त्याच्याकडे टक लावून पाहत राहिलीं. कांहीं वेळानें साधूची समाधि उतरली! साधूच्या पुढें त्यांनीं आठ रुपये ठेवले होते; विड्याचें पान अन् सुपारी ठेवली होती; नारळ ठेवला होता; आणि जरीच्या उपरण्याचें एक पानही ठेवलें होतें. साधूनें डोळे उघडले. त्या सर्वांच्या तोंडाकडे त्यानें निश्चल दृष्टीनें पाहिलें; आणि मग तो म्हणाला, "लग्न मोडायला दोन्ही माणसं असावीं लागतात. पण तुमचे ते दादले आतां मेल्यापैकींच आहेत. मी तुम्हांला नवा घरोबा करण्याची परवानगी देतों."

आतां रखमी, भागी, येसा अन् चिमी आपल्या नव्या दादल्यांच्या घरीं राहूं लागल्या. दादल्यांची सर्वांवरच जरब मोठी; त्यामुळें सवतीसवतींचें भांडण बाहेर येण्याला तरी बंदीच होती. हे दोन-दोन बायकांचे दादले आतां मजेंत होते. पोलिसखात्यांत त्यांची जरूरी आणि मान्यता वाढत चालली होती; आणि याचा उपयोग करून घेऊन पैसा कुठून आणि कसा उकळावा, याचें कसबही त्यांना चांगलेंच साधलें होतें. ते शुभ्र पांढरीं धोतरें नेसत; पांढऱ्या पैरणीवर रंगीबेरंगी कब्जा घालत; आणि डोक्याला जरीचे तांबडे फेटे बांधत. आणि ते बांधतांना टाळूचे केस थोडे पुढें ठेवीत. दिवसांमागें दिवस आणि महिन्यांमागें महिने चालले होते; आणि कोडगा देह आणि कोडगीं मनें मागल्या उपशमित वासना आणि मागल्या आठवणी भराभर विसरत होतीं. त्यांच्या या संबंधाला निरगांठीसुद्धां बसूं लागल्या. वर्षांमागें वर्षें गेलीं; कुणाला एक, कुणाला दोन अशीं 'प्वारं' झालीं. आणि नव्या घरोब्याचं वैभव त्यांच्या नसांनसांतून फाकूं लागलं. आतां निराळं काय होणार होतं! उतारानं चाललेलं जीवनाचं पाणी तळवटांत पोचून स्थिर झालं होतं.

• •

वर्षांमागें वर्षें चाललीं होतीं. या काळांत खेडेगांवचे ते दांड गडी उन्हातान्हांत कामें करून करून आणि तुरुंगांतल्या वाडरांच्या लाथा खाऊन अगदीं रकमेला आले. "काय रे ए चोरट्यांनो! तुम्हांला लोकांना







छुबाडायला हवं नाहीं कां? अन् बायामाणसांना मारायला हवं नाहीं कां! ए ××× , किती पायल्या झाल्या? तुझा बा आतां दळील कां! तूं रे ए साल्या, घाणा कुणीं चालवायचा? तुझा बा येईल कां चालवायला?" असें म्हणम्हणून ते त्यांच्या पेकटांत लाथा घालीत; आणि ते दीनाहून दीन झालेले, सगळी गुर्मी विसरलेले, सारा ताठरपणा सोडून लव्हाळ्या-सारखे बनलेले येश्या, म्हाद्या, "व्हय साब" म्हणून पुन्हा कामाला लागत.

वर्षांमागें वर्षें गेलीं. दहा वर्षें लोटलीं. येश्याचीं हाडें पिचलीं, म्हाद्याचें थोबाड बसलें, कवतिकच्या उराचा पिंजरा झाला; आणि विठ्याला वेड्यासारखें होऊं लागलें. दहा वर्षें भरलीं. त्यांना जेलरनें सूटसुद्धां दिली नाहीं; कारण पहिल्या पहिल्यांदा त्यांची रग कायम होती, तेव्हां ते दंडलीनें वागत; आणि शिक्षेच्या पोटांत शिक्षा होत राहिल्या. पण आतां दहा वर्षें भरलीं; आणि एके दिवशीं तुरुंगाच्या कचेरींत माणसांची करवंटी बनलेल्या त्या चौघांना हपिसांत आणून त्यांच्या अंगावरच्या खाणाखुणा जमता-तसें अधिकाऱ्यानें पाहिल्यावर शिपायांनीं जेलच्या दरवाजाची दिंडी खाडकन् उघडली; अन् त्यांना बाहेर पिटाळून दिलें. आतां त्यांनीं कुठेंहि जावें आणि कुठेंहि मरावें.

भीक मागत, कण्हत कुंथत, हजेरीचा बोजा डोक्यावर घेऊन आणि एकमेकांना धीर देत ते आपल्या खेड्याला कसे तरी आले. संध्याकाळची वेळ होती. इतक्या वनवासानंतर रखमी भेटेल, भागी थोडी हंसतमुखानें पुढें येईल, चिमी रडून जवळ येईल, अन् येसा पाण्याचा तांब्या पुढें ठेवील अशा आशेनें हे आपल्या घराकडे आले. पण यांच्या देहाचे जसे पिंजरे झाले होते, तसे घरांचेही पिंजरेच उभे राहिले होते. त्यांच्या कच्च्या विटा आणि गडगड्याचे दगड कुणीं लांबवले होते. आणि कुणी छपराचे वासेही लांबवले होते. कवलारें अधांतरीं लोंबत होतीं. चारपांच पिलें पाजीत कुत्र्या सांवलीला पडल्या होत्या; आणि निवडुंगाचे फड भोवतालीं वाढत होते. अकालीं म्हातारे बनलेल्या त्यांना तें पाहवेना. तुरुंगांत त्यांच्या डोळ्याचें पाणी आटलेंच होतें. पण जुन्या आठवणींनीं ते झरे पुन्हा वाहूं लागले; आणि बायकांचीं नांवें घेऊन त्यांनीं आक्रोश केला. वस्तींतल्या लोकांनीं त्यांचें थोडें सांत्वन केलें; आणि त्यांच्या देहाची उडालेली दैना पाहून ते अगदीं गहिवरुन गेले. कांहीं झालें तरी ते आपले लोक आहेत हें ओळखून त्यांनीं त्यांना चार दिवस खाऊं-पिऊं घातलें. पण हें होत असतांना कारभारनींचें काय झालें, त्या कुठें गेल्या, याची पूसतपास, हे पाहुणे बनलेले लोक आंतून करीतच होते. खरें सांगावें म्हणतात, पण खरें सांगणेंसुद्धां जिवावर येतें; कारण तें भारी कठिण असतें. पण म्हाताऱ्या बायाबापड्यांनीं सारी हकीगत त्यांना सांगितली; अन् मग चार पैरणी चोरलेले हे मूळचे दांडगडी कपाळ पिटून रडूं लागले. "पैरनींबी गेल्या, अन् कारभारनीबी गेल्या! देवा! परपंचाचा उनाळा झाला!" अशासारखे केविलवाणे उद्गार काढून ते आतां म्हातारे बनलेले चौघे एकमेकांकडे खिन्न मनानें पाहूं लागले.

पण आशा मोठी खोटी असते; लोभ सुटत नाहीं; मागला तंतू लवकर तुटत नाहीं. "गड्या, एकदां आपुन तकडं जाऊन येऊं या; यता कां?" असें म्हाद्या म्हणाला. "अरं आतां तकडं कशाला जायाचं? आपलीं हीं भुतावानी त्वांडं त्येस्नी कशाला दाकवावी? आन त्येंचीं गोजीरवानी त्वांडं आपुन कशाला पगावीं?" कवतिक उद्गारला. पण एकदां बायकांना पाहण्याची त्यांची ऊर्मि हळूं हळूं प्रबळ झाली; आणि हजिरीची वेळ संभाळूनच ते त्या तालुक्याच्या गांवीं गेले.

रखमी, भागी, ह्या आतां तरण्या पोरी राहिलेल्या नव्हत्या; त्या चांगल्या प्रौढ दिसूं लागल्या होत्या. त्यांचे तालेवार नवे नवरे पोलिसांत मान पावले होते, तरी त्यांच्या बायकांना पाण्याउदकासाठीं लांब कुठेंतरी ओढ्याखोड्याला जावें लागे. घांसून लाल केलेले अन् पाण्यानें भरलेले हंडे डोईवर घेऊन या बायका ओढ्यांवरून परत येत होत्या. त्यांचे ते जरत्कारू बनलेले जुने नवरे त्याच सडकेच्या कांठाला झाडाखालीं बसले होते. बायकांना पाहतांच त्यांच्या चित्ताची एकदम गलबल झाली; आणि "ए रकमे," "ए एशे" असे टाहो त्यांनीं कांपऱ्या आणि खोल आवाजानें फोडले. त्या बायकांच्या खाकोटीला एकेक पोर होतें; आणि 'पोटीशीं 'पणाचा डौल भोगीत त्या धीरे धीरे घरीं चालल्या होत्या. म्हाद्या-विठ्यांचे आवाज खोल गेलेले खरे. पण समोर बघत चाललेल्या त्या बायांनीं ते ओळखले. ते त्यांचे प्रियकर दादले होते. आणि त्यांचे बारीक आवाजसुद्धां त्यांच्या कानाच्या ओळखीचे झाले होते. त्यांनीं सपकन वळून उजवीकडील झाडाकडे पाहिलें; अन् आपल्या दादल्यांना एकदम ओळखलें. ते कितीही क्षीण झालेले असले, तरी त्यांच्या चेहऱ्यांचा कणन् कण त्यांच्या ओळखीचा होता. जुन्या आठवणींची आणि प्रेमाची तुफान भरती बायकांच्या चित्तांत लोटली; आणि हंडे टाकून देऊन ओक्साबोक्शीं रडत त्या त्यांच्यासमोर येऊन बसल्या. आतां काय होणार होतें? कोण काय करणार होतें? पण करणारे निराळेच होते. हे लोक आल्याची कुणकुण त्या मगरमस्त नवऱ्यांना लागली होती, म्हणून ते त्याच सडकेला आले; आणि पाहतात तों आपल्या बायका जुन्या नवऱ्यांपुढें आक्रोश करीत आहेत. ते संतापले; आणि पुढें जाऊन त्यांनीं बायकांच्या कमरेंत बकाबक लाथा घातल्या; "रांड, हतं काय करतया? अन् हंडं कां टाकलं? अन् ही खोकडं कोन हायती?" त्यांनीं पुन्हा लाथा मारल्या आणि म्हणाले, "चला घरीं."

कवतिक आणि त्याचे मित्र कळवळून म्हणाले, "बाबा, त्येंना मारूं नगा; अरं त्येना मारूं नगा; त्या तुमच्याच हायती, त्याचं धे-देह तुमचंच झाल्याती. आमी आतां आपल्या गांवाला जातों; आन् मोडक्या आढ्यां-खालीं मिळल तो तुकडा खाऊन मरून जातों. तुमी यांना मारूं नगा."

पुढें ते आणि त्यांच्या बायका काय म्हणाल्या, हें कोणाला माहीत नाहीं!

• • •

# त्र्यंकूची शिकवणी



—द. मा. मिरासदार

निरनिराळ्या बऱ्याच परीक्षा पास होऊन अखेर मी एका खेड्यांत मास्तरची नौकरी धरली. त्यावेळीं माझें वय वीस–बावीस इतकेंच असावें. त्यावेळीं माझें लग्न झालेलें नव्हतें. मी अगदीं अफुट होतों. माझे बाहु पिळदार असून ते वेळीअवेळीं फुरफुरत असत. गर्दन एखाद्या लोखंडी गोळ्याप्रमाणें फुगीर होती. मांड्याचे पट तट्कन उठून फिरत होते. माझी भरगच्च छाती हा तर माझ्या खास अभिमानाचा विषय होता. त्या वेळीं मी चालूं लागलों म्हणजे पायाखालची भुई दबली जात असे. सांजसकाळ तालमींत जाऊन मेहनत करण्याचा नाद मला लहानपणापासून होता. त्यामुळें डोक्यापासून पायाच्या घोटापर्यंत सर्वांगावर तांबडी माती चिकटलेली असे. एखादा तांबडा मारुती रस्त्यावरून चालावा त्याप्रमाणें मी चालत असें. हत्ती झुलावा त्याप्रमाणें मी झुलत असें. एकंदरींत मी मोठी राजबिंडा इसम होतों.

त्यावेळचें माझें जीवन अगदीं साधें होतें. पहांटे चार वाजतां उठावें आणि रात्रौ नऊ वाजतां झोपावें, असा माझा देवाघरच्या पांखरासारखा निर्मळ आयुष्यक्रम होता. दोन्हीं वेळेला शाळेंत जावें, मधल्या वेळांत भाकरतुकडा हातानें करून खावा आणि उगीच पडावें, सकाळसंध्याकाळ मेहनत करावी असा माझा सरळसोट, धोपटमार्गी कार्यक्रम होता. जेव्हां जेव्हां वेळ मिळे तेव्हां तेव्हां गुरुचरित्र, शनिमहात्म्य, मारुतीस्तोत्र असलीं सोज्वळ पुस्तकें नाकाला लावून मी वाचत असें. यापलिकडे या जगांतलें एक अक्षरहि मला माहीत नव्हतें. आपण बरें आणि आपली नौकरी बरी, ही माझी त्यावेळची वृत्ति होती. त्यामुळें गांवांत माझ्याविषयीं आदर होता. एखादा सांथीचा रोग फैलावावा, त्याप्रमाणें माझ्याविषयीं सगळीकडे कौतुक फैलावलें होतें. त्या गांवच्या दृष्टीनें मी एक आदर्श पुरुष होतों.

एके दिवशीं संध्याकाळीं मी नेहमींप्रमाणें मारुतीस्तोत्र म्हणत बसलों होतों. समोर कंदिलाचा उजेड झगमगत होता. बाहेर अंधार पसरला होता.

---

*त्र्यंकूनं एक तरी प्रश्न असा विचारला कीं ज्याचं उत्तर मला देतां येत होतं!...*

---

रस्त्यावरची वर्दळ बंद झाली होती. वारा भणाभणा करीत वाहत होता आणि मी डोळे मिटून मारुतीस्तोत्र म्हणत होतों. मधूनमधून हात जोडून नमस्कार करीत होतों.

आणि मग एकदम बाहेरून हळी आली,

" मास्तर...मास्तर हायती का ? "

माझी खोली आडबाजूला होती. त्यामुळें सहसा माझ्या खोलीवर कोणी येत नसे. निदान अशा वेळीं तरी. त्यामुळें ती हांक ऐकू आल्यावर मी दचकलों आणि डोळे उघडून पाहिलें. म्हणालों,

" कोण आहे ? "

पण माझा प्रश्न पुरा व्हायच्या आंतच एक म्हातारा आंत आला. हातांतली काठी त्यानें खालीं ठेवली. उंचापुरा, दांडगा आणि काळाशार. ओठावर मिशांचा घोस. धोतर, कोटटोपी, हातांत सलकडीं, अंगठ्या असा थाट. काठी खालीं ठेवून तो मला म्हणाला,

" रामराम मास्तर. "

आणि तो भिंतीला टेकून खालीं बसला.

मी म्हणालों, " रामराम. "

यावर त्यानें थोडा वेळ दम घेतला. मग तोंडांतला थुंका बाहेर टाकून तो हंसला.

" मी यदू वडार. कंत्राटदार हाय मी. "

" बरं. "

" माझा पोरगा तुमच्या शाळेंतच हाय. तुमाला ठावं आसंलच कीं ? "



" नाहीं बुवा. कोण ? "

" व्यंकू "

" हं हं, आला लक्षांत. "

खरें म्हणजे लक्षांतबिक्षांत कांहींच आलें नव्हतें, पण कांहींतरी बोलायचें म्हणून ' हं हं ' केलें इतकेंच.

" त्यो आतां सातवीला हाय बगा. औंदा सुटला पायजे सातवींतनं. तवां तुम्ही त्येची शिकवनी घेता का, आसं इचारायला आलुया मी. "

" का बरं ? शिकवणी कशासाठीं लावताय् ? "

माझा हा प्रश्न ऐकल्यावर म्हातारा एकदम भडकला. आवाज चढवून मिशा हलवीत तो म्हणाला,

" अवो कार्टं लई उनाड हाय. अभ्यासाकडं काय सुदिक बगत न्हायी. दिवसरात्र गांवांत गटाळ्या घालत असतंय. सुधराल तर तुमीच सुधराल बगा त्येला. "

हें ऐकल्यावर माझा ऊर अभिमानानें भरून आला. एका उनाड मुलाला ताळ्यावर आणण्याची जबाबदारी माझ्यावर टाकलेली बघून माझ्या सद्वर्तनाबद्दल माझी स्वतःची खात्री पटली. हें काम मी करणें आवश्यक होतें. शाळेच्या दिवसांत कुठल्याहि मुलानें पुस्तकाला नाक लावून बसणेंच योग्य. हा पोरगा अभ्यासाकडे ढुंकून पहात नाहीं आणि दिवसभर उनाडक्या करतो ही अगदीं वाईट गोष्ट होती. छेः छेः ! माझ्या लहानपणीं मी असें बिलकूल केलें नव्हतें.

मी विचार करण्यांत गढलों हें बघून म्हातारा म्हणाला,

" मास्तर, तुमी पैक्याची काळजी करूं नगा. एवढं पोरगं सुधरा माजं. वंजळभर रुपये तुमच्या वटींत घालीन मी. मग तर झालं ? "

हें ऐकल्यावर तर त्याला सुधारण्याचा माझा निश्चय पक्का झाला. मी मान हलवून गंभीरपणानें म्हणालों,

" ठीक आहे. द्या त्याला पाठवून. "

अशा रीतीनें ही शिकवणी ठरली आणि व्यंकू रोज रात्रीं माझ्याकडे शिकवणीला येऊं लागला.

पहिल्या दिवशीं तो आला, तेव्हां त्याला बघून मी बराच निरुत्साही झालों. व्यंकू म्हणजे बाराचौदा वर्षांचें विनमिशाचें किडकिडीत पोरगें असेल असा माझा समज होता. पण हा गडी चांगला अठरा एकोणीस वर्षांचें असावा. काळाकुट्ट, आडव्या अंगाचा, नकट्या नाकाचा आणि जाड कातडीचा. वयाच्या मानानें त्याला मिशाहि भरपूर आल्या होत्या. तो एखाद्या बापई गड्यासारखा दिसे. त्याला बघून मी मनांत हबकलों. पण वरकरणी तसें कांहीं न दाखवितां मी त्याची शिकवणी सुरू केली आणि चांगलें वागण्यानें काय फायदे होतात, हें त्याला सविस्तर वर्णन करून सांगितलें. त्यानेंहि तें मुकाट्यानें ऐकून घेतलें. कुठेंही मला विरोध केला नाहीं. हें बघून मी खूष झालों. पहिल्यांदा तो आला तेव्हां चेहऱ्यावर नाखुषी घेऊनच आला होता. पण हळुहळू तो रुळला. रोज नेमानें येऊं लागला. माझ्याशीं खुल्या दिलानें बोलूं लागला.

एके दिवशीं शिकवणी चालू असतांना मी मध्येंच त्याला एक प्रश्न विचारला. पण मान खालीं घालून तो मुकाट्यानें बसला. काहीं बोलेचना. मीं पुन्हांपुन्हां विचारलें तरी बोलेना. शेवटीं मी रागावून म्हणालों,

" गाढवा, तुला तोंड आहे का नाहीं ? "

त्यानें मान हलवली आणि तोंडावर बोट ठेवून तें आहे असें स्पष्टपणें

मला दाखवलें. त्याचे दोन्ही गाल फुगले होते. मग काय खाऊन आला होता कोण जाणे !

"काय खाल्लंस रे ?"

यावर पुन्हां त्यानें मान हलवली. 'थोडं थांबा' असा हातानें इशारा केला आणि मग दारापाशीं जाऊन लालभडक पिचकारी बाहेर सोडली. मग आंत येऊन तो म्हणाला,

"केलं तोंड मोकळं मास्तर तुमी ? चांगला तंबाखूची गुळणी धरून बसलों मगाधरनं. असं पान जमलं होतं म्हणून सांगू, काय इचरूं नगा."

मी कुतुहलानें म्हणालों,

"म्हणजे पानतंबाखू खातोस काय तूं ?"

"होय मास्तर."

"किती वेळां खातोस ?"

"धापांच येळा खातों की."

"खाऊ नये तंबाखू लेका. वाईट असतं."

"काय वाईट हुतं मास्तर ?"

मला त्याच्या या प्रश्नाचें उत्तर देणें अवघड गेलें. कारण मीं स्वतः तंबाखूच काय पण पानहि फारसें खाल्लें नव्हतें. त्यामुळें त्याचा बरेवाईट-पणा मला माहीत नव्हता. तरी पण अवसान आणून मी म्हणालों,

"लेका, खाऊं नये म्हणजे खाऊं नये."

व्यंकूनें पुन्हां एकदां पिचकारी टाकली आणि मला म्हटलें,

"मी सांगू मास्तर—"

"काय ?"

"उलट तंबाखू खावी मानसानं, लई चांगलं असतं."

मीं कुतुहलानें पुन्हां विचारलें,

"असं ? तें कसं काय ?"

"अवं, देवानंच सांगून ठिवल्यालं हाय तंबाखू खावी म्हनून."

"काय सांगितलं आहे देवानं ?"

यावर व्यंकूनें मला जी कथा सांगितली ती मला अगदींच अपरिचित होती. त्याच्या सांगण्याचा सारांश असा होता कीं, तंबाखू ही फार उत्तम वनस्पति आहे आणि ती माणसानें हमेशा तोंडांत टाकावी, असा प्रत्यक्ष देवाचाच हुकूम आहे. विठोबानें कमरेवर हात ठेवून असें शुभ वर्तमान जगाला सांगितलें आहे कीं, ही वनस्पति फक्त कमरेएवढीच उंच असते. ती किती खावी असा प्रश्न विचारल्यावर मात्र त्यानें गणपतीकडे बोट दाखवलें. गणपतीनें एक हात पसरून व दुसऱ्या हातानें दोन बोटांची चिमूट सदैव धरलेली आहे. ती कशासाठीं ? या वनस्पतीचें पान हातभर रुंदीचें असतें आणि माणसानें ती चिमूटभरच तोंडांत टाकावी हेंच सांगण्यासाठीं. आणि नाहीं खाल्ली तर प्रत्यक्ष मारुतरायाचा कोप होतो. न खाणाऱ्या माणसाच्या मुस्कटांत लगावण्यासाठीं त्यानें एक हात जो उगारलेला आहे तो अद्यापि तसाच आहे.

व्यंकूनें सांगितलेली ही गोष्ट ऐकून माझा त्याच्याविषयींचा गैरसमज बराच दूर झाला. तो पानतंबाखू खातो हें योग्यच आहे असें मला वाटूं लागलें. फार काय, पण अशा दिव्य वनस्पतीची चव मींहि घेऊन बघावी असा त्यानें आग्रह केल्यानंतर मी विशेष विरोध केला नाहीं आणि एक काडी त्याच्या हातून घेऊन बेलाशक चावली. त्या एका काडीनेंच मला विलक्षण चमत्कार दाखविल्यामुळें माझी या औषधी वनस्पतीवर फारच भक्ति बसली. काडीच्या दोन काड्या, चिमूट असें करतांकरतां मी बकणाभर तंबाखू एका पानाला खाऊं लागलों आणि पिचदिशीं थुंकूं लागलों. हळू-हळूं दोन बोटें तोंडासमोर धरून, जागेवरून न उठतां लांबवर पिचकारी कशी टाकावी हेंहि व्यंकूनें मला शिकवलें. त्याचें त्या विषयांतलें अगाध ज्ञान पाहून मला त्याच्याविषयीं फारच कौतुक वाटूं लागलें.

एके दिवशीं रात्रीं आम्हीं दोघेहि असेच पानाचे तोबरे भरून पिच-काऱ्या टाकत बसलों होतों. शिकवणीला अद्याप सुरुवात व्हायची होती, दोघांचींहि तोंडें बंद झाल्यामुळें अभ्यासाचें काम थोडेंसे लांबणीवर पडलें होतें. पिचकारी टाकून थुंकल्यावर तोंड थोडा वेळ मोकळें होत असे. पण तेवढ्या वेळांत अभ्यास करणें जमण्यासारखें नव्हतें. म्हणून इकडल्या तिकडल्या गप्पा करीत होतों.

मग व्यंकू म्हणाला,

"मास्तर, आज जरा लवकर जातो बरं का मी."

व्यंकूचें तोंड मोकळें असलें तरी माझें नव्हतें. म्हणून मी कुत्र्यासारखें वर तोंड करून मुखरस सांभाळीत म्हणालों,

"कां रे, का ?

"आज कनं, नवाच्या ठोक्याला तमाशाचा फड उभा व्हायचा हाय भायेर. तकडं जावं म्हनतोय्."

गेले चारपांच दिवस गांवाबाहेरच्या बहिरोबाची जत्रा भरली आहे आणि तिथं नाना करमणुकी चालल्या आहेत हें मला माहीत होतें. कुठला तरी एक तमाशाचा फड आला आहे हेंहि माझ्या कानांवर होतें. पण तमाशा मी चुकून कधीं पाहिला नव्हता. तो बघण्यासारखा नसतो एवढेंच ज्ञान त्याच्याविषयीं मला होतें. त्यामुळें व्यंकूनें तमाशाला जातो

म्हणून सांगितल्यावर मला त्याच्याविषयीं काळजी वाटूं लागली. या पोराचें मन वळवलें पाहिजे, आणि त्याला सुधारलें पाहिजे असें मी ठरवलें. मग मी लांबलचक, पल्लेदार पिचकारी सोडून म्हणालों,

"छीः छीः! व्यंक्या गाढवा, तूं तमाशाला जाणार?"

व्यंकू मान हलवून गंभीरपणानें म्हणाला,

"होय मास्तर."

"तमाशा पूर्वी पाहिला आहेस का कधीं?"

"नेहमीं. एक बारी चुकवली नाहीं अजून म्यां."

व्यंकूचें हें बोलणें ऐकून मला धक्का बसला.

"काय म्हणतोस काय तूं?"

"आज आट वर्सं झालीं मास्तर. एक फड चुकला न्हायी."

असं म्हणून त्यानें दोन्हीं मांड्यांची ढोल्की करून त्या हाताच्या बोटानें वडवायला सुरुवात केली. तो पुढें एखादं मार्मिक गाणेंहि तोंडांतून बाहेर काढण्याच्या बेतांत होता. पण तेवढ्यांत मी दुःखाचा आवाज काढून म्हणालों,

"अरेरे...व्यंकू, काय हा तुझा अधःपात!"

"म्हणजे काय मास्तर?"

"अधःपात म्हणजे आपलं हें...बरं तें असूं दे. यापुढं तमाशाला जाणं बंद. समजलं?"

"कां बरं?"

"अरे, तमाशा फार वाईट असतो. चांगल्या माणसानं कधीं बघूं नये."

"कां बरं बगू ने? काय वाईट आसतं त्यांत?"

व्यंकूचा हा प्रश्न ऐकून माझी दांतखिळी बसली. त्याच्या त्या प्रश्नाचें उत्तर मला सांगतां येण्यासारखें नव्हतें. मी गप्प राहिलों हें बघितल्यावर त्याला इसाळ आला.

"मास्तर, तमाशासारखी फक्कलास गोष्ट न्हायीं दुनवेंत. माणूस नुसतं उलथंपालथं होतं बगितल्यावर."

"तें कसं काय?"

"तीच तर गंमत हाय. मेंढरासारकी मांनसं पळत्यात तकडं तें काय विनगाळक्याची आसत्यात काय? तिकटं बंद हुत्यात. बसाय जागा मिळत न्हायी. नुस्ती मानसं, मानसं, मानसं. उगी पेटल्यावानी दिसतं जकडं तकडं."

व्यंकूनें सांगितलेल्या या माहितीमुळें मला बरेंच आश्चर्य वाटलें. तमाशा हा फार चावट प्रकार असल्यामुळें लोक तिकडे बिलकूल फिरकत नसतील, अशी माझी कल्पना होती. तमासगिरांना कुणी दाराशींहि उभे करत नसतील असें मला वाटत होतें. आणि हा तर सगळें उलटें सांगत होता. एकूण या विषयांतलेंहि माझें ज्ञान चुकीचें होतें काय?

व्यंकू म्हणाला,

"मास्तर, तुमी एकदा बगाच तमाशा. उगं आपली गंमत म्हनून एकदा बगा. आज तर चौरंगी सामना हाय. हूं जाऊं द्या. बगा अन् मग सांगा, चांगला का वाईट त्यें!"

व्यंकूचें हें सरळ बोलणें मला एकदम पटलें. कुणालाहि पटावें असेंच

त्याचें बोलणें होतें. कुठलीहि गोष्ट स्वतः पाहिल्याशिवाय तिच्यासंबंधीं बोलूं नये, हें त्याचें म्हणणें अगदीं योग्य होतें. आपण बघून ठरवावें हें चांगलें. इतकीं माणसें बेधडक तिथें जात असतील तीं काय गाढव म्हणून ! छेः छेः ! माझ्या समजुतींत मुळांतच कांहींतरी चूक असावी.

माझ्यासारख्या भिडस्त माणसाच्या मनांत असे विचार आले आणि तमाशाला जाण्यावांचून आपल्याला गत्यंतर नाहीं असें मी ठरवलें. इतकें झाल्यावर आतां मी नाहीं म्हणायचें हें बरें नव्हतें. अशानें त्याला फार वाईट वाटलें असतें. त्यापेक्षां जावें हें उत्तम. निदान त्याचें तरी समाधान होईल.

मी कोटटोपी घातली आणि म्हणालों,

"चल. तूं आतां म्हणतोच आहेस एवढं तर चल. तुझं तरी समाधान होऊं दे."

पाटीदप्तर टाकून व्यंकू ताडकन् उठला. धोतर नीट खोंवत मला म्हणाला,

"भले मास्तर ! अशी, इरेसरी पायजे. धापैकी धा मार्क तुमाला"

"पण मला समजेल ना सगळं? पहिल्यांदाच येतों आहे म्हणून विचारतों."

"तुमी चला तर खरं."

असं म्हणून त्यानें एक डोळा मिचकावला, तेव्हां मला फारच गंमत वाटली. मग मी त्याला दोन डोळे मिचकावून दाखवले. उगी आपलें गंमतीनें. आणि आम्हीं लगबगीनें बाहेर पडलों.

तो म्हणाला तें कांहीं खोटें नव्हतें. कनातींत ही गर्दी उसळली होती. माणसाच्या अंगावर माणूस नुसतें पडत होतें. बंदुकींत दारू ठांसून भरावी त्याप्रमाणें माणसें ठांसून भरलीं होतीं. कोंगाड्यासारखा कल्कलाट चालला होता. पण कार्यक्रम सुरू झाल्याबरोबर कसें गपगार झालें. आम्हीं दाटीवाटींत कसेतरी जाऊन दोन पायावर बसलों होतों. पायाला अशी रग लागूं लागली कीं फार वेळ बसवेल असें वाटेना. पण गणगौळण संपली आणि मागून इतक्या गंमतीदार गोष्टी घडूं लागल्या कीं पार सगळें विसरून गेलों. झकपक पोषाख केलेल्या तरुण बायका, पोरी अशा नखऱ्यानें बोलत होत्या. आणि नाचत होत्या म्हणतां ! कांहीं विचारूं नका. तो सोंगाड्या असलेला माणूस मधेमधें त्यांच्याजवळ जाऊन असें कांहीं मजेदार चावट बोलत होता कीं, मला वाक्यावाक्याला गुदगुल्या होत होत्या, हंसू कोसळत होतें. मध्येंच हातवारे करून तो कांहींतरी चमत्कारिक अभिनय करीत होता. त्यावेळीं त्या बायका अन् लोक भयंकर हंसायचे. मला कांहीं त्या अभिनयाचा अर्थ कळला नाहीं. पण त्यामुळें अंगाला कांहींतरी गुदगुल्या होतात एवढें मात्र पक्कें ध्यानांत आलें. शिवाय व्यंकू अधूनमधून माझ्या कानांत कुजबुजत होता आणि माहिती सांगत होता; "ही कोपरगांवकरीन, ही जुन्नरकरीन. अलिकडं हिची बाडी लई स्ट्रांग झालीय. पण पयल्यांदा अशी नव्हती. ही पुनेकरीन. हा तासगांवचा सोंगाड्या येशवंता. समद्या सोंगाड्यांत बेनं हाय–" असली उपयुक्त माहितीहि पुरवत होता. त्यामुळें तर हा कार्यक्रम एकंदरींत मला फारच सुरस वाटला. त्या बायका नाचत असतांना मध्येंच डोळ्यांची मजेदार हालचाल करीत, तेव्हां लोक हल्कल्लोळ करीत, शिट्ट्या वाजवीत. व्यंकू तर लेकाचा पहिल्यापासून एकसारखा शिट्ट्या ठोकत होता. मला त्याचा त्यावेळीं फारच हेवा वाटला.

हा सगळा कार्यक्रम पहात असतांना मी स्वतःला पार विसरून गेलों होतों. धुंदीच्या समुद्रांत बुडाल्यासारखें वाटत होतें आणि त्या बुडण्यांतच कसलें तरी अपार सुख वाटत होतें. शेवटीं एकदोन वाजतां सगळें संपलें. दुखऱ्या पायांनीं मी घराकडे परत आलों आणि अंथरुण टाकून पडलों, तरी माझ्या डोळ्यासमोरून तीं रंगदार दृश्यें हालत नव्हतीं. मनांत नाना विचार येत होते. खरोखर लोक उगीचच एखाद्या गोष्टीला नांवें ठेवतात. आतां या तमाशांत वाईट काय होतें ? चांगल्या सुरेख सुरेख बायका येतात, गाणीं म्हणून आपली करमणूक करतात, नाचतात. आणखी कांहीं कांहीं करतात. अंगावर कांटा उभा राहील असें कांहीं कांहीं बोलतात. त्यांतलें सगळेंच कांहीं समजत नाहीं म्हणा. पण त्यांत वाईट काय होतें ?...

या अशा विचारांतच मी पुढची रात्र आणि दिवस घालवला आणि मग पुढें चारदोन दिवस व्यंकूशीं याच विषयावर गंभीरपणें चर्चा केली. तमाशा मी पाहिला ही गोष्ट खरी. पण त्यांतल्या अनेक गोष्टी आणि अनेक बोलणीं मला नीटशीं समजलीं नव्हतीं. त्यामुळें त्या शंकांचें त्याच्याकडून निरसन करून घेणें हें मला आवश्यक वाटलें. या सगळ्या चर्चेचा निष्कर्ष इतकाच निघाला कीं, करमणुकीच्या या प्रकारांत नव्या माणसाला न समजणाऱ्या गोष्टी पुष्कळ असतात. त्यांचा अर्थ शब्दांनीं समजावून घेतां येत नाहीं. त्यासाठीं पुन्हां पुन्हां तिकडे वळणें हाच एकमेव तोडगा होय. चर्चेचा निर्णय अशा रीतीनें लागल्यामुळें व तमाशाच्या फडाचा मुक्कामहि थोडाच उरल्यामुळें मला रोज रात्रीं कनातींत हजेरी देणें भागच पडलें. रात्ररात्र जागून न कळणाऱ्या गोष्टींचे अर्थ लावत बसावें लागलें. हें करतां यावें म्हणून मला सकाळ संध्याकाळची मेहनत बुडवावी लागली. शरीराचा बांधेसूदपणा गमवावा लागला.

गुरुचरित्र आणि मारुतीस्तोत्र ही उत्तम पुस्तकें पेटींत कुलूप घालून ठेवावीं लागलीं आणि आणखी बऱ्याच गोष्टी कराव्या लागल्या! सुदैव एवढेंच कीं, माझ्या या कार्यक्रमांत व्यंकू सदैव माझ्याबरोबर राहिला. त्यानें वेळोवेळीं मला संदर्भासहित स्पष्टीकरण करून सांगितलें आणि मला बहुमोल मदत केली. त्यामुळें माझें या विषयांतलें अज्ञान हळुहळू नाहींसें होऊं लागलें. माझ्या सरळसोट डोक्यांत प्रकाश पडूं लागला आणि उत्तरोत्तर मी ज्ञानी पुरुष बनत चाललों.

एके दिवशीं रात्रीं 'कोपरगांवकरीन, जुन्नरकरीन' इत्यादि बहुमोल विषयांवरील चर्चा नेहमींप्रमाणें बराच वेळ करून माझा हा गुणी विद्यार्थी निघून गेला होता आणि मी डोळे मिटून लावणीची एक ओळ गुणगुणत अंथरुणावर लोळत पडलों होतों. कंदिलाचा बारीक केलेला प्रकाश खोलींत अंधुकपणें पसरला होता. उजेडाची एक लहानशी तिरीप माझ्या डोळ्यावर येत होती. बाहेर काळाकुट्ट अंधार पडला होता आणि मी फार अस्वस्थ झालों होतों. कधीं या कुशीवर वळावें, कधीं त्या कुशीवर वळावें, असा सारख्या चाळा करीत होतों. झोंप कशी ती लागतच नव्हती. डोक्यांत नाना विचार येत होते. हे विचार कसले होते हेंहि नीटसें समजत नव्हतें आणि उगीचच कांहींतरी चमत्कारिक वाटत होतें. खोलींतला एकटेपणा खायला उठत होता. डोकें चढल्यासारखें झालें होतें. फार म्हणजे फारच चमत्कारिक वाटत होतें.

तेवढ्यांत दारावर बाहेरून कुणीतरी खडखड केलें.

मी दचकून उठून बसलों. डोळे बारीक करून अदमास घेतला. मग म्हणालों, "कोण आहे?"

बाहेरून मंजुळ आवाजांत कुणीतरी म्हणालें,

"मी हाय. इंद्रा."

कंदिलाची वात मोठी करून मी दार उघडलें. दिव्याच्या उजेडांत न्याहाळून बघितलें.

दाराच्या एका अंगाला एक तरणीबांड, धिप्पाड बाई उभी होती. गोरीपान. अगदीं हळदीच्या रंगासारखी. उफाड्याच्या अंगाची आणि उगीचच भिरीभिरी नजर फिरवणारी.

मला दरदरून घाम सुटला, भीति वाटली, आणि आणखीहि कांहींतरी वाटलें. या अपरात्रीं, अशा वेळेला या मोहनेचें माझ्याकडे काय काम असावें बरें?

कांपत कांपत मी विचारलें, "कोण पाहिजे?"

निऱ्याचा घोळ झोकांत उचलून खणखणीत आवाजांत ती म्हणाली, "मालक हायती का आमचं आंत?"

मी माझ्याच खोलींत मागें वळून पाहिलें. अगदीं निरखून पाहिलें. पण मालकच काय कुणी नौकरहि माझ्या खोलींत दिसत नव्हता. माझ्या खोलींत त्या एकट्या पोराखेरीज दुसरें कोणी येऊनहि गेलें नव्हतें. मग हिचा मालक कोण असावा?

"कोण मालक?"

यावर ती बाई खुदूकद हंसली. अशी हंसली कीं माझ्या काळजाचें पाणी पाणी झालें.

मानेला झटका देत देत ती म्हणाली,

"आमचं मालक तुमच्याकडेच येत्यात नव्हं?"

"नाहीं बुवा."

"आं? त्ये तर म्हनत होतं—"

"काय?"

"तुमच्याकडं शिकवनीला जात असतो म्हणून."

मी जागच्या जागींच खिळून उभा राहिलों. म्हणजे बाई व्यंकूबद्दल तर बोलत नव्हती?

"कोण? व्यंकू काय?"

"व्हय त्येच." ती बाई तोंडाचे वेडेवांकडे हावभाव करीत म्हणाली. बहुधा यालाच मुरका म्हणत असावेत! व्यंकूनें मला त्याचीं लक्षणें एकदां सांगितलीं होतीं. मला बरोबर आठवलें.

"बरं बरं, त्याचं काय?"

"अवं, रोज ह्या टायमाला घराकडं येत्यात अन् आजच आलं न्हायींत. म्हून पुसाया आले मी."

"आसं आसं."

"मंग?.. गेलं काय त्ये?"

"मघाशींच गेला तो. पुष्कळ वेळ झाला."

"कुटं बसलाय् मुडदा मधीच कुनास ठाऊक."

असं म्हणून त्या बाईनें भुंवया उडवल्या, थोडा वेळ विचार केला आणि मग पायाचा झपाटा मारला. दाणदाण पावलें वाजवीत ती त्या अंधारांत नाहींशी झाली.

त्यानंतर दिवसभर मला दुसरें कांहीं सुचलें नाहीं. ही बाई कोण असेल? तिनं व्यंकूची चौकशी कशाला केली असावी?

रात्रीं व्यंकू शिकवणीला आला. मी घोगऱ्या आवाजांत विचारलें,

"व्यंकू—"

"काय?"

"काल कुठली बाई आली होती रे चौकशी करायला तुझी?"

व्यंकू दचकून म्हणाला,

"बाई? आन् कधीं?"

---



## साहित्यिकाचें आत्मचरित्र!

### (मी कसा झालों?)

*विद्या नाहीं जमली, लुडचांचे वळ मात्र राहिले*
*विड्याहि वळणें मला जमेना — हात हाय आंबले!*
*नाहीं हुन्नर, कला कोठली! जिणें मम नालायक ठरलें!*
*...वैतागानें लेखक बनलों — अहाहा लेखन मम गाजलें!*






स्वातंत्र्य प्राप्तीची आंस घरणाऱ्या झांशीच्या राणीप्रमाणें आमच्या हितचिंतकांच्या सहकार्यानें आम्हींदेखील विकासयोजनेची आंस धरून आमचा घोडा तटावरून फेंकीत आहोंत. दिल्लीच्या लोकसभेचे एम्. पीज्. कॅन्टिन ही पूना गेस्ट हाऊसचींच शाखा आहे. आमच्या उत्कर्षाला कारणीभूत असलेल्या भारतीयांना आमचे सादर प्रणाम. हीच आमची सेवा आणि ह्राच आमचा धर्म। जय हिंद।

TOM & BAY LTD.

# पूना गेस्ट हाऊस




गणपतीचौक \\ लक्ष्मीरोड, पुणे २






"फाजीलपणा करूं नकोस. काल रात्रीं इथं आली होती ती."

"काय म्हणत होती?"

"तुझी चौकशी करीत होती. तूं कुठं गेलास म्हणून विचारलं तिनं."

"च्या बायलीला. हितं येऊन कशाला धरपडली आनखीन्?"

व्यंकू असें म्हणाला खरें; पण मग त्यानें हातभर जीभ बाहेर काढून ती चावली आणि मान खालीं घातली. त्याच्या त्या मर्यादशील स्वभावाचें मला फारच कौतुक वाटलें.

"कोण होती रे ती?"

पण माझ्या त्या गरीब विद्यार्थ्याकडून कांहींच उत्तर आलें नाहीं.

मी पुन्हां विचारलें, "तुझी बायको होती का ती?"

व्यंकूनें मान हलवून नाहीं म्हणून सांगितलें. म्हणाला, "माजं लगीनच झालेलं न्हायी मास्तर अजून. असं कसं इचारताया तुमी तरी?"

"मग?"

मी जेंव्हां त्याचा पिच्छाच पुरवला तेव्हां तो मान खालीं घालून बराच वेळ गप्प बसला. मग घुटमळत, चांचरत म्हणाला,

"ती बाई म्हंजे बगा मास्तर—"

"हं."

"मास्तर, ती बगा—"

"हं."

"ती मास्तर बगा—"

मी संतापून म्हणालों, "मास्तरनं बघितली कालच. गाढवा, पुढं बोल."

"ती बाई—"

"हं."

"मी—ठेवल्याली हाय मास्तर."

"तूं?"

"व्हय."

व्यंकूनें दिलेल्या या उत्तरामुळें माझ्या मनावर बराच ताण पडला. त्याच्या बोलण्याचा अर्थ समजून घ्यायला मला बराच वेळ लागला. सभोंवतीं काय चाललें आहे हें थोडा वेळ मुळींच कळलें नाहीं. मग भानावर येऊन मी उठून बसलों. त्याच्याकडे टक लावून पहात राहिलों. घसा खांकरून आश्चर्यानें म्हणालों,

"व्यंकू, गड्या हें तूं जमवलेंस तरी कसं?"

माझ्यापुढें या गोष्टीची कबुली देतांना व्यंकू पहिल्यांदा थोडासा बिचकला होता. पण मी इतक्या जव्हाळ्यानें हा प्रश्न विचारला कीं, तो खुलला आणि तोंडांतली तंबाखू संभाळीत त्यानें सगळी कथा मला सांगितली. ही कथा बरीच लांबलचक होती. पण तिचें तात्पर्य इतकेंच होतें कीं, ही बाई परजातींतली असून त्याच्या जातींत अलिकडेच शिरलेली होती. तिलाहि विचारायला कुणी नव्हतं आणि व्यंकूलाहि दुसरं कुणी नव्हतें. दुष्काळाच्या कामाच्यावेळीं ती व्यंकूच्या बापाकडे कंत्राटांत कामाला होती आणि तेव्हांपासून व्यंकूनें त्या भल्या बाईला आश्रय दिला होता. गेल्या वर्षदीडवर्षापासून व्यंकूचें तिच्याकडे खातें होतें. अगदीं स्वतंत्र खातें होतें.

ही सर्व हकीकत मी मनःपूर्वक आणि लक्ष देऊन ऐकली. आणि मग





अनुक्रमणिका

माझें अंतःकरण भरून आलें. आपल्या विद्यार्थ्यानें एवढा मोठा पराक्रम करावा आणि आपल्याला त्याची दखलहि असूं नये, याची मला फार खंत वाटली. मघाशीं एकटा असतांना मला जसें अगदीं चमत्कारिक वाटत होतें, तसें कांहीं तरी चमत्कारिक पुन्हां व्हायला लागलें.

पण दुसऱ्याच क्षणीं मला माझें कर्तव्य आठवलें. या उनाड मुलाला सुधारायचें आणि सन्मार्गावर आणून सोडायचें ही मी घेतलेली जबाबदारी मला हळुहळू आठवूं लागली आणि मी सांवरून बसलों. पूर्वीचा अनुभव माझ्या जमेला होता. सरळ उपदेश करून त्याचें मन वळवणें ही गोष्ट जमण्यासारखी नव्हती. मी कांहींहि सांगितलें तरी हा जिज्ञासु विद्यार्थी मला उलटे प्रश्न विचारणार आणि त्या प्रश्नांचें उत्तर आपल्याला या जन्मांतहि देतां येणार नाहीं. मग काय करावें बरें ?...

मनाशीं मी अशा बराच वेळ विचार केला. तोपर्यंत व्यंकूचें दोनतीनदां पान खाऊन झालें. मीहि त्याच्याकडून पान मागून घेतलें आणि तंबाखू तोंडांत टाकून ती दाढेला धरीत म्हणालों,

"व्यंक्या— "

"काय मास्तर ?"

"याचे तोडगे तरी काय असतात मला सांग !"

"कशाचे ?"

"या गोष्टी जमवायचे."

माझा हा प्रश्न ऐकल्यावर त्या ज्ञानी विद्यार्थ्यानें माझ्याकडे क्षणभर टक लावून पाहिलं. त्याच्या दृष्टींत थोडीशी संशयाची छटा असावी. पण माझा चेहरा तपस्व्यासारखा गंभीर होता. तें पाहून तो शांत झाला. म्हणाला,

"तुमाला ते कशापायी पायजेत ?"

"उगीच आपलं, सहज."

"मग सांगतों."

"सांग."

"अगदी कंप्लेट सांगतो मास्तर,"

असं म्हणून व्यंकूनें घट्ट मांडी घातली आणि पान थुंकून टाकून तोंड मोकळें केलें. मग एक तासभर अस्खलितपणें तो बोलत राहिला. आपले सगळे अनुभव आणि ठोकताळे त्यानें सांगितले. त्याच्या त्या बोलण्यावरून मला एवढें कळलें कीं, या मोहिमेवर निघणारा माणूस घट्ट काळजाचा आणि बेरकी असणें अगत्याचें असतें. प्रसंगीं जोडेपट्टी व्हायची पाळी आली तरी ती पचवण्याची त्याच्यांत ताकद पाहिजे. सुरुवातीला चार चांगलीं ठिकाणें हेरून तेथें अष्टौप्रहार गस्त घालण्याचें काम त्यानें अत्यंत चिकाटीनें आणि निरलसपणें केलें पाहिजे. या प्रकारच्या बायका रस्त्यानें ठुमकत चालतात, तिरप्या नजरा टाकीत फिरतात आणि उगीचच खुदकन हंसतात. अशा बाईचा शोध लावणें हें पहिलें काम. त्यानंतर त्यांच्या घराचा ठावठिकाणा लावणें, तिथं डोळ्यांत तेल घालून पहारा करणें, त्यांच्या जाण्यायेण्याचीं ठिकाणें पाहून ठेवणें, या गोष्टी बेताबेतानें सुरू कराव्या लागतात. मग हळुहळू जमूं लागतें. हें सगळें पथ्य नियमितपणें पाळावें लागतें. वेळप्रसंगीं चार पैसेहि खर्च करावे लागतात. हे प्रकार एकदां पार पडले म्हणजे संपलें. तुमचें काम झालें. पण हें काम एकंदरींत फार कष्टाचें आणि जिकिरीचें असतें. एखाद्या शिकाऱ्यासारखी तुमची दृष्टि शोधक आणि सावध असावी लागते. गैदीपणा किंवा घाबरटपणा दाखवून आलेली संधि दवडणें, हें या शास्त्रांत फार मोठें पातक समजलें जातें. इतकेंहि करून जमलें नाहींच तर सुखदुःख समान मानून स्थिरपणानें दुसरीकडे मोहरा वळवावा लागतो.

व्यंकूनें सांगितलेली ही माहिती ऐकून मी तोंडांत बोट घालण्याच्या बेतांत होतों. पण तोंड पानानें भरलेलें असल्यामुळें मला तसें करतां आलें नाहीं. तथापि एवढी गोष्ट खरी कीं, या लहानशा आयुष्यांत माझ्या या विद्यार्थ्यानें फारच बहुमोल अनुभव गोळा केले होते. त्याची किंमत कशानेंहि करतां येण्यासारखी नव्हती.

प्रश्न विचारला त्या वेळीं माझ्या अंगांत बराच उत्साह होता. पण ही सगळी माहिती ऐकल्यानंतर मला थोडासा घाम आला. चेहरा हतारा करून मी म्हणालों, "गड्या, हें तूं मला उगीच सांगितलंस."

"का बरं मास्तर?"

"मला या माहितीचा काय उपयोग?"

"का न्हायी?"

"मला हें सगळं जमेल असं वाटत नाहीं."

हें ऐकून व्यंकूचा चेहरा उजळला.

"मास्तर, हें अवघड शास्त्र हाय. पन तुमी कच खायाचं काम न्हायी. तुमी टैट रहा. तुमालावी जमल. केलं म्हंजे होतं."

आतां मी त्याच्या कलानेंच घ्यायचें ठरवलें. म्हणून आनंदित मुद्रेनें म्हणालों, "खरं म्हणतोस?"

"अगदीं खरं. आईच्यान् खरं."

"ठीक."

"असल्या बाया मास्तर, अजंट वळखूं येत्यात."

"तें एक बरंच हाय म्हणायचं."

"आतां तुमी मास्तर पयल्यांदा असं करा--"

"कसं?"

"अं...तुमाला शिट्टी घालता येती का?"

मी शरमून म्हणालों, "नाहीं बुवा."

"अरारारारा....."

"काय झालं?" मी घाबरून म्हणालों, "शिट्टी वाजवायला आलीच पाहिजे म्हणतोस?"

"तर!...अवो, त्याच्याशिवाय फुडं एक पाऊल टाकाया यायचं न्हायी तुमाला. दर ठिकानी त्याची जरवर लागनार. घरापाशीं लागनार, देवळापाशीं लागनार. वड्यांत लागनार—"

हें शीळ-प्रकरण एकूण महत्त्वाचें होतें. व्याकरण आल्याशिवाय जशी भाषा नीट येत नाहीं, तसेंहि हें होतें म्हणायचें! आधीं शुद्धलेखन, मग लेखन हें शाळेंतलें तत्त्व मला आठवलें आणि व्यंकूचें म्हणणें मला पटलें.

मग मी म्हणालों,

"खरी गोष्ट, पण त्यावांचून अडून कसं चालेल? नुसतं बाजारांतली शिट्टी आणून वाजवली तर चालेल कां?"

"छट्...त्यानं काय हुनार?"

"माझी स्काऊटची शिट्टी आहे, छान वाजते. ती आणूं का?"

माझ्या या बोलण्यावर व्यंकूनें मान हलवून निषेध व्यक्त केला. तेव्हां मी गप्प बसलों. तोहि गप्प बसला. मनाशीं विचार करीत राहिला. मग पाटीदप्तर उचलून म्हणाला,

"उद्यांपासून पयल्यांदा हे काम शिकायचं मास्तर. मग फुडचं फुडं."

आणि निघून गेला.

त्यानंतर पुढच्या चारआठ दिवसांत आमचा हा कार्यक्रम रोज चालला. गांवाबाहेर माळावर जाऊन आम्हीं दोघेहि शिट्ट्या वाजवीत बसूं लागलों. दोन्हीं हाताचीं दोन बोटें जिभेला लावून आणि जीभ आंत वळवून मी तोंडाला फेंस येईपर्यंत शिट्टी वाजवत राहिलों. दहापंधरा दिवसांतच माझ्या मुखांतून कर्णकर्कश आवाज बाहेर पडूं लागला आणि त्यामुळें आसपासचें सगळें वातावरण दुमदुमून जाऊं लागलें. अहोरात्र मला शिट्टी वाजवण्याचा नाद जडला. त्या काळांत झोंपेंतसुद्धां मी शिट्टी घालत होतों असें मला आढळून येऊं लागलें. कारण सकाळीं मी जागा होई तेव्हां माझीं दोन्ही हाताचीं बोटें तोंडांत खुपसलेलीं दिसत. फार काय, शाळेंतहि मी एकदां शिट्टी वाजवून दाखवली. तेव्हां पोरांनीं शाळा डोक्यावर घेतली. खुद्द व्यंकूनें मला शाबासकी दिली.

अशा रीतीनें त्याच्या देखरेखीखालीं या शास्त्रांतलें शुद्धलेखन मी शिकलों. पहिला धडा पूर्ण झाला. दुसऱ्या धड्याची वाट पाहूं लागलों.

पण पुढचे धडे व्यंकूकडून घेण्याचा माझ्यावर प्रसंगच आला नाहीं.

एके दिवशीं नेहमींप्रमाणें तो माझ्याकडे आला नाहीं. आणि मग दोन दिवस, चार दिवस, आठवडा लोटला तरीहि तो आला नाहीं.

मी चौकशी केली तेव्हां कळलें कीं, एकाएकीं बोलावणें आल्यामुळें तो आजोळीं गेला आहे. परत कधीं येईल याची निश्चिती नाहीं.

महिना दीडमहिना लोटला आणि तरीहि तो आला नाहीं.

या दीड महिन्यांत माझी पुष्कळच प्रगति झाली. पान-तंबाखू खाऊन लावणीची ओळ गुणगुणत मी काम करायला शिकलों. गुरुचरित्र, शनिमाहात्म्य हीं भाकड पुस्तकें अडगळींत टाकून देऊन मी 'तोतामैना' 'गुलबकावली'' 'शुकबहात्तरी' हीं गंमतीदार पुस्तकें नियमानें वाचूं लागलों. तोंडांतली लाळ पुसतपुसत आणि वरचेवर जीभ बाहेर काढीत वाचूं लागलों. फार काय सांगावं, कुणाचीहि भीति न बाळगतां तमाशाच्या कनातींत एकट्यानं जाऊन उभा राहूं लागलों. मोठ्या आरडाओरडा करीत हंसूं लागलों. कांहींकांहीं वेळा तर बेदरकारपणें मी तोंडांत बोटें खुपसून कानठळ्या बसवणाऱ्या शिट्याहि फुंकल्या. एकंदरींत माझ्यांत फारच सुधारणा झाली.

आणि मग एके दिवशीं रात्रीं अचानकपणें व्यंकू खोलीवर आला. फार दिवसांनीं माझा हा गुणी विद्यार्थी परत आला.

त्याच्या हातांत पाटीदप्तर नव्हतें. कपडेहि झकपक नव्हते. चेहराहि सुकला होता. उदास चेहरा करून तो भिंतीला टेकून बसला. कांहीं न बोलतां बसला.

त्याला बघून माझा आनंद गगनांत मावेना. तो गेल्यापासून मी काय प्रगति केली होती हें मला त्याला सांगावयाचें होतें. पण त्याची दुःखी मुद्रा पाहून माझी थोडीशी निराशा झाली. मीहि गप्प बसलों.

असा थोडा वेळ गेला.





मग मी विचारलें,

"व्यंकू, कुठं रे होतास इतके दिवस?"

मान वर न उचलतां तो म्हणाला,

"मामाच्या गांवीं गेलतो."

"कशाला?"

"मामा आजारी होता."

"मग मेला काय?"

"त्याला काय धाड झालीया मरायला? हाय बरा. पण मला सोडता सोडीना."

"मग लेका, चेहरा का तुझा असा सुतकी?"

माझ्या या प्रश्नाला उत्तर म्हणून त्यानें एक लांबलचक शिवी दिली.

मी रागावलों. त्याच्याहिपेक्षां मोठी आणि मार्मिक शिवी देऊन म्हणालों,

"गाढवा, मला शिवी देतोस?"

"तुमाला न्हायी हो मास्तर."

"मग?"

"त्या बायली, त्या बाईला हो आमच्या!"

"का बरं?"

"मास्तर,...आज बगा इकत्या दिसानी मी तिच्याकडं गेलो, बसलो. पन एक अक्षर बोलली न्हायी. मी तापलों तर मूला गुरकावून बोलली. शेवटाला तर मला घराबायेर काढलं तिनं. कशी बायलीची जात हाय बगा."

व्यंकूचं हें बोलणें ऐकून माझे अष्ट सात्त्विक भाव जागृत झाले. उचंबळून येऊन मी म्हणालों,

"हा नादच वाईट. आतां पटलं का तुला?"

व्यंकू कांहीं बोलला नाहीं. गप्प राहिला. बराच वेळ शांतता पसरली. मग तो म्हणाला,

"पण मास्तर, तिनं आसं कशापायी केलं आसंल?"

त्याला उत्तर देण्यासाठीं मी घटकाभर थांबलों. शेवटीं एक तरी प्रश्न व्यंकूनें असा विचारला होता कीं ज्याचें उत्तर मला देतां येण्यासारखें होतें! मग माझे सगळे सात्त्विक भाव जिरून गेले. छाती अभिमानानें फुलली. मान आपोआप ताठ झाली. मग अत्यंत सावकाशपणें मी म्हणालों,

"ती हल्लीं माझ्याकडे असते."

• • •











—अरविंद गोखले

तीन दिवस आणि तीन रात्री एकसारखा मुसळधार पाऊस पडत होता. विमानांच्या ताफ्यांनीं बॉम्बफेक करीत राहावें, तसा कुठल्याशा अनामिक नक्षत्रानें ढगांचा भडीमार शहरावर चालवला होता. सगळीकडे ओलें नि अंधेरे झालें होतें. पिसाटलेल्या नदीचे लाल लोट किनाऱ्यावरच्या कोसळणाऱ्या घरांतून शिरत होते. गुडघागुडघा पाणी सांचल्यानें सगळे रस्ते रोखले गेले होते. सारे व्यवहार थिजले होते. रेल्वेमार्ग वाहून गेला होता व इतर सर्व वाहनें बंद पडलीं होतीं. कोर्टकचेऱ्या, कॉलेजशाळा, चित्रपटगृहें व उपहारगृहें ओसाडलीं होतीं. जो तो आपापल्या घरीं शेकोटीशीं अगर रेडिओशीं बसून वेळ काढीत होता...घड्याळें चालूच राहिलीं. पण पाऊस कांहीं थांबेना. सारखीं गाणीं ऐकून, गप्पा मारून, पुस्तकें वाचून, पत्ते कुटून, चहाचे कप रिचवून किंवा अंथरुणांत उगाचच लोळून लोक अखेर कंटाळून गेले. अंग आंबल्यानें व सर्दी सुरूं झाल्यानें हैराण झाले. सुन्नपणें छपरांतून आंत येऊं पहाणारा व बाहेर थैमान घालणारा पाऊस पहात राहिले, तळपता सूर्यप्रकाश, पंख पसरलेले पांखरांचे थवे, वेगानें धांवणारीं वाहनें आणि दूरावलेल्या प्रिय व्यक्तींच्या गांठीभेटी—ह्या सर्वांसाठीं अधीर झाले.

शुभा अशीच आपल्या घरांत अडकून पडली होती. सोमवारीं दुपारीं ती कॉलेजमधून परतली, तों आतां गुरुवार उजाडला. तरी बाहेर जाऊं शकली नाहीं. कॉलेजविश्वांत पाऊल टाकून तिला महिना दीड महिना होत आला होता; पण तिचें मन अजून शाळेच्या अल्लड आवारांतच अडकून पडलें होतें. वयाच्या मानानें गंभीर व विचारी असूनही कॉलेजच्या परीटघडी आयुष्याशीं ती एकरूप झाली नव्हती. शाळा म्हटली कीं दंगा, चिंचा, बाई, तिच्यापुढें उभ्या राहात; तर कॉलेजांत जायचें म्हणजे कोका कोलाचें कडू पाणी पिवळ्या नळींतून पिण्यासारखें तिला वाटे. म्हणून पाऊस कोसळणारसें पहातांच ती लेडीजरूम्‌मधून निघाली. रस्त्यानें भिजत जाण्यांत केवढें तरी सुख मिळणार होतें! शुभाला वाटलें कीं पूर्वेकडचें इन्द्रधनुष्य नि कॉलेजबागेंतली वेगनवेल पावसांत ओलीचिंब होणार तर आपणही भिजायला हवें. हंसत, शहारत ती जलधारांच्या वर्षावांतून निघाली. कॉलेज मार्गाच्या वळणावर दिलीपचें वाचनालय होतें. दिलीप तिचा बाळमित्र होता. मित्राहून जास्त, जवळचा होता! शुभाला भिजत जातांना पहातांच तो छत्री घेऊन धांवला. पण शुभानें त्याला माघारीं लोटलें. तिला छत्री नको होती नि दिलीपचा ह्या क्षणीं सहवासही नको होता. पावसांत भिजण्यानें जें एक आगळें, अवर्णनीय सुख वयांत आलेल्या मुलींना मिळतें तें तिला लुटायचें होतें.

घरीं गेल्यावर कोरडे नि गरम कपडे घालून व चहाचे घुटके घेत शुभानें संध्याकाळ दवडली. आईच्या, रेडियोच्या, 'पण लक्षांत कोण

*एक चुरगळलेला कागदाचा चिटोरा! पण त्यानं त्या भावड्या मुलीच्या आयुष्यांत केवढी उलथापालथ केली!—*



अनुक्रमणिका

घेतो ’च्यो उबेंत! मग मात्र वडील कचेरींतून आले नाहींत म्हणून हवालदील होत ती आंतबाहेर करूं लागली. वडिलांना ती दादू म्हणे. आणि देव मानी! दादूंइतका श्रेष्ठ माणूस जगांत नाहीं अशी तिची श्रद्धा होती. आईपेक्षांही दादू तिला जवळचे वाटत व कुठल्याही थोर पुरुषाबद्दल ऐकतां-वाचतांना ती दादूंची मूर्ति डोळ्यापुढें ठेवी. प्रेमळ, बुद्धिमान, उमदी, चारित्र्यसंपन्न! खरोखर दादूंसारखा सद्वर्तनी मनुष्य त्या वस्तींत, तिच्या विश्वांत दुसरा नव्हता. बाहेरच्यांशीं, शेजाऱ्यांशीं नि खुद्द पत्नीशीं व लेकीशीं त्यांचें वागणें समंजसपणाचें, प्रेमळपणाचें असे. त्यांच्या व्यक्तिमत्वांत कसलासा ताजेपणा होता. व लहानसहान हालचालींतही मंद गूढता होती. पहाटे उठून ते ज्ञानेश्वरी वाचीत. रात्रीं निजण्यापूर्वी फोनोवर बालगंधर्वांचीं एकदोन गाणीं ऐकत. आणि शुभाला ह्या दोहोंत दादूंच्या उच्च अभिरुचीचें व पवित्र राहाणीचें प्रतीक दिसे. करड्या रंगाचा गरम सूट घालून कचेरीला जाणारी दादूंची उंचच्या उंच, तडफदार व विचारग्रस्त आकृति दिलीपला गॅरी कूपरसारखी भासे. तर तेच दादू घरीं येतांच उघड्या अंगानें वावरूं लागले कीं शुभाला प्रभु रामचंद्रांच्या चित्राचें साम्य सुचे. सतरा वर्षांची झाली तरी शुभा दादूंच्या वरील भक्तीनें भारावून राहिली! कुणी मैत्रीण, एखादी कला, पुस्तकें, प्राध्यापक—खुद्द दिलीपदेखील तिच्या अंतरंगाचा कबजा घेऊं शकला नव्हता!

जागजागीं लागलेल्या दिव्यांनीं पावसाच्या धारा चमकूं लागल्या. भोवतालच्या ओला शेंदरी अंधार पहातांच शुभा जास्तच चिंताग्रस्त झाली. छत्री रेनकोट घेऊन दादूंना आणायला जावें असें तिला वाटलें. ते भोळ्यासारखे कचेरींत काम करीत बसतील! अगर पावसांतच फिरायला निघतील. रोज संध्याकाळीं खूप लांब नि अगदीं एकटें फिरायला जाण्याचा शिरस्ता त्यांनीं कित्येक वर्षें ठेवला होता. कांहीं झालें तरी रोज मैल दोन मैल एकटे फिरून आल्याशिवाय त्यांना बरें वाटत नसे. शुभाला जास्तच काळजी वाटली. वाटलें, दिलीपकडे जावें व त्याला दादूंचा शोध करायला सांगावें. संकटकाळीं दिलीपची आठवण व्हावी ह्यानें ती तेवढ्यांतही जराशी सुखावली व परत दादूंची वाट पहात खिडकीशीं खोळंबून राहिली.



दिलीपचा गॅरी कूपर अखेर बरीच रात्र करून गाडींतून घरीं आला. खिडकीशीं उभी असलेली शुभा खालीं धांवली. गाडींतून आले तरी दादू बरेच भिजले होते. त्यांच्यापाशीं भाडें द्यायला पैसेही नव्हते. शुभाला ह्याचें आश्चर्य वाटलें. तिनें पुढें केलेली छत्री घेत दादू म्हणाले,

"जरा दोन रुपये घेऊन ये ह्याला द्यायला. मजजवळ नाहींत—"

शुभानें धांवत जाऊन दोन रुपये आणले व गाडीचें भाडें चुकतें केलें. दादूंच्या छत्रींत शिरत व त्यांना बिलगत ती घरांत आली. त्यांचा कोट उतरवीत म्हणाली,

"गाडीतनं आलांत, पण किती भिजलांत? ऑफीसशींच गाडी केलीत ना? अन् दादू, दोन रुपये म्हणजे भलतेच घेतले त्यानं—"

दादूंनी नेहमींसारखें मंद स्मित केलें व कपडे बदलले. गॅरी कूपर अदृश्य होऊन प्रभु रामचंद्रांची प्रसन्न आकृति घरांत वावरूं लागली. शुभा दुरून त्यांच्याकडे त्याच ओथंबलेल्या आपलेपणानें पाहूं लागली. तेवढ्यांत आई आंतून आली नि म्हणाली,

"हें काय? शर्ट कां काढलांत? सर्दी होईल ना! हें घ्या. शर्ट नि स्वेटर घाला—अन् साधा चहा आधीं घेणार कीं गंविती?—"

आई-वडिलांचा संवाद ऐकत शुभा दूर सरली. आपण कल्पनेंतली माया पांघरतो; पण आईनें व्यवहारी खऱ्या प्रेमापोटीं दादूंना स्वेटर घालायला लावलें. ह्या जाणीवेनें तिला स्वतःबद्दल लाज वाटली. आई वडिलांची एकमेकांवरची प्रीति व निष्ठा पहात ती दुसऱ्या खोलींत गेली. दिलीपच्या वाचनालयांतून आणलेल्या पुस्तकांचा ढीग टेबलावर पडला होता. दिलीपची तिला आठवण झाली. अन् मग आवेगानें ती दिवाणखान्यांत जाऊन दादूंना म्हणाली,

"दादू, आधीं चार घांस खा गरम गरम. तुम्ही खूप भिजलां अहांत. थकला आहांत. जेऊन स्वस्थ पडायला हवं तुम्हांला. नाहींतर सर्दी पडसं व्हायचं: चला...आई, वाढून घेऊं ना?"

दादूंनीं खांद्यावर थोपटतांच तिला परमावधीचें सुख वाटलें. आई–दादूंच्या मध्यें आपलें पान घेऊन तिनें दादूंना बळेंच चार घांस खायला लावलें. मग शाल पांघरून दिवाणखान्यांतल्या आरामखुर्चीवर निजवलें. त्यांच्या पायथ्याशीं ती बसली व हूलक्या, रेशमी आवाजांत हरीभाऊंची कादंबरी वाचूं लागली...

जराशानें शुभानें वर मान करून पाहिलें तों दादूंना झोंप लागली होती. बाहेर वेडावाकडा पाऊस कोसळत होता आणि आरामखुर्चींत दादू अस्वस्थ निजले होते. त्यांचा घसा घरघरत होता व नाक चोंदलें होतें. सपाटून सर्दी होणार हें दिसत होतें. काळजीनें शुभानें पुस्तक दूर टाकलें व मग काय करावें हें ती ठरवूं लागली. दादूंना उठवावें तरी पंचाईत नि तसेंच अवघडून ठेवावें तरीही. बिचारे किती कष्ट करतात. बायको-पोरींसाठीं. सोशिकपणें. जराही हूंकार करीत नाहींत! दादूंचा दमलेला चेहरा पाहून प्रेमानें व वात्सल्यानें शुभा भारावून गेली. ‘आकाशापेक्षां

विशाल कोण? वडील!' 'देवाइतके थोर कोण? दादू!' लहानपणीं घोकलेलीं वाक्यें तिच्या ओठावर अचानक आलीं. पण त्या उच्च शब्दांची आतां निकड नव्हती. आतां त्यांच्या पडद्यावर तोड हवी होती.

शुभानें कपाटांतली निलगिरी तेलाची बाटली हळूंच उघडली. दादूंचा रुमाल कोटांत होता व कोट शेजारच्या खोलींत खुंटीला होता. शुभानें लगबगीनें त्या खोलींत जाऊन खिशांतला चुरगळलेला रुमाल काढला व त्यावर ती निलगिरी तेल ओतूं लागली. तेवढ्यांत तिच्या ध्यानांत आलें कीं खिशांतला रुमाल नव्हे तर चुरगळलेला कागद तिनें काढला आहे. बाटली दूर ठेवून तिनें तो कागद दिव्याशीं नेला व उलटासुलटा केला, उलगडला...कसली तरी पावती! ऑफिसांतली चिठ्ठी!...अगदीं सहजगत्या शुभानें तो कागद वाचला. गिचमिड्या अक्षरांत कशीबशी काढलेली तीं अक्षरें तिनें भुवया बारीक करून, मग डोळे फाडून, नि अखेर धडधडती छाती दाबून धरून वाचलीं. वाचलीं नि मग घेरी येणार ह्या भीतीनें ती भिंतीला टेकली.

प्रेमपूर्वक नमस्कार,

दुपारहून पाऊस सुरूं झालाय्. कमिटीचे लोक ताकीद देऊन गेले. वाड्याची आपली बाजू पडेल म्हणतात. खोलीची भिंत ओली झाली आहे. मला भीति वाटते. पावसामुळें संध्याकाळची खेप टाळाल. पण उभ्याउभ्या येऊन धीर देऊन जावा. मी एकटी बाईमाणूस. काय करूं? शेजारच्या पानवाल्याच्या हैबूबरोबर हपिसांत चिठ्ठी धाडली ह्याचा राग नसावा. आज इतकी वर्सं चोरट्यासारखं सांभाळलं नाही कां ह्या कबूतरवाड्यांत एकटं राहून?

तुमची नम्र दासी,
अंबालिका

• •

वेड लागलेला पाऊस घेरी येऊन थांबूं लागला. छत्र्यांची जत्रा सर्वत्र दिसूं लागली. पूर पहायला, पडकीं घरें पहायला, एकमेकांना भेटायला, अगर काल्वा झालेल्या रस्त्यांनीं नुसतें भटकायला, लोक बाहेर पडले. वाचनालयावरच्या आपल्या खोलींत अडकून पडलेला दिलीप अधाश्यासारखा निघाला. पावसांत अंतर्धान पावलेली शुभा त्याच्या डोळ्यापुढें अजून दिसत होती. छत्रींत तिला विलगून अगर तसंच तिच्यासारखं भिजत—पण तिच्याशेजारीं जायला हवं होतं असं त्याचं धुवांधर पावसानें भिजलेलें मन म्हणत होतें. तिचा व तिच्या आईवडिलांचा त्याच्यावर विश्वास होता. लोभ होता. पण शुभाच्या मनाचा तळ त्याला अजून लागला नव्हता. तशी संधी आली नव्हती. ह्या पावसांत ती संधी आली नि वाहून गेली असें दिलीपला सारखें वाटत राहिलें.

शुभाच्या घराच्या खिडकीशीं त्यानें सायकल थांबवली व जोराजोरानें सायकलीची घंटा वाजवली. पावसाच्या झालरी अजून ओघळत होत्या. कौलारावरून पागोळ्या ठिपकत होत्या. घंटेचा ओळखीचा नाद ऐकूनही शुभाच्या खोलीची खिडकी उघडली नाहीं. दिलीपला वाटलें, पाऊस उघडल्याचें पाहूंन शुभाही आपल्यासारखी बाहेर पडली असेल. कदाचित् आपल्याकडे? वाचनालयाच्या वाटेनें ओचे वर उचलून पाण्यांतून हंसीसारखी जाणारी शुभा त्याला दिसूं लागली. कदाचित् ती घरामागच्या एकाकी ओसाड दीपमाळेजवळ गेली असेल. दुःखांत वा आनंदांत दीपमाळेच्या काळ्या व भक्कम चौथऱ्यावर बसायचा तिचा छंद त्याला ठाऊक होता. कदाचित् पावसांत भिजल्यानें आजारी पडून ती खिडक्या लावून निजली असेल. दिलीपला काळजी वाटली व सायकल ठेवून तो शुभाच्या बिऱ्हाडाकडे धांवला.

दार किलकिलें करून शुभा त्याला पहात होती. खिडकी नेहमीप्रमाणें उघडली नाहीं म्हणून तो परत जाईल असें तिला वाटलें. पण तो दाराकडे आलेला पहातांच तिच्या छातींत धडधडलें व आधींच पांढरी पडलेली चर्या निस्तेजली. दिलीपची भेट घ्यायला, त्याला तोंड दाखवायला, तिला शरम वाटत होती. एकदम पळून न्हाणीघरांत लपावें असें तिला वाटलें. पण ती दार अर्धवट उघडून उभी राहिली.

"घरांतच? मला वाटलं हंसिका गेली पाण्यांत विहार करायला! खिडकी बंद दिसली...शुभा, आजारी तर नाहींस तूं?—"

ओल्या उन्हासारखा बोलणारा दिलीप शुभाचा अवतार बघून अडखळला. तिचा सुकलेला चेहेरा, ओढलेले डोळे, अस्वस्थ हालचाली व दार अडवून उभें राहणें त्याला विचित्र वाटलें. त्याच्या भावनांचा पूर ओसरला व ती आजारी आहे हें जाणवलें.

"जरा डोकं दुखतंय्—" शुभा म्लान सुरानें म्हणाली.

"बाहेर पडूं, म्हणजे बरं वाटेल. नाहींतर घरातच गप्पा मारूं..."

"नको दिलीप, तूं जा. मला अगदीं बरं वाटत नाहीं—"

"उद्यां येऊं?"

"नको. आतां जा तूं—"

दिलीप वेड्यासारखा पहात तिच्यापासून दूर गेला. तिला क्षणकाल बरें वाटलें. व मग अगदीं एकाकी, अधांतरीं वाटलें. आपलें कुणी नाहीं, आपण निराधार आहोंत अशा विचारांचा हुंदका तिच्या घशांत घोटाळूं लागला. दार लावून ती जडपणें घरांत आली.





अनुक्रमणिका

दोन अडीच दिवस पावसाचें भीषण तांडव सुरू होतें आणि शुभा आपल्या खोलींत डोकें धरून पडून होती. निलगिरी तेलाची बाटली आतां तिच्याच रुमालावर व उशीवर रिकामी झाली होती. त्या वासानें जड झालेलें डोकें फुटायची पाळी आली होती व लाल झालेले डोळे जास्तच जळत होते. दिव्याच्या अर्धवर्तुळी उजेडांत उलगडलेला कागदाचा तुकडा कापरासारखा तिच्यापुढें सतत पेट घेत होता. तुमची नम्र दासी—अंबालिका...इतकीं वर्षे चोरट्यासारखं सांभाळलं नाहीं कां?...संध्याकाळची खेप टाळाल...तुमची दासी...चोरट्यासारखं इतकीं वर्षे...वेडीवाकडीं बायकी अक्षरें स्पष्ट दिसत होतीं. आणि वेळ जाई तसें वाटत होतें कीं सारा भास आहे. कागदही खोटा व मजकूरही खोटा. कांहींतरी डोक्यांतून निघालंय् आपल्या! दादू असं करीत असतील? दादू?? आपले वडील?—परत कळून चुके कीं तो कागद आपण पुन्हा जागेपणीं नीट वाचला आहे...कुणा बाईनं चोरून संबंध ठेवणाऱ्या इसमाला ती चिठ्ठी—हाय, दादू असे आहेत! दादू!! पण असं कसं असेल?... व्यामोहांत शुभा एकसारखी तळमळत, तडफडत होती.

शुभाला वाटलें, वेळ जात होता आणि सत्य तिला हुल्कावण्या दाखवीत होतें. पंधरा वर्षांचा काळ असाच लोटला होता. एक विषारी वस्तुस्थिति लपवून! आज अचानक तिला तें रहस्य कळलें होतें. आभासमय. आणि पुन्हां रोजचा कार्यक्रम सुरू होता. ती मोठी होत होती. आई आपला टुमदार संसार नटवीत होती. दादू प्रसन्नपणें, शांतपणें घरांत वागत होते व कचेरींतून आल्यावर पत्नीशीं व लेकीशीं काव्यशास्त्रविनोद करून दूरवर, एकटे फिरायला जात होते!—

पलंगावरून उठून शुभानें कानोसा घेतला. दादू ऑफिसांतून यायची वेळ झाल्यानें आईची लगबग सुरू होती. ऑफिसांतून आल्यावर चहा घेत दादू पत्नीशीं हंसत-खेळत अर्धा तास गप्पा मारीत. लेकीची थट्टा करीत. ऑफिसच्या गमती सांगत. खावला केलेल्या टारगिक पोह्यांचें, शिऱ्याचें कौतुक करीत. संसारांतल्या साध्या गोष्टी समरसतेनें ऐकत—अन् मग घाईनें फिरायला निघत. सुपारीचेंसुद्धां व्यसन नसलेल्या त्या उमद्या गृहस्थाला एकच छंद होता. संध्याकाळचें एकटें भटकायला जायचें. रस्त्यानें, रानावनांत. मन शुद्ध होतें, मोकळी हवा मिळते, प्रकृति नीट राहते—अनेक फायदे दादू सांगत...

'सगळं खोटं, सगळं ढोंग. भयंकर ढोंग, कपट!' मोठ्यामोठ्यानें टाहो फोडणारें शुभाचें मन त्या कपटनाटकाची नांदी पाहूं लागलें. नवरा येणार म्हणून आईनें दिवाणखाना जरा नेटका केला. दादूंचा फिरायला जायचा पोशाख व काठी काढून ठेवली. काल पाऊस असला तरी ते गेले; आज तर नक्कीच जातील हें त्या इतकीं वर्षें समरसतेनें संसार करणाऱ्या स्त्रीला माहीत होतें. गॅलरींत ती मध्येंच डोकावीत होती व स्वैपाकघरांत बश्या चमचे मांडीत होती. आईच्या ह्या तत्परतेकडे, निष्ठेकडे, आजवर भक्तीनें पहाणारी शुभा भकास चेहऱ्यानें पहात राहिली. आईची तिला विलक्षण करुणा वाटूं लागली. तिच्या सुखी संसाराखालीं काय जळत आहे ह्याची त्या भाबड्या मनाच्या स्त्रीला अंधुकही कल्पना नव्हती. विलक्षण हुषारीनें एक संभावित गणला गेलेला पुरुष तिची भयंकर फसवणूक करीत होता. तिच्या निष्ठेचा, निष्कपटी मनाचा फायदा घेऊन एक चोरटा, अनैतिक संबंध ठेवून होता. त्यासाठीं सभ्य, प्रेमळ, शांत वागणुकीचें नाटक करीत होता! अरेरे, बिचारी माझी भोळी, गरीब आई...इतक्या वर्षांत तिला साधा संशयही आला नाहीं. तिनें डोळे मिटून विश्वास ठेवला!...शुभाचें मन आकांत करूं लागलें. इतकी भयंकर फसवणूक, इतकें दुटप्पी वर्तन जगांत असूं शकतें ह्या प्रखर जाणीवेनें सतत पोळत राहिलेलें तिचें मन विव्हळूं लागलें. अन् दादूंची चाहूल लागतांच मूर्च्छित झालें.

मावळतीची सोनेरी झुळुक घेऊन दादू घरीं आले. गॅरी कूपरसारखे तिरप्या नजरेनें पहायची व हनुवटीच्या वरच्या बाजूना अंगठ्यानें व तर्जनीनें गालापर्यंत चोळायची त्यांना संवय होती. तसें करीत ते आपल्या बिऱ्हाडीं आले. सुहास्यानें स्वागत करणाऱ्या पत्नीला त्यांनीं प्रतिसाद दिली. शुभा कुठें आहे म्हणून चवकशी केली.

"डोकं चढलं आहे तिचं अजून. पडली आहे खोलींत..." आईनें म्हटलेलें शुभाला ऐकूं आलें.

"अजून बरं नाहीं वाटत तिला? अर्रर! येतांना डॉक्टरला तरी आणलं असतं. झोप लागलीय काय?—" दादू काळजीनें म्हणाले व शुभाच्या खोलींत शिरले. आधींच मिटलेले डोळे शुभानें घट्ट मिटून घेतले. दादूंना पहायची तिला विलक्षण शरम वाटली. जो मनुष्य एका परस्त्रीशीं...

दादू पलंगावर बसले व निजलेल्या शुभाच्या गळ्याला, दंडाला हात लावूं लागले. तिचा पदर ठीक करून वर शाल पांघरूं लागले. बापाचा स्पर्श होतांच शुभाच्या अंगावर कांटा उठला. तिला भय वाटलें, घृणा वाटली व तिचे अवयव आक्रसूं लागले.

"ताप नाहीं. डोकं जरा तापलंय्. काढा दे करून." हलक्या आवाजांत दादू म्हणाले व लेकीकडे प्रेमळपणें पहात बायकोसह खोलीबाहेर गेले. शुभानें डोळे उघडले, दादूंचा स्पर्श, स्वर तिला अजून जाणवत होता. त्यावरच तिची जीवनवेल वाढली होती. पण आज त्या मानभावी बोलण्यानें व कलंकित स्पर्शानें तिला इंगळ्या डसल्यासारखें झालें.

स्वैपाकघरांत स्टोव्हचा आवाज झाला. कपबश्या वाजल्या. आईनें दादूंना बोहारणीकडून घेतलेला पेढेगांठी डबा दाखवला. दादूंनीं हेडक्लार्कचा विनोद आईला ऐकवला. आईच्या एकच पिकलेल्या केसावर मृदु व माफक थट्टा झाली. शुभाच्या काढ्याची आठवण केली गेली—ज्या गोष्टीगप्पांत शुभाला रस वाटे, त्या ऐकतांना तिचें मन कडू झालें. दादूंच्या आवाजाला असलेला दांभिकतेचा दर्प तिला आतां जाणवला. त्यांचा विनोद, त्यांची काळजी करण्याची तऱ्हा, त्यांचें बायकोशीं बोलत बसणें सारें नाटकी, नकली वाटलें. इतकें दुटप्पी, दुहेरी जीवन माणूस बेमालूम घालवतो हें पाहून ती परत थक्क झाली. परत एकवार तिला सारा संशय वाटूं लागला. उठावें नि दादूआईजवळ बसावें, दादूंना खुलासा विचारावा असें वाटलें. पण मग ती बावरली. ती चिठ्ठी फडफडूं लागली. पैसे नसलेले व पावसांत भिजलेले त्या दिवशींचे दादू आठवले. पुन्हां ती वेडीपिशी झाली.

मग तो किळसवाणा, काळा क्षण जवळ आला. दिवाणखान्यांत जरा फेऱ्या घालून दादू मग फिरावयाला जायची तयारी करूं लागले. श्वास रोधून व डोळे किलकिले करून शुभा दाराच्या चौकटींतून दिसेल तितकें टिपत होती. साळसूदपणें, संथपणें, पण निग्रही भावनेनें व योजनाबद्ध हालचालीनें दादू जायची तयारी करीत होते. पांढरी विजार, पोलो शर्ट, पठाणी वहाणा, जाड मुठीची काठी. त्यांच्या पोटऱ्या दृष्टीस पडतांच शुभाला वाटलें कीं रोज मैल चार मैल चालायला जाणाऱ्या पुरुषाच्या पोटऱ्या ह्या नाहींत. ह्यांना आकार नव्हता, चालून गोळे आलेले नव्हते.






मोकळ्या हवेंत लांबवर फिरायला जाण्याचें वेड असलेल्यांच्या डोळ्यांत निसर्गचित्रें तरळत असतात. फ्रेम करून भिंतीला लावावी तशी. आकाश, चंद्रबिंब, नारळाचीं झाडें, डोंगरमाथे, उधळलेलीं गुरें...चित्रपटासारखीं अनेक दृश्यें त्या डोळ्यांत फिरत असतात. दादूंच्या डोळ्यांत कांहीं नव्हतें. खोल विहिरीसारखे ते डोळे ओसाड व मुर्दाड होते. फिरण्याच्या नादाखालीं कबुतरवाड्यांतल्या अंबाच्या...

शुभाला एकदम वाटलें कीं धांवावें नि दादूंचे पाय धरावेत. त्यांना घट्ट धरून ठेवावें व म्हणावें, दादू, कुठे जातां? नका हो आम्हाला फसवूं! तुम्ही असे वागलांत तर आम्ही कुठल्या तोंडानें जगावें? आमचे काय चुकले हो? आईनें काय पाप केलंय म्हणून तिच्या मंगळसूत्राचा तुम्ही मानभंग करतां? तिच्या संसाराला डांबर फसतां? तुमची लेक तुम्हांला देव मानते. अजून देव मानते, दादू, नका हो तिला नरक दाखवूं!—

आईनें हंसत निरोप दिला व दादूंची उंच, सडसडीत गॅरी कूपरसारखी आकृति अस्वस्थ हालचाली करीत दूर गेली.

"काढा प्यायला ये ग—" शुभाच्या खोलींत डोकावत आई म्हणाली आणि डोळे उघडे होते म्हणून शुभाला उठावें लागलें. तिचें मन अजून दादूंचा पाठपुरावा करीत होतें. दादूंच्या मागें कबुतरवाड्याकडे चाललें होतें. त्या न पाहिलेल्या स्थळीं पोचलें होतें. पोपटाचा पिंजरा टांगलेलें घर, मोठमोठ्या तसबिरींनीं, आरशांनीं, तक्क्यालोडांनीं व पानदानांनीं शृंगारलेला दिवाणखाना, प्रशस्त, छपरी पलंग—आणि ती रसरशीत, नटमोगरी बया. अंबालिका! त्या न पाहिलेल्या स्त्रीची छबी डोळ्यापुढें रेखीत शुभा आईजवळ बसली व तिच्या हातानें काढा प्यायली.

'आईला सांगावं कां सारं?' काढा प्यायल्यावर व आईच्या सावलींत बसल्यावर शुभाच्या मनीं विचार थरथरला. आपला संशय सांगावा, चिठींतला मजकूर सांगावा, तिला जागें करावें, तिच्या खोट्या, उष्ट्या संसाराचें दर्शन घडवावें...शुभानें आईचा आरशासारखा स्वच्छ नि समईसारखा उजळ चेहेरा पाहिला नि तिच्या मनांतली कल्पना अदृश्य झाली. छे, ह्या स्त्रीला हें रहस्य कधींच कळतां कामा नये. तें ऐकतांच ही गतप्राण होईल. कुंकू पुसून प्राण देईल! ती ओठ चावीत उठली व आईला म्हणाली, "तुला शेजारी इंदुताईकडे जायचं होतं ना? जा ना. मी आहें घरीं—"

आई घराबाहेर पडतांच शुभाचें मन मोकाट सुटलें. तिनें वेगानें दार बंद केलें. त्या घरांत ती एकटी होती. पिढ्यान् पिढ्याची गणपतीची मूर्ति, पूजा करून ठेवलेला आईदादूंचा फोटो, मखमलीवर भरून टांगलेला. प्रेमाचे, त्यागाचे उभे आडवे धागे विणून तयार केलेला तो संसार! तिथें ती जन्मली. दादूंच्या अंगाखांद्यावर वाढली. दादूंच्या भक्तीमुळें खेळ, गाणें, बाहुली, मैत्रिणी, दिलीप सारें विसरून दादूमय झाली! त्याच संसारांत आतां...घाईनें शुभानें दादूंच्या कोटाचे खिसे चाचपले. एखादी चिठ्ठी, एखादें फूल. टेबलाचे खण तपासले. कागद, कपाट, ट्रंका, सारें उलथें पालथें केलें. रहस्याचा तुटका धागाही कुठें नव्हता. अंबीची, कबुतरवाड्याची पुसट खूणही नव्हती. स्वच्छ संसार होता सारा! मग शुभाला केवळ भास झाला? शुभाला वाटलें, भास असेल तर देव पावेल. ही डोकेंदुखी, हें छातींतलें धडधडणें, हें विषारी मन शांत, स्वच्छ तरी होईल. पण भास कसचा...

तिचे डोळे पाणावले व मग ती दसदसां रडूं लागली. आपल्या खोलींत जाऊन टेबलाशीं बसली. स्वतःची तिला अनुकंपा वाटली. स्वतःबद्दल विलक्षण क्षुद्रता वाटली. कॉलेजचें पांचट आयुष्य सुरूं झालें, घरीं न सांगतां सवरतां दिलीपच्या जास्त गांठीभेटी घेऊं लागलों, आपणच वाईट होऊं लागलों म्हणून देवानें हा भयंकर वार केला! टेबलावर ठेवलेल्या डायरीकडे शुभानें रडतच पाहिलें. मनांतली सगळी व्यथा त्या डायरींत ती उतरून ठेवीत असे. मैत्रिणींचीं भांडणें, वाचलेल्या पुस्तकांतले विचार, दिलीप–दादूंबद्दलची भावना, सारें निरागस, मनमोकळें लेखन! शुभाला वाटलें, आतां ह्यापुढें आपल्याला असें मोकळें, खरेंखुरें लिहितां यायचें नाहीं. आपल्या सरळ मनाला मुरड पडली. आपला पाय रहस्यांत फसला व आपलें निष्कपट जीवन पापांत रुतलें. आतां गुप्तता, संशय, पाप, द्वेष, रडणें, डोकें दुखणें हेंच आपल्या वांट्याला!

त्या घराच्या घाणींत तिला बसवेना. तिथून निघून जावेसें तिला वाटलें. ती उठली व बिऱ्हाडाबाहेर आली. कुठें तरी कबुतरवाडा होता. दूर दिलीपचें वाचनालय होतें. आई शेजारीच बसायला गेली होती. शुभा क्षणकाल अवघडून उभी राहिली. मग सावकाश मागल्या बखळींतल्या जुनाट दीपमाळेशीं गेली. ती प्राचीन, पडकी दीपमाळ तिच्या मनाला अनेकदां दिलासा देई. चिऱ्यांतून वर आलेलें गवत खुडीत ती चौथऱ्यावर टेकली. कधींच न दिवे लागणाऱ्या व सदोदित आकाशाकडे टक लावणाऱ्या त्या दीपमाळेच्या आधारानें ती आपलें मन स्तब्ध करायचा यत्न करूं लागली...

● ●

दुपारचें उन्ह रणरणत होतें आणि दिलीपच्या वाचनालयांत शुभा बसून होती. आलेल्या दोनचार वर्गणीदारांना दिलीप पुस्तकें बदलून देत होता. एकाला जुनी कादंबरी, एकाला मासिकांचे ताजे अंक तर एकाला कुठलीशी एखादी रहस्यकथा. पुस्तकें बदलतांना तो हळूच शुभाकडे पाहून हसत होता. 'झालंच—' असें सुचवीत होता. शुभाला घाई नव्हती नि हंसूही येत नव्हतें. ती नुसती बसून होती. तिलाही पुस्तकें परत करायचीं होतीं. दिलीपकडून उचलून आणलेलीं सगळीं पुस्तकें परत द्यायला तिनें आणलीं होतीं. कॉलेजांत जातांनाच ती देणार होती. पण 'कॉलेज सुटल्यावर भेट—' असा दिलीपचा निरोप होता, म्हणून ती आतां आली होती.

वाचनालय रिकामें झालें तशीं दिलीप म्हणाला,

"बोल! काय पत्ता आहे तुझा? पंधरा वीस दिवस दडी कुठें मारलीस? कॉलेजलाही दुसऱ्या रस्त्यानें जातेस म्हणे!—"



अनुक्रमणिका

शुभाचें हृदय जरा हेलावलें व मग काष्ठवत् झालें. पुस्तकांचा गठ्ठा पुढें करीत ती म्हणाली,

"ही तुझी नेलेलीं पुस्तकं—"

"आँ? एवढ्यांत झाली वाचून? सगळीं? बरीच गोडी लागलीय म्हणायची!—" दिलीप हंसून म्हणाला. त्यानें तो गठ्ठा ओढून जवळ घेतला व मग बाजूला टाकला. एकदम तो म्हणाला, "शुभा, काय झालंय् तुला?"

शुभाचें मन पिळवटलें. तिला काय झालंय् हें निदान दिलीपला कळायला नको. तिचें ठेचलेलें नाक व डांबर लागलेलें तोंड दिलीपला दिसायला नको. तिला खूप झालंय्! कोवळ्या वयाचें निरागस आयुष्य डागळलें व सगळा कडवट अंधार पसरलाय्! शुभानें आपलें भरून आलेलें मन सावरलें व ती कठोर मुद्रा करून बसून राहिली.

थोडा वेळ तसाच गेला. दिलीप तिच्याकडे पहात राहिला. शुभाला काय झालंय्, काय होतंय् हें न कळल्यानें तो घोटाळ्यांत पडला होता, कष्टी झाला होता. तिला दुखणें आलेलें दिसत नव्हतें. कारण ती नियमित कॉलेजला जात होती व कातरवेळीं दीपमाळेशीं बसत होती. तिला काळजी लागायला, मन व्यग्र व्हायला जगांत दुसरें काय असणार? प्रेमळ आई, जिवापाड जपणारे दादू, अल्लड आयुष्य...दिलीपला वाटलें, आपल्यावर तर रागावली नसेल ही? पण तसें म्हणावें तर परवां दादूच संध्याकाळचे फिरायला जातांना वाचनालयाशीं थांबून म्हणाले, "अरे, आमचं कोकरू बघ जरा. डोकं फिरवून बसलंय्! बोलत नाहीं, जेवत खात नाहीं. जरा विचार तिला. सिनेमाला ने हवं तर..." दादूच आपणहून असें म्हणाल्यावर दिलीप खुलला होता; व मग शुभाचें उदास वागणें पाहून चकित झाला होता.

"दादू म्हणाले परवां..." तो म्हणाला. दादूंचें नांव ऐकतांच शुभा तरारून उठली. "दादू म्हणाले, शुभा रुसली आहे. नीट वागत नाहीं—" दिलीपचें बोलणें संपतांच तिनें निःश्वास सोडला व परत ती कडवटपणानें ताठर बसून राहिली.

"माझा पार्टनर येईल आत्ता. मग आंत बसूं बोलत—" दिलीप म्हणाला व रस्त्याच्या वळणाकडे पाहूं लागला. शुभाची नजर वाचनालयामागच्या दिलीपच्या खोलीकडे गेली. दिलीपच्या खोलींत ती पांचसहा वेळां गेली होती. एकदां तिथें तिनें चहा बनवून दिलीपला दिला होता. खुर्चीवर पुस्तकें होतीं म्हणून एकदां ती त्याच्या पलंगावरही बसली होती. उशीवरच्या विणलेल्या चिमण्यांवर हळूच बोटें फिरवीत. दिलीप नि आपण चिमणाचिमणीसारखें राहावें असा विचार तिच्या मनांत निसटता येऊनही गेला होता! आतां मात्र शुभाला त्या खोलींत जावेंसें वाटेना. त्या परक्या पुरुषाच्या खोलींत पाऊल कसें टाकायचें? पुरुष! दिलीपकडे तिनें विचित्र नजरेनें हळूच पाहिलें. पुरुषाबद्दल तिच्या मनांत घृणा निर्माण झाली होती. शिताफीनें गळा-कापणारे कसाई. तिला पुरुषांची चीड वाटत होती. प्रेम, लग्न, संसार, मुलेंबाळें साऱ्याबद्दल तिटकारा वाटत होता.

"आलाच तो—" दिलीप रस्त्याकडची दृष्टि आंत घेत म्हणाला. शुभा तें ऐकून उठली व घाईनें म्हणाली, "नको, दिलीप! मी जाते. मला वेळ नाहीं नि बरंही नाहीं—"

"पण काय होतंय् तें सांगण्यासाठीं तरी—"

"कशाला हवं तुला कळायला?—"

"दादूंनीं—"

"कृपा कर. पण त्यांचं नांव नको काढूं—"

वेडींवाकडीं प्रश्नोत्तरं कशीं झडलीं ह्याचें दोघांना आश्चर्य वाटलें. दिलीपचा सहकारी येत होता म्हणून झालेल्या घाईत ही घासाघासटी झाली. सहकारी दुकानांत दाखल झाला नि मग बोलणेंच खुंटलें. तरीही दिलीप बोलणार होता. पण शुभा रस्त्यानें चालूंही लागली.

पुन्हां एकवार शुभाची एकटी जाणारी आकृति हात चोळीत पहात राहणें दिलीपच्या नशिबीं आलें. आतांही त्याला वाटलें कीं धांवत जावें नि शुभाला थांबवावें. थांबवावें नि विचारावें कीं काय झालं शुभा? कोण बोललें तुला? कुणी मानभंग केला तुझा? तुला काय होतंय, काय हवंय्? माझ्याजवळ मन मोकळें कर. विश्वासानं! मी तुझ्यासाठीं वाटेल तें दिव्य करीन—पण शुभाच्या पीळ पडलेल्या वर्तनाचें दुःख करीत दिलीप तसाच बसून राहिला.

तशाच पीळ पडलेल्या मनानें शुभा घराकडे आली. घरासंबंधीं तिची ओढ आतां ओसरली होती. पूर्वी कॉलेज सुटल्यावर मिनिटही न दवडतां शुभा घरीं येत असे. खेळांचा, मैत्रिणींचा तिला सोस नव्हता. आपल्या उबदार घरांत, आईच्या सहवासांत, दादूंच्या भोवतीं भोवतीं वावरायचें हा तिचा विरंगुळा नि आनंद! आतां ती सावकाशीनें घरीं येई. सारा वेळ खोलींत बसून राही. शांतता असेल तेव्हां दीपमाळेजवळ वेळ काढी. त्या तीन दिवसांच्या अतिवृष्टीनंतर तिचें मन शुष्क झालें. गढूळ झालें. घराबद्दल तुटकपणानें भरलें. वडिलांबद्दलच्या द्वेषानें, घृणेनें हाःहाःकार करूं लागलें.

खोलींत जाऊन तिनें पर्स व पुस्तकें टेबलावर टाकलीं व मग स्वतःच टेबलाला टेकून ती सुन्नपणें बसून राहिली. तिच्या पोटाशीं नि गळ्याभोंवतीं घाम सांचला होता. स्वच्छ तोंड धुऊन कोरड्या कातडीवर पावडर मारायला हवी होती! पण शुभा बसून होती. स्वतःच्या शरीराचें तिला अप्रूप उरलें नव्हतें. सगळें पारोसें, खरकटें वाटत होतें.

आई एकदम पुढ्यांत उभी राहिली व म्हणाली,

"चहा आत्ता घेणार आहेस कां 'हे' आल्यावर?"

"चहा नको मला आई—" टेबलापासून दूर होत व मोरीकडे जात शुभा म्हणाली. आईनें तिला वाटेंत अडवलें व मनगट धरून म्हटलें,

"झालंय् काय तुला, शुभे? चहा का नकोय? जेवली नाहींस नीट सकाळची. जेवणावर लक्षच नसतं तुझं. काय होतंय तुला?—"

"कांही नाहीं ग, काय होणार आहे मला?" शुभा मनगट सोडवून घेत म्हणाली.









अनुक्रमणिका

"असं कसं?" आईनें तिचे खांदेच धरले व थेट डोळ्यांत पहात म्हटलें, "आज पंधरा दिवस बघतोय् आम्ही. तुझं काय बिनसलंय् म्हणून सतरादां विचारलं. मनधरणी केली. पण सांगत नाहींस. आईला न सांगण्यासारखं जगांत कांहीं नसतं, शुभा."

शुभानें आईच्या डोळ्यांत भकासपणें बघितलें. आपलें घेरी येणारें अंग सावरलें व मग संथपणें म्हटलें, "झालं तर मग! मला कांहीं झालं नाहीं—"

"हो ना, मग हास पाहूं! नि त्यांच्याबरोबर चहा घे. त्यांच्याशीं बोल. बैस जवळ. त्यांना बिचाऱ्यांना झोप नाहीं तुझ्यापायीं. काल प्रेमानं त्यांनीं जवळ घेतलं तर तुसडेपणानं वागलीस. तुझ्यावर तेऽजीव कीं प्राण—"

शुभाचे डोळे काळवंडले व ती झटक्यानें दूर झाली. आईला आपल्यामुळें त्रास होतो, तिला बिचारीला कळत नकळत, सारेंच भोगावें लागतें म्हणून शुभाला दुःख होत होतें. पण दादूंचें नांव निघतांच तिचें मन कडू, कठोर झालें. वेगळी प्रेम, नाटकी संसार, दुरंगी व्यक्तिमत्व, व्यभिचार–साऱ्याची शिसारी उफाळून आली. संतापानें ती न्हाणीघरांत गेली व मग हतबल होऊन आसवें ढाळूं लागली.

पण शुभाचीं आंसवेंही झपाट्यानें आटूं लागलीं. कसली कोमल भावनाच त्या कोवळ्या, सतरा वर्षांच्या मुलीच्या मनांत ठरेना. तिचें कोवळेंपणही बितळूं लागलें. गळ्याचें हाड दिसूं लागलें. डोळ्यांत निबरपणा, तुसडेपणा सांखळून राहिला. हालचालींत एक दुखणाईत अस्वस्थपणा उमटूं लागला. सारा वेळ टेबलाशीं, खिडकीशीं, कॉलेजांत, न्हाणीघरांत काढायचा चाळा तिला लागला. टेबलाशीं बसून पुस्तकें डोळ्यापुढें ठेवलीं कीं अभ्यासूची सबब सहज सांगतां येई. न्हाणीघरांत ती सारखे हात, गळा, पोटऱ्या, डोळे धुऊन काढीत असे. सारखा साबण लावायचा, पाणी ओतायचें, टॉवेलनें अगदीं कोरडें स्वच्छ करायचें हेंच वेड! दिलीपला टाळून ती कॉलेजच्या वाचनालयांत बसूं लागली. अन् खिडकींतून उजाडणाऱ्या, अंधारणाऱ्या जगाचा दुरंगी खेळ पहात उभी राहूं लागली.

खिडकींतून दिसणारी दादूंची फिरायला जाणारी आकृति पहातांना एक दिवस शुभाच्या मनीं आलें कीं त्यांच्यामागें जावें. त्यांचा पाठलाग करावा. पहावें ते कुठें जातात! कबुतरवाड्यांतली त्यांची छबेली बघावी! विलक्षण कोंडमारा झालेल्या तिच्या मनांत हाच एक विचार वाढूं लागला. बोलतां येईना, रडणें जमेना. अशा विचित्र दुःखांत हाच एक हाल-चालीची, फुंकर घालण्याची संधी होती. त्यानें दुःख निपटलें जाणार नव्हतें; शरम पुसली जाणार नव्हती; पण असें कांहीतरी केलें, घडलें तरच मनाचे बांध टिकणार होते.

एका संध्याकाळीं ती हळूच निघाली. पण वाटेंत एक मैत्रिण भेटल्यानें तिला परतावें लागलें. एकदां ती दीपमाळेशीं थांबली होती. दादू गेलेले तिनें पाहिले. पण दीपमाळेच्या चौथऱ्यानें तिला खिळवून ठेवलें. ज्या वास्तूला तिनें आपलीं सुखदुःखें कथन केलीं होतीं, ती तिला पित्यामागें जाण्याचें बळ देत नव्हती. सतरादां बेत करून शुभाला तें साधत नव्हतें. तिच्या मनाची जास्तच घालमेल होत होती. मग आईदादूंशीं ती जास्तच त्रासिकपणें वर्तन करीत होती.

अखेर एक दिवस कॉलेज सुटल्यावर ती परस्पर निघाली. दुपारची ती वेळ चांगली होती. दिलीपच्या दुकानाला सुट्टी होती. दादू कचेरींत

बसले होते. शुभा जवळची वहीही लेडीजरूममध्यें राहिली होती. शुभा धीरानें, घाईनें निघाली. कॉलेज जरा लांब जातांच तिनें रिक्षा बोलावली व म्हटले, "कबूतरवाड्याकडे जायचंय्! काय घेणार?"

"दीड रुपया—" रिक्षावाला म्हणाला व शुभाकडे पाहूं लागला.

त्याची साधी नजरही शुभाला भिववूं लागली. त्यानें भाडें जास्त सांगितलें कीं कमी यान्हाही तिला बोध झाला नाहीं. अनोळखी रस्त्यांनीं, अनोळखी वस्तींत रिक्षा वेगानें धांवत होती. आणि जीव मुठींत धरून शुभा सावरून बसली होती.

दरिद्री वस्तींतल्या गलिच्छ चाळींच्या समूहाशीं रिक्षा थांबली, "हा, कबूतरवाडा—"

"हो. पण ह्या सात आठ चाळींतला कुठला?"

"ह्या सगळ्यांना कबूतरवाडाच म्हणतात बाई—"

भांबावलेली शुभा रिक्षाबाहेर उतरली व त्या पांच मजली, पांचशे बिन्हाडें असलेल्या बकाल चाळींकडे बघूं लागली. ह्यांत काय पत्ता लागणार? कुणाला विचारणार! काय नांव सांगणार? कुणाचं?

"कोण हवंय बाई आपल्याला?"

"मी पत्ता विसरले. परत चल—"

कॉलेज मार्गावर रिक्षा सोडून शुभा घराकडे परतली. कबुतरवाड्याचीं भकास बिन्हाडें तिच्या डोळ्यांपुढून हालत नव्हतीं. एक खोल्यांचीं बिन्हाडें, नागडी वाघडी मुलें, सांडपाण्याचे ओहोळ, गांजलेलीं माणसें, आक्रस्ताळ्या बायका. तिथें कुठेंतरी अंबालिका राहात असणार! दादूंची रखेली! दादूंची संध्याकाळची मैत्रिण. त्यांनीं सांभाळलेली, पंधरा वर्षें, चोरट्यासारखें—



शुभाला विचित्र वाटलें. तिनें वेगळी कल्पना केली होती. रंगेल, श्रीमंती घरांचें चित्र रंगवलें होतें. पोपटाचा पिंजरा, पानदान, आरसे, छपरी पलंग, आणि नटवी स्त्री! पण हें सगळें वेगळें होतें. गटार होतें. ती स्त्रीही तशीच असेल. ओसरलेल्या वयाची व हलक्या संस्कारांची! अरेरे, दादूंना षोक, व्यभिचार इतका खालच्या दर्जाचा होता! शुभाला वाटलें कीं हा सुसंस्कृत पुरुष संध्याकाळची सोनेरी वेळ चांगल्या जागीं व रसिक मैत्रिणीच्या संगतींत घालवत असेल. पण दादू इतके कर्दमांत गेले होते म्हणायचे! सोन्यासारखं स्वतःचें घर व बायको टाकून!—

आपल्या पित्याबद्दल शुभाला अधिकच किळस, अधिकच घृणा आली. तिला घरीं जाणें अशक्य झालें. समोरच दीपमाळ उभी होती. एकही दिवा न लागलेली. अचल, थंड. चालत्या बोलत्यांच्या भयानें शुभानें त्या पुराण्या, दगडी मूकस्तंभाला आपल्या अंतरंगांत सजीव केलें होतें. उजळवलेलें होतें. आपल्या आसऱ्याचें, विश्वासाचें स्थान बनवलें होतें. पण आतां जें पाहिलें, समजलें, त्यामुळें त्या दगा न देणाऱ्या दीपमाळेकडे जायचीही तिला लज्जा वाटूं लागली.

कातरवेळच्या जीवघेण्या मनःस्थितींत शुभा दिलीपच्या खोलींत बसली होती. पलंगाच्या एका टोकाला ओठंगून उशीवरच्या चिमण्या नि भिंतीवरचे घसरलेलें कोळ्यांचें जाळें पहात. कितीतरी दिवसांनीं तिचे डोळे डबडबले, वाहिले होते. हृदयाचे बांध फुटले होते. ते फुटले नसते तर ती आंतल्या आंत गुदमरून बुडून गेली असती. पित्याचें गुप्त, घाणेरडें जीवन कळल्यामुळें बावरलेलें तिचें मन वेडाची वाट चालूं लागलें होतें. तिला तिचीच भिती वाटूं लागली होती. एक किळसवाणें रहस्य हृदयांत ठेवून संभावितपणें दिवस घालवणें त्या सतरा वर्षांच्या, जग न पाहिलेल्या व सद्भावनाच जोपासलेल्या मुलीला अशक्य झालें. खोलींत कोंडून घेऊन, दीपमाळेशीं मुग्ध बसूनही तिचें समाधान होईना. अखेर ती दिलीपच्या दाराशीं आली. हीन दीन होऊन! दिलीपजवळ आपला अपमान, आपली जखम दाखवली तर तो निदान वाच्यता करणार नाहीं, वरकरणी तरी सहानुभूति दाखवील ह्या अंधुकशा आशा-आधारावर तिनें हा धीर केला.

अडखळत, मन आवरीत शुभानें सांगितलेली ती भीषण गोष्ट ऐकून दिलीप थक्क झाला. दादूंबद्दल त्यालाही आदर होता. लहानपणापासून तो त्यांना पहात होता. तें घराणें ओळखीत होता. दादूंचें नुसतें दर्शनही सात्त्विकतेचें, सद्वर्तनाचें धडे देई. दादू असे करतील, असें करीत असतील? इतकीं वर्षें, इतक्या गुप्तपणें? सुदृढ पत्नी व नेटका संसार असतांना एका खालच्या दर्जाच्या बाजारी बाईशीं संबंध ठेवतील?" अशक्य, अगदीं अशक्य!

गोंधळलेल्या अवस्थेंत पुस्तकांच्या एका भल्यामोठ्या पार्सलावर दिलीप बसून होता. त्याला कळेनासें झालें होतें. शुभाकडे पहाणें अवघड वाटत होतें. आणि ही अल्लड मुलगी, आपली प्रेयसी, किती दुःखी, अवमानित झाली आहे हें उमगून तिचें सांत्वन करायचा मार्ग शोधीत होता.

शुभानें त्याच्याकडे बराच वेळ ताठ डोळ्यांनीं पाहिलें व मग ती उठत म्हणाली,

"जाते मी दिलीप—"

"चाललीस? उशीर फार झाला ना! पोंचवायला येऊं?"







शुभा शुष्क हंसली. "पोचवायला ? मी काय कुक्कलं बाळ आहे कां ? मला आतां अंधारातनं एकटंच जायला हवं, दिलीप—"

"शुभा—" तिचे कोरडे, खरखरीत शब्द ऐकून दिलीप शहारला. "असं बोलूं नको, शुभा...अन् फार विचार करूं नको. मार्ग निघेल यांतून ! मला तर अजून सारं अशक्य वाटतंय्—"

शुभा विचित्र हंसली. "म्हणूनच फार भयाण आहे सारं. तूंच दिलेल्या एका कादंबरींत दादूंसारखा एक इसम रंगवला होता...हुषार, श्रीमंत, प्रतिष्ठित. पण तो नव्यानव्या बायका करून त्यांचे गळे कापी—"

"ती विदेशी कादंबरी होती, शुभा. कल्पित होती—"

"हो. पण साहेबांचे गुण आपल्या घरांत घुसले आहेत आतां. अन् कल्पित म्हणशील तर चिठ्ठी मी वाचली आहे. तेवढा पुरावा पुरे नाहीं कां ? त्या पावसांत चिठ्ठी न फाडण्याची छोटी चूक दादूंनीं केली नि इतक्या वर्षांचं पाप उघडं पडलं—! जाऊं दे दिलीप, तुला फार त्रास दिला."

"असं कसं म्हणतेस, शुभा ? त्रास कसचा? उलट एवढ्या विश्वासानें मला सांगितलंस तें माझ्यावरील प्रेमानें ?—"

त्यासरशीं शुभाला उमाळा आला. रडवा स्वर सरळ करीत व खालीं पहात ती म्हणाली,

"आईनंही दादूंवर विश्वास ठेवला ! मी तुझी पत्नी नाहीं. पण माझा गळा कापूं नको, दिलीप. मला भीक घाल. मी फार दुःखी आहे, हतभागी आहे. माझं जीवन डागाळलं आहे, दिलीप. माझे मानधन वडिल..."

अखेर शुभाला मोठा हुंदका आला व ती परत पलंगावर बसली. चुरगळलेल्या रुमालांत तोंड लपवूं लागली. तिची दुर्दशा पाहून दिलीप कावराबावरा झाला. किती सरळ सालस होती ही शुभा. नि ह्या महिन्या दीड महिन्यांत काय अवस्था झाली तिची ! कसें तिचें सांत्वन करायचें ? ह्या गर्तेतून कसें वर काढायचें ?—

अंमळशानें कोरड्या डोळ्यांनीं व कठोर मनानें शुभा वाचनालयाबाहेर पडली. एकीकडे तिला फार बरें, मोकळें मोकळें वाटत होतें; हृद्यांतल्या जखमांचा निचरा झाल्यानें शांत वाटत होतें. अन् दुसरीकडे तिचें मन म्हणत होतें कीं दिलीपजवळ ही गुप्त गोष्ट बोललों हें चुकलें कां? ह्यांत आपली अधिक बेअब्रू नाहीं कां? पुरुषावर विश्वास कां ठेवला आपण? दिलीप चार ठिकाणीं बोलला तर?

दीपमाळेशीं ती थबकली. कुणी अनामिकानें पुण्य जोडण्यासाटीं अगर पापाचें क्षालन व्हावें म्हणून बांधलेली ती दगडी वास्तू पाहतांच तिला जरा धीर आला, जरा भरून आलें. इथेंच उरलेलें आयुष्य घालवावें असें वाटलें.

पण ती घरीं गेली. टेबलाशीं बसली. न्हाणीघरांत पाण्याशीं खेळत बसली. पलंगावर पडली. खिडकीशीं उभी राहिली. यंत्रासारखी! कशाला कांहीं अर्थ उरला नव्हता. संगति राहिली नव्हती. दादूआईशीं तुटकपणें ती वागत होती अन् 'येईल कधीं तरी ताळ्यावर' असा नाईलाजाचा, नाखूष विचार बाळगीत तीं दोघें शुभाकडे दुर्लक्ष करीत होतीं. शुभाला तेंही उमगत होतें. अन् वाटत होतें, ह्या कृपेपेक्षां वडिलांशीं भांडण करावें किंवा पळून जावें!

ह्या कडेलोट अवस्थेंत पुन्हां एका चिठ्ठीनें ती गडबडली! महारोग्यांच्या शुश्रूषेसंबंधीचें एक पुस्तक कॉलेजांतल्या वाचनाल्यांतून तिनें आणलें होतें. तें वाचतांना तिला वाटत होतें कीं ह्या हतभाग्यांच्या सेवेला आपण जीवित वाहून घ्यावें. घर सोडावें नि जावें वर्ध्याला किंवा दिल्लीला! कुष्ठरोग्यांच्या वसाहतींत रहावें. घर सोडायची ही एकच योग्य संधी होती. उरलेल्या आयुष्याची तीच एक वाट होती.

तिचे बेत चालू असतांना दिलीपचा सहकारी घरीं आला व तिच्या हातीं एक पुस्तक देऊन म्हणाला, "नवी कादंबरी हवी होती ना? ही पाठवली आहे दिलीपनें—"

तिनें नकळत तें पुस्तक घेतलें. दिलीप पुन्हां संबंध जोडायला सबब शोधतो आहे, कादंबऱ्या देऊन आपल्याला मागसांत आणतो आहे ह्या कल्पनेनें तिला कडवट हांसूं आलें. तिनें तें पुस्तक उगाचच चाळलें. आंत एक चिठ्ठी होती. घाईनें खरडलेल्या चार ओळी. "—महत्त्वाचें काम...त्वरेनें ये. तुझा दिलीप...तुझा—" तिला विचित्र वाटलें. तुझा...त्वरेनें ये...ती चोरटी चिठ्ठी तिनें चुरगळून फाडून टाकली. पुस्तकही कोपऱ्यांत लोटून दिलें,

पण संध्याकाळची अभावितपणें ती दिलीपकडे गेली. यंत्रासारखी. खोलींत फेऱ्या घालीत दिलीप तिची वाट पहात होता. ती येईल कीं नाहीं ह्या शंकेनें अस्वस्थ होता. शुभानें परवा सांगितलेल्या त्या विचित्र, भयानक गोष्टीनें त्याला वेड्यासारखें झालें होतें. तिचें सांगणें खरें वाटत नव्हतें. कबुतरवाड्याच्या वस्तींत त्याचा मित्र शिरोळे पोलीस इन्स्पेक्टर होता. त्याच्याकडून त्यानें बातमी काढली नि त्याला कळलें कीं अंबालिका नांवाच्या एका सामान्य स्त्रीकडे रोज संध्याकाळीं एक सभ्य इसम येतो! दादू! दिलीपला आता विश्वास ठेवणें भाग होतें...विचारांच्या वेड्यांत त्याला हें मात्र जाणवूं लागलें कीं दादूंचें दुष्कृत्य आपण पुरुष म्हणून चालवून घेऊं. पण दादूंच्या लाडक्या, अजाण लेकीचें काय? शुभाची

दुर्दशा त्याला बघवत नव्हती. तिनें हाय खाल्ली होती. तिला सावरायला हवं. तिला मागसांत आणायला हवें. त्यासाठीं वाटेल तें दिव्य करायला हवें! त्याच्या प्रेयसीला सांभाळायची जगवायची ही संघी होती, हाच क्षण होता. अन् तो दिलीप पकडणार होता.

दाराच्या चौकटींत शुभा दिसतांच दिलीपला हायसें वाटलें. "ये—" तो म्हणाला, "म्हटलं येतेस की नाहींस?"

"कशाला मला बोलावलंस? मला कुणाकडे जायची इच्छा उरली नाहीं. अन् दिलीप, चोरट्या चिठ्ठयांची मला फार चीड आहे—"

"बस तर खरी—" दिलीप पलंगावरची चादर सारखी करीत म्हणाला, "त्या चोरट्या चिठ्ठीसाठींच तुला बोलावलं—"

"म्हणजे?" बसणारी शुभा उभीच राहात म्हणाली, "कांहीं नवा पुरावा सांपडला दादूंचा? आणिक कळलं?...दिलीप, कुणाजवळ बोलला तर नाहींस?" शुभाचें सर्वांग थरथरूं लागलें.

दिलीप तिच्यासमोर उभा टाकला. हलक्या आवाजांत म्हणाला, "चांगलाच पुरावा सांपडला. सगळं कळलं! दुसराच एकजण मजजवळ बोलला—"

"दिलीप!"

"घाबरूं नको! सुटकेची, आनंदाची हकीगत आहे. ऐकलंस तर हंसत सुटशील. अग, सगळाच घोटाळा—"

शुभा विलक्षण बुचकळ्यांत पडली. दिलीपचा हात धरून त्याला आपल्याजवळ पलंगावर बसवीत म्हणाली, "सांग. सांग लवकर—मला समजत नाहीं रे काय बोलतो आहेस तूं तें. नीट सांग—"

दिलीपनें आपला हात तसाच तिच्या ओंजळींत ठेवला. जें बनवलें होतें, पाठ केलें होतें, तें तो बेमालूम सांगूं लागला,

"अग, इन्स्पेक्टर शिरोळे म्हणून माझा मित्र आहे. त्याच्या मोटर-सायकलीवरून काल मी फिरायला गेलों होतों. वाटेंत कबुतरवाडा लागला. तिथेंच शिरोळ्याचं काम होतं म्हणून आम्ही थांबलों. तूं सांगितलेली हकीगत मला सारखी आठवत होती. तेवढ्यांत शिरोळे म्हणाला, ह्या वस्तींत अंबालिका म्हणून एक बाई आहे. एका मोठ्या संस्थानिकानें एके काळीं ठेवलेली सुंदर रखेली. आतां ती म्हातारी झाली आहे. वैभव गेलं, वय गेलं नि दारिद्य आलं म्हणून वेडी झालीय्. ती काय करते—शहरांतल्या मोठमोठ्या लोकांवर पाळत ठेवते, पत्ते मिळवते अन् त्यांना असं कांहीं पेचांत गांठते कीं..."

शुभा दोन्ही कानांत प्राण आणून ऐकत होती. तिच्या डोळ्यांत हळू-हळूं ज्योत पेटत होती. चेहेरा मोहोरून येत होता. एका विकृत, वेडसर, वेश्येनें आपल्या वडिलांना अडवण्याचा यत्न केला म्हणायचा! ऑफिसांत चिठ्ठी पाठवून गांठायचा, लुटायचा डाव टाकला. दादू मात्र त्यापासून दूर झाले. बिचारे बोललेदेखील नाहींत त्यांच्यावर आलेल्या विचित्र संकटा-बद्दल. आपलें ऑफिस, आपली सहल, सारें शांतपणें चालू ठेवलें. आपण रागावलों तरी! आपण! शुभाला स्वतःची भयंकर लाज वाटली. चीड आली. तिचें मन पापी होतें. अपराध तिचा होता. तिनें दादूंवर नाना आरोप केले. त्यांना सैतान ठरवलें. शुभा शरमेनें काळवंडली व मग दादूंचें शील उजळ आहे हें उमगून उमलून आली. तिला हायसें झालें. सगळा कोंडमारा, दुर्दशा संपली. ती परत अल्लड झाली. दादूंची झाली.

"दादूंजवळ बोलूं नकोस! ते म्हणतील दिलीपला हा नसता उपद्व्याप—"

"नाहीं बाई, असलं कसं बोलेन मी? आतां जरूर तरी काय? माझे दादू मला—दिलीप जातें मी—"

बोलतां बोलतां शुभा एकदम उठली. दिलीप तिला धरून म्हणाला,

"बस ना! आतां आम्ही नको झालों वाटतं?"

"असं कसं? तूंच तर सावरलंस सारं! पण मी उद्यां येईन. नेहमीं नेहमीं येईन—"

हातांची ओंजळ दिलीपपुढें धरून जणूं तिनें आपलें हृदयच त्याला अर्पण केलें. अन् मग ती आपल्या पित्याकडे ओढ लागून गेली. तिची पाठमोरी आकृति दिलीप पहात राहिला. पित्यानें केलेली जखम पतीनें भरून काढायला हवी! आपल्याला सुचलेली युक्ती इतकी साधली हें पाहून तो हरखला. अजाण, अल्लड शुभाच्या ओढीनें भरून गेला.

शुभा रस्त्यानें जवळजवळ धांवतच होती. पश्चात्ताप, पित्याची ओढ, सुटका, हर्ष, अनेक भावना त्या भाबड्या मुलीला बिलगत होत्या. दीपमाळेवर तर जणूं दिवे लागले होते. तो प्राचीन, पडका स्तंभ ज्योतींनीं नटला होता. शुभाच्या भावजीवनाचा तो आधार शुभासारखाच अंधारांत हंसत होता! शुभा तिथें जरा रेंगाळली. मग वेगानें घरीं गेली. दार उघडणाऱ्या आईच्या पाठीवर तिनें थाप मारली. आईनें आश्चर्यानें तिचा बदललेला, बहरलेला नूर न्याहाळला. पण शुभाचें तिकडे ध्यान नव्हतें. सहल संपवून दादू आरामखुर्चीत विसावले होते. "दादू—" तिनें साद दिली. हलकेच ती त्यांच्या पायाशीं बसली व भरून आलेल्या त्या पापी पित्याच्या पोटच्या प्रेमानें रडूं लागली...•

*मंत्र्यांतील मानव जागा झाला. अधिकाराची औपचारिकता निमाली. कायदा शब्दासह अदृश्य झाला. वात्सल्य स्रवूं लागलें ...*



# मी तुमची मुलगी असतें तर

—न. वि. गाडगीळ

मनुष्याच्या वर्तनाबाबत कांहीं नियम, व्यवहाराबाबत कांहीं आडाखे समाजानें बसविले आहेत. भाषेला व्याकरणानें मर्यादा व प्रतिष्ठा दिली आहे. व्यायामानें शरीराला सौंदर्य व सामर्थ्य प्राप्त होतें. देशांतील कायद्यांनीं मनुष्याची मिळकत अगर संपत्ति नियमित होते; स्वामित्व निर्माण अगर नष्ट होतें. सार्वजनिक जागीं कसें वागावें हें कायदा सांगतो; तर अन्य ठिकाणीं कसें वागावें ही शिस्त समाज आपल्या संकेतांनीं व संस्कृतीचें साहाय्यानें ठरवून देतो. ऋतुमानही निसर्गनियमानें आपलें चक्र फिरवीत असतें. तात्पर्य, मानवी जीवन जेवढें मुक्त व मोकळें वाटतें, तेवढें नाहीं. मानवाचें सामाजिक जीवन व आविष्कार निश्चितपणें स्वैर नाहीं. त्याला सक्त अगर सैल पण मर्यादा आहेत हें स्पष्ट आहे. तथापि मानवी मन मात्र कुठल्याही मर्यादेनें बांधलें गेलें नाहीं. विचाराला लक्ष्मणरेषा नाहीं. मनाच्या आवाक्यांत येणार नाहीं असें कांहींच नाहीं. महाभारतांत जें आहे तें अन्यत्र नाहीं व जें त्यांत नाहीं तें कोठेंही नाहीं अशी प्रौढी व्यासांनीं मारली आहे. पण मनाचे महाभारतांत जें अन्यत्र नाहीं तें असतें व जें सर्वत्र आहे तें तेथें असतेंच. जड असे मनाला कांहीं नाहीं; हलकें असें तें मानत नाहीं. सामाजिक बंधनें म्हणजे प्रचंड हत्तीला किसलय तंतूप्रमाणें बांधूं शकत नाहींत. जवळचे व दूरचे ही भावना त्याचे ठिकाणीं नसते. कारण आत्यंतिक गतीचेंच तें माप आहे. पापाला कोण मोजणार? कार्यकारणभाव जगांत वावरत असला व प्रत्येक कार्याचें मूळ शोधतां येत असलें, तरी मनाचे दुनियेंत विचाराचें मूळ शोधतां येणार नाहीं. नदीचें मूळ भूशास्त्रज्ञ शोधील. ऋषीचें कुळ एखादा पुरातत्त्वभूषण निश्चित करील. पण अमुक विचार कां आला अगर उत्पन्न झाला? हें सांगतां येणार नाहीं. त्याचा काळ सांगतां येईल. निमित्त सांगतां येईल. पण निर्माणकारी कारण सांगतां येणार नाहीं. जें सापेक्ष आहे त्याची शिवण निरपेक्षतेनें होत नाहीं. जें स्वभावतःच अस्थिर तें शब्दांच्या माध्यमांत सुद्धां स्थिर असत नाहीं. जेथें ज्ञान अगतिक होतें, तेथें भक्ति हीच साधना श्रेष्ठ असें विद्वान् सांगतात. मनाला सर्व नीतिशास्त्र सांगूनही उपयोग होत नाहीं. म्हणून विज्ञानाला सोडून विनवणीच्या भाषेत योगवासिष्ठकारांनीं 'तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु' अशी शरणगर्भ प्रार्थना केली आहे. आणि हा शिवसंकल्पही प्रार्थनेनें येतोच असें नाहीं. तथापि अवखळ मनालाही, वाल्मीकीला काव्य स्फुरलें, तसे शिवसंकल्प सुचतात असा सूक्ष्म अनुभव येतो. तसा प्रसंग यावा लागतो.

आणि असाच तो प्रसंग होता.

प्रस्तुत लेखक त्यावेळीं केंद्रीय मंत्रिमंडळांत होता. १५ ऑगस्ट १९४७ पासून अवघ्या तीन महिन्यांत दिल्लीच्या वस्तींत ४ लाखांची भर पडली होती. सरहद्दीवरून निर्वासितांच्या गाड्यांमागून गाड्या येत होत्या. जावक त्या प्रमाणांत माफक होती. सप्टेंबरमधील बंदोबस्तामुळें मुसलमानांनीं 'नम्रतेचा धडा गिरविणें योग्य हें जाणलें. पुराणा किल्ल्यांत त्यांची संख्या हजारोंनीं वाढत होती व खास गाड्या सोडून त्यांना पाकच्या हद्दीपर्यंत पोंहोंचविण्यांत येत होतें. स्वतःच्याच देशांत हिंदु व मुसलमान निर्वासित झाले होते. घर सोडतांच सारा प्रदेश परकी ठरत होता. असा कोणताच अपघात अगर अत्याचार होण्याचा शिल्लक राहिला नव्हता. शतकांची संस्कृति क्षणांत गतप्राण झाली होती. पशूसुद्धां कांहीं नीति मानतात; तीही विसरली गेली होती. युद्धाशिवाय हजारोंनीं हजारांची कत्तल चालविली होती. आजार नसतांना घरोघर रडारड होती. अस्मानी सुलतानी कांहींही नसतां प्रजातंत्र यंत्रवत् काम करून संवहरणाचें काम करीत होतें. मंदिरें व मस्जीदे उध्वस्त होत होतीं; व तींहि भूकंप नसतांना! अग्न्यस्त्राचा उपयोग पुराण काळीं झाला नव्हता, येवढा होत होता. तडजोडीनें स्त्रियांना ठार मारून पुरुष स्त्रियांची अब्रू वांचवून जीवासाठीं बाहेर पडत होते. परवलीचा शब्द संरक्षणाऐवजीं संहाराचा मंत्र ठरत होता. 'घर सोडूं नका' म्हणून सैन्यावर भरंवसा ठेवून सबंध शेखपुऱ्यांतील हजारों हिंदु स्त्रीपुरुष अग्नीला बळी पडले. बाहेर पडावें तो कर्फ्यू व गोळीबार म्हणून घरांत; व तीं सर्व मृत्यूच्या मालकीचीं ठरलीं. सैन्याच्या संरक्षणाखालीं गाडी हिंदच्या हद्दीकडे सुटावी व लाहोरपर्यंत येतांच फक्त गार्ड व ड्रायव्हर शिल्लक रहावेत हेंही घडलें! गाडीच्या गतीबरोबर प्राणांनींही गति घेतली, अगर त्यांना दिली गेली. धर्मांतर करून प्राण वांचविण्याचे प्रयत्नही विफल झाले. गाडीवर जें कांहीं लादतां

येईल, तें घेऊन प्राण वांचविण्यासाठीं तांडेचे तांडे निघावेत व सरहद्द गांठीपर्यंत प्राण व धन दोन्ही नष्ट व्हावींत हा चित्रपट अनेक आठवडे चालला होता. राम व रहिम यांचा धर्म नामशेष झाला होता. जीवित व वित्त किती क्षणभंगुर आहेत याचा वस्तुपाठ लक्षावधी लोकांना मिळत होता. स्त्रियांची अब्रू ही समाजाची जबाबदारी हें तर सर्वत्र विसरले होते. स्त्री व वस्तू मिळेल त्याची हा जगाचे जन्मावेळचा न्याय आज प्रचलित झाला होता. जें लुटतां आलें नाहीं तें राहिलें. जें भोगतां आलें नाहीं, तेथेंच अब्रू वांचली. मानव हा निसर्गाचा उत्क्रांत ठेवा; म्हणून उत्कृष्ट. यापैकीं, पहिला सिद्धांत अक्षरशः प्रस्थापित झाला. वानराच्या मर्कटलीला, सर्पाचा डूख, वाघाचें क्रौर्य, कोल्ह्याची लबाडी, रेड्याची मस्ती या सर्वांचें प्रदर्शन त्या तीन महिन्यांत रावीच्या उभय तटावर दिसून आलें. ऋषीच्या मंगलमय ऋचा, कुराणांतील हिदायते मुकी झालीं. सिंधु व शतद्रु, रावी व झेलम यांनीं अनेकांना पोटांत घेतलें. 'मधु क्षिरन्ति सिंधवः' याऐवजीं 'रक्तं क्षिरन्ति सिंधवः' असें झालें. आर्यांची पराक्रमभूमि आज परा‍त झाली होती. रणजितसिंगांचा पंजाब 'सत् चित् अकाल' गर्जत लढण्याऐवजीं रावीला उतार शोधीत होता.

तथापि याही संकट कालांत गुरुद्वार पेटलें तरी ग्रंथसाहेबाशेजारीं खडा पहारा देत 'वह गुरुकी फत्ते' असें अखेरच्या श्वास असेपर्यंत निनादत अनेक अग्निसात झाले. अनेक हिंदु तरुणांनीं जीविताची तमा न बाळगतां संरक्षणाचें कार्य केलें. कांहीं ठिकाणीं परिस्थितीनें ज्याबद्दल पोवाडे गावेत, असे पराक्रम दुर्बलांकडून करविले. उलट किती एक रणवीरसिंग भागासिंग बनून 'आत्मानम् सततम् रक्षेत् दारैरपि धनैरपि'. या तत्त्वज्ञानाला शरण गेले. किती स्त्रियांनीं जलसमाधि घेतल्या व किती पति जीवंत असतां सती गेल्या याचा रोमांचकारी इतिहास कोणी लिहिल्यास भारताची मान उंचावेल! एक कोटी जनता स्थानभ्रष्ट झाली, उखडून फेंकली गेली. शतकांची संस्कृति व परंपरा क्षणांत लोपली, तरी लक्षावधि मानवांनीं धर्मासाठीं सर्व ऐहिक वस्तूंचा त्याग करून दुःख व दारिद्र्य पत्करलें. सुखाच्या वर्तमानाला तिलांजली देऊन दुःखाचें भविष्य पत्करलें. देहापेक्षां आत्मा श्रेष्ठ मानला. आत्म्याला सुरक्षित ठेवून देहाला निर्वासित केलें. जवळचे दूर झाले म्हणून दूरच्यांना जवळ केलें. आणि जे या अग्निदिव्यांतून वांचून भारतांत पोहचले, त्यांचा अक्षरशः पुनर्जन्म होत होता. प्रथम एकत्र होते. कांहीं तेथेंच गळले, कांहीं मार्गांत हरवले; अगर हडपले गेले. कांहीं ज्याला जेथें आसरा मिळाला तेथें गेले. स्वतःचें असें कोणाचें काय राहिले, कोणाचे कोण चुकले अगर मुकले हें सांगणें कठीण होतें. प्रवाहांत पाय टेकूं लागेपर्यंत जी भीति व जी चिंता असते, तसेच या अभागी निर्वासितांचें झालें होतें. 'शय्याभूमितले, दिशोऽपिवसनम्' या योगीजनांच्या 'सोयी' योगी नसतां हजारोंच्या वांट्याला आल्या होत्या. हजारों कुटुंबें भारतांत आलीं व इतस्ततः पसरलीं. कुणी हरिद्वारकडे गेलीं. कुणी दक्षिणेकडे गेली. आणि सुरवातीस सांगितल्याप्रमाणें अनेक दिल्लीस आलीं.

दिल्लींतील सुमारें लाख एक मुसलमान जनता भयानें अगर इस्लामच्या प्रेमामुळें पाकमध्यें गेली होती. तथापि त्यांच्या घरांतून एखादा तरी इसम मागें राहिला होता. जे गृहहीन होते, ते बिचारे मजूर व कारागीर. त्यांनीं शेजारधर्माच्या व सौजन्याच्या स्मृतीच

मागें ठेवल्या होत्या. जे अमीर होते, त्यांचे पाक-निष्ठेनें स्वामित्वापुढें व संपत्तीपुढें हार खाल्ली होती. उद्यांच्या शाश्वतीपेक्षां आजची चुनडी त्यांनीं पसंत केली होती. हातचें संरक्षण सोडून पळत्या वैभवामागें जाण्याचा मूर्खपणा संपत्तिमान वर्ग सहसा करीत नाहीं हेंच अनुभवाला येत होतें. सुशिक्षित मुसलमान स्वार्थ व आदर्श या दोन्ही डगरीवर हात ठेवून तोंडघशी पडत होता; पण त्याची मुजोरी त्याची सोबत सोडण्यास तयार नव्हती. दिल्लींतील मुसलमानांचीं घरें फार थोड्या प्रमाणांत रिकामीं होतीं. त्याजबरोबर भारत सरकारनें त्याबाबत दक्षता घेतल्यानें वाटेल त्यास त्यांत घुसण्यास वाव मिळत नव्हता. आणि या परिस्थितींत हजारों कुटुंबें दिल्लीला येत होतीं. रस्त्यानें, रेल्वेनें, विमानमार्गेण, सर्वतऱ्हेनीं लोकगंगेचा पूर वाढत होता. अतिथिधर्म इतका पाळला गेला कीं, यजमान अतिथि होण्यापर्यंत परिस्थिति आली. सगोत्रज, बांधव, येवढ्यापर्यंतच न थांबतां, ग्रामबांधव, समानोदर येथपर्यंत हा धर्म विस्तारला गेला. सर्व दिल्ली क्षणभर वाटेल त्यानें उतरावें अशी धर्मशाळा झाली.

भारत सरकारच्या नोकरांसाठीं हजारों घरें होतीं. तेथेंही हीच अवस्था दिसून येत होती. त्याजबरोबर ज्यांना सरकारी घरें रहाण्यास दिली होती, असे सुमारें चार हजार मुसलमान नोकर पाकला गेले होते व त्या जागा रिकाम्या होत्या. तिकडून येणाऱ्या हिंदु नोकरांसाठीं त्या अग्रक्रमानें द्याव्यात असा सरकारी हुकूम होता. तथापि १५ ऑगस्ट नंतर मंत्री या नात्यानें माझ्याकडे निर्वासित जागा बळकावीत आहेत असे रिपोर्ट येत होते. पेंचप्रसंग होता. येणाऱ्या सरकारी नोकरांचीही व्यवस्था करावयाची होती, कारण राज्ययंत्र चालू ठेवावयाचें होतें. येणाऱ्या निर्वासितांचीं मनें तडकलेलीं होतीं. दुःखाचें परिवर्तन प्रक्षोभांत होणें सुलभ असतें. त्यागाची किंमत जेव्हां होत नाहीं, परिस्थिति जेव्हां न्याय देत नाहीं, तेव्हां असहाय झालेलें मन विवेकाला सोडतें; मुकीं बोलकीं होतात; निर्बल हात हिंसेकडे दाद मागतात. प्रसंगीं असहाय मन नाणीनें मंगलमयही बोलतें, हृदय भावनामय करतें, उत्कट वातावरण निर्माण करतें. तथापि मुकीं बोलकीं झाल्याचा अनुभव दररोज येत होता.

तावडतोबीची व दीर्घकालीन अशा दोन्ही स्वरूपाच्या योजना मी आंखीत होतों. बृहत् दिल्लीच्या योजना कायम करून प्राथमिक तयारी पण सुरू झाली होती. पांच हजार 'युनिट' सरकारी नोकरांसाठीं व तीस हजार निर्वासितांसाठीं असें तिचें स्वरूप होतें. पाणीपुरवठा, मैल्याचा निकाल, वाहतुकीची ज्यादा सोय, रुंद रस्ते, तात्पर्य, आधुनिक नगररचनेचीं तत्त्वें डोळ्यापुढें ठेवून तज्ज्ञांच्या सहाय्यांनीं हें काम सुरू झालें होतें. चुटकीसारखीं घरें निर्माण होणार नव्हतीं. तूर्त व तावडतोब म्हणून रिकामी सरकारी जागा ज्यांनीं ताब्यांत घेतली होती, ती त्यांच्याकडे ठेवण्याचें ठरविलें व दुसरी जागा मिळेपर्यंत वेताचें भाडें घेण्याचें जाहीर केलें होतें. जसजशीं निर्वासितांसाठीं अन्यत्र घरें तयार होत होतीं, तसतसे सरकारी घरांतून त्यांना काढून लावण्यांत येत होतें. तथापि या दरम्यानच्या काळांत कांहीं हितसंबंध निर्माण होत होते. कुणी दुकान थाटलें, गिऱ्हाईकी संपादली; कुणी प्राथमिक शाळा काढली, आसपासचीं मुलें येऊं लागलीं. सहवासानें संबंध निर्माण होतात; वस्तूप्रमाणें व्यक्ति व वास्तूशीं सुद्धां. एकदां घरदार सोडून कसें तरी बसलों व पुन्हा आता दुसरीकडे; म्हणजे पुन्हा दुःखावर धरलेली खपली काढण्यासारखें

होतें. तथापि जागा सरकारी व अग्रक्रम सरकारी नोकरांना यांत नीतिविरुद्ध अगर व्यवहाराला सोडून कांहीं नव्हतें. रस्त्यावर बांधलेलीं दुकानें मार्केटांत नेणें लोकांच्या भावनांमुळें कठिण होत होतें. अधिकाऱ्यानें हुकूम द्यावा, कुणीतरी जमावानें पंतप्रधानांकडे जावें व त्यांनां तहकूब करा म्हणून सांगावें असें होत होतें. तथापि बेतावेतानें मी तें करीत होतों. गैरसोय न होतां हें केलें जात होतें. पण प्राण वस्ती सोडण्यास लोक तयार नव्हते. सरकारी जागेंतून निर्वासित काढणें म्हणजे कठिण काम होतें. अधिकाऱ्यांना शिवीगाळ तर होतच होती. प्रसंगीं मारहाण-सुद्धां. पण कोणावर खटला करावयाचा नाहीं हें माझें धोरण होतें. निर्वासितांचीं मनें मी जाणत होतों. पहिलें वर्षभर सकाळीं उठतांच त्यांचें दर्शन घडे. सर्वांशीं गोड बोलत मी शक्य तेवढी त्यांची सोय करीत होतों. पुरुष येत. स्त्रिया येत. परंतु रागावण्याऐवजीं त्यांना मी विश्वासांत घेत होतों. व समजूत करून शक्य तेवढ्या सवलती देत होतों. पण अमुक करीन असें वचन न देतां, शक्य तेवढें करीन हीच भाषा बोलत होतों. या उलट माझे एक सहकारी मंत्रि कायद्याची भाषा करीत व पोलिसरूपी काठी दाखवीत! त्यांचें करणें कायदेशीर खास होतें. आणि एकदां त्यांचे दारांत विद्यार्थ्यांवर गोळीबाराचा प्रसंगही आला! मी जाऊन विद्यार्थ्यांची समजूत करून निभावून नेलें. तथापि असला प्रसंग मजवर केव्हां गुजरेल याचा नेम नाहीं ही भीति बाळगून होतों. गोड बोलण्यानें अगर माझ्या पुण्यांतील टीकाकारांच्या भाषेंत 'थापा मारण्यानें' मी निर्वासित जगांत लोकप्रिय झालों होतों. तथापि जें धोरण ठरविलें होतें त्यांत तात्विक फेरफार केला नाहीं; अंमलबजावणींत न्याय ठेवून गैरसोय सारखा टाळत होतों. या काळांत अनेक निर्वासित कुटुंबें माझ्या मैत्रीच्या परिसरांत आलीं होतीं. त्यांचीं सुखदुःखें त्यांनीं मला सांगितलीं होतीं. अनेकांनीं मनावरील दुःखाचें ओझें मजजवळ मोकळ्या मनानें मांडून हलकें केलें होतें. राहण्यास घरें तर मी दिलीं होतीं; पण अन्यथाही मदत त्यांना मिळवून देत होतों. घराबाबत मंत्र्यापासून निर्वासितांपर्यंत मी पाहत असल्यानें उच्च न्यायालयाचे एका न्यायाधीशानें 'गृहदाता तु गाडगीळः' अशी कोटीही केली होती. तात्पर्य, गांवच्या चौधरीप्रमाणें माझी प्रतिष्ठा वाढली होती. आणि आर्तांच्या हांकेला ओ देऊन यथाशक्ति मदत करण्याचें कार्यांत मन रस घेत होतें.

आणि अशाच एका कुटुंबाला मिदान दहा वेळां तरी जागा खाली करण्यास मुदत दिली होती. दोन वर्षांपूर्वीं हें कुटुंब पाक पंजाबमधून आलें होतें. घराचा कर्ता श्रीमान् व्यापारी व जमीनदार होता. फाळणी होताच गांवांत राहणें शक्य नव्हतें. मुसलमान कुळें उलटलीं नव्हतीं. पण राहूं नका म्हणून सांगत होतीं. गांवांतील आश्रित भडकत चालले होते. एकदोन दिवसांत कुरापत काढून गांवच्या गुंडांनीं खून व लुटालूट केली. त्यानें आपली बायको, तीन मुली, एक मुलगा व एक गाय व दोन गाड्यांत शक्य तेवढें सामान घेऊन सरहद्दीकडे देवाचें नांव घेऊन प्रस्थान ठेवलें. रात्रीपर्यंत तो पोंहोचला. गाडीवाला एक मुसलमान व एक हिंदु होता. सकाळ उजाडतांच रावी ओलांडावयाची; भारतांत पाऊल टाकावयाचें; लहान मोठें दुकान थाटावयाचें; असेच त्यांचे विचार त्या रात्रीं असले पाहिजेत! जें कांहीं होतें व घेण्यासारखें होतें तें जवळ घेऊन ही मंडळी हरिजागर करीत होती. कारण गुंडांच्या हल्ल्याच्या बातम्या क्षणाक्षणाला येत होत्या. आसपास अनेक कुटुंबें अशींच पडाव टाकून प्रभात होण्याची वाट पाहत होतीं. आणि मध्यरात्रीस मुसलमान गुंड सुऱ्या घेऊन आले. झटक्यास त्यांनीं गाडीवाले मारले. कर्त्या पुरुषास कंठस्नान घातलें. सर्वत्र हाःहाःकार झाला. त्याची स्त्री, तीन मुली व लहान मुलगा नदी तीराकडे धांवलीं. पाण्यांत पाय ठेवण्यापूर्वीं थोरल्या मुलीची करुणास्पद हांक मातेनें ऐकली. त्याचा अर्थ ती समजली. दोन मुली व लहान मुलगा घेऊन यमुनेनें वाट दिली, त्याप्रमाणें ती चालत होती. मधल्या प्रवाहांत तिचा मुलगा घसरला आणि धारेस लागला. 'मा' येवढाच शब्द तिनें ऐकला व राहिलेल्या दोन मुली घेऊन तिनें रावी पार केली. अक्षरशः एका वस्त्रानिशीं. येवढी किंमत देऊन ती भारताच्या स्वातंत्र्यभूमीवर उभी राहिली. दिल्लींत कोणी नातेवाईक आहेत म्हणून तिनें अधिकाऱ्यांना सांगितलें. म्हणून त्यांनीं दिल्लीस आणून त्यांनी तिला पोचविलें. नातेवाईक मिळाला नाहीं म्हणून एका सरकारी जागेंत ती शिरली. आणि जेव्हां ती मुलींना घेऊन प्रथम जागा ठेवावी म्हणून मजकडे आली, व तिनें आपली हकीगत सांगितली







त्यावेळीं तिचें सांत्वन शक्य तेवढें केलें. मध्यम वयाची, पण संकटानें केस शुभ्र झालेली; दुःखाचा इतिहास रूपावर स्पष्ट उमटलेला; पण हिंदु संस्कृतीची, तिच्या प्रतिष्ठेची ती प्रतिकृति होती. तिच्या बोलण्यांत सभ्यता व संयम, चालण्यांत धृति व डोळ्यांत संकटांवर मात करण्याचा निश्चय दिसत होता. निर्वासितांच्या जागा तयार झाल्यावर तिला जागा खाली करण्याबद्दल सरकारी नोटिस मिळाली होती. पुनर्वसन खात्यानें दिलेल्या मदतीवर तिनें शिवण्याचें यंत्र घेऊन लोकांचे कपडे शिवून ती चरितार्थ चालवीत होती. पण तिचें भाग्य आतां कोणी शिवणें शक्य नव्हतें, येवढें



तें फाटलें होतें. पाकभूमीवर पतीचा देह व संपत्ति आणि रावीच्या उदरांत पुत्र देऊन, केवळ दुःख घेऊन ती भारतांत आली होती. काळ हळू हळू तिच्या मनांत आशा पेरत होता. मुलींना तिनें शाळेंत घातलें होतें. व सरकारी जागा सोडून पटेलनगरच्या बाजूला निर्वासितांच्या जागेंत जाणें म्हणजे पुन्हा उच्चाटन असें तिनें मनांत आणलें असल्यास नवल नव्हतें.

वर सांगितल्याप्रमाणें दोन आठवडे दरवेळां मुदत मी देत होतों. कारण त्या कुटुंबाची करुणकथा मला माहीत होती. तथापि यापुढें देणें शक्य नव्हतें. ती जागा ज्याला खात्यानें दिली होती, तो एका मंत्र्याचा पी. ए. होता व त्यानें जी कारवाई करणें शक्य होतें ती केली होती. मी दौऱ्यावर जाणार ही माहिती घेऊन त्यानें पोलीस स्क्वॉड व इस्टेट आफीसमधील अधिकारी बरोबर घेतले आणि जागेचा कब्जा घेण्यासाठीं त्या दिवशीं तो गेला होता. बाईनें व मुलींनीं रडारड केली, पण अधिकारी ऐकेना. त्यावेळीं बाईनें अर्धा तास थांबा, वजिरसाहेबांना विनंति करतें व त्यांनीं न ऐकल्यास मग वाटेल तें करा अशी विनंति केली. वजिर दौऱ्यावर आहेत असें त्यांनीं तिला सांगितलें. पण प्रयत्न करते; नाहीं तर नशिबांत असेल तें होईल असें म्हणून तिनें थोरल्या मुलीस धाडलें. वास्तविक आदले दिवशीं मी दौऱ्यावर जाणार होतों; पण आकस्मिक कारणासाठीं तो रहित करावा लागला होता. सकाळची आठाची वेळ होती. मी चहा पिऊन व्हरांड्याकडे निघत होतों, येवढ्यांत ती मुलगी धांवत आली. १५ वर्षांची, नीटस, उंच व हुशार दिसणारी, अगदीं विजेसारखी धांवत आली. आणि रागारागांत सर्व हकीगत सांगूं लागली. यापूर्वी पण ती आली होती व तिला अनेक वेळां मुदत दिली होती. व मागील खेपेस यापुढें मुदत मिळणार नाहीं म्हणून सांगितलें होतें. पूर्वीचीं सर्व कारणें तिनें पुन्हां सांगितलीं. मी शांतपणें 'यापुढें मुदत शक्य नाहीं' असें निक्षून सांगितलें. ती रागावून बोले; मी शांतपणें तेंच तें सांगत होतों. ती हेका सोडीना. शेवटी मी म्हणालों, आतां गनमन—म्हणजे मंत्र्याचा पहारेकरी—याला बोलावतों व तुला बाहेर घालवितों. मी क्षणभर तिच्या डोळ्यांकडे पाहिलें आणि क्षणांत ते रावीचा प्रवाह झाले व दुसऱ्या क्षणांत तिनें आपले हात माझ्या गळ्यांत घालून "मी तुमची मुलगी असते तर असें म्हणाला असतां कां?" असा प्रश्न केला. मंत्र्यांतील मानव जागा झाला, अधिकाराची औपचारिकता निमाली, वात्सल्य स्त्रवूं लागलें. कायदा शब्दासह अदृश्य झाला. स्वाभाविक दयाभाव वातावरण बदलूं लागला. ती माझी मुलगी असती तर मी काय केलें असतें या कोड्याचें उत्तर त्या चारदोन क्षणांत माझें मन शोधत होतें.

तिच्या असहाय मनानें, गोड वाणीनें माझ्यातील मांगल्याला आवाहन केलें होतें. निष्ठुरता म्हणजे निःस्पृहता हें मी कधींच मानलें नव्हतें. तथापि कायदा म्हणजे समाजाचा हितसंरक्षक म्हणून व्यक्तीकडे कमी पाहणें हें कर्तव्य मी मानत होतों. राजाचें राज्याला द्यावयाचें व देवाचें देवाला द्यावयाचें ही वांटणी मी न्यायाची समजत होतों. म्हणून शेवटच्या सीमेपर्यंत व्यक्तींची सोय मी पाहत होतों. वादविवादांत तडजोड वृत्ती व अंमलबजावणींत निग्रह ही मुत्सद्द्याचीं लक्षणें. म्हणून त्याप्रमाणें वागण्याचा माझा प्रयत्न होता. या मुलीचे जागेबाबत कांहींही करणें शक्य नव्हतें ही गोष्ट बुद्धीनें बजाविली, विवेकानें आर्जवून सांगितली. तथापि मुलीनें केलेला प्रश्न शब्दांत असला, तरी शब्दापलिकडील असें जें आहे त्याला विचारला होता. ज्या ठिकाणीं वाचा जाऊं शकत नाहीं, किंबहुना परतते, त्या ठिकाणीं शब्दांतील भाव कशाचा तरी शोध घेत होता. तिचे हुंदके कानाशिवाय ऐकत होतों. कांहीं क्षण ती आपलें डोकें माझ्या छातीवर ठेवून उभी होती. कांहीं तरी निर्णय घेणें प्राप्तच होतें. पण कोणता निर्णय घ्यावा हें समजत नव्हतें. माझी मुलगी असती तर काय केलें असतें? प्रश्न पुन्हा पुन्हा डोळ्यापुढें येत होता. त्या कुटुंबाची हकीगत सर्व डोळ्यांपुढें आली. मुलाचा 'मा' शब्द, मुलीची किंचाळी मी ऐकली आहे असाच भास झाला व क्षणांत मी तिला हळूच बाजूला केलें व तुला आतां हुकूम देतों म्हणून गनमनाला बोलावून तुला किती महिने मुदत पाहिजे म्हणून विचारलें; आणि तिनें जेवढी मागितली तेवढी दिली; व तो कागद व तिला गनमनबरोबर धाडून दिलें. मनुष्यासाठीं कायदा आहे. म्हणून प्रसंगीं तस त्याला आकार दिला पाहिजे असें मनांत आणून मी माझें समाधान केलें. तथापि स्मृतिग्रंथ चाळीत असतां केलें हें बरोबर कां चूक असा संशय उत्पन्न होतो. पण पुन्हा 'मी तुमची मुलगी असते तर काय केलें असतें' या प्रश्नाला दुसरें उत्तर सुचत नाहीं



# बाजाराची वाट

— व्यंकटेश माडगूळकर

मागे एकाएकी घंटा वाजली आणि डोक्यावर बाजाराचे गठळें आणि हातांत येशेलखोबरेलाच्या बाटल्या घेतलेली बंचा लटकन् हलून एका अंगाला झाली. तिचा ऊर धपापूं लागला. दिवस मावळायला आला होता. इतर बाजारकरू केव्हांच परतले होते आणि तरणीताठी, शंभर जणींत देखणी बंचा एकटीच झपाट्यानें पाय उचलीत होती. तिनें बाजारला नेलेल्या मिरच्या विकायला फार वेळ लागला. बाजार फुटतां फुटतां, शेवटच्या शेरभर मिरच्या देऊन तिनें फडकें झाडलें आणि तिथून तिनें आपला बाजार खरेदी केला. तेल, मीठ, नारळ, केरसुणी या जिनसा नीट पारखून घेतां घेतां दिवस पार उतरला. गठळें डोक्यावर घेऊन बंचाने गांवचे कोणी सोबतीला मिळते कां याचा तपास केला; वाण्याची गबा, सोनाराची शिशी, पवाराची धोंडाबाई या बायका येतांना तिच्या-बरोबर होत्या. 'माघारी जातानाबी मिळून जाऊं म्हन' असें त्यांचे बोलणेंहि झालें होतें. पण कितका वेळ कोण थांबणार ? कदाचित् ह्या बायका आपली वाट बघत ओढ्यालगतच्या वडाखालीं बसल्या असतील या विचारानें बंचानें बाजारांतला तपास सोडला आणि ती गांवाबाहेर पडली. पण वडाखालीं कोणी नव्हतें. बायका वाट बघून केव्हांच गेल्या होत्या. मग बंचा बावरली आणि भराभरा पाय उचलूं लागली. उदनवाडीकडे जाणाऱ्या वाटेनें जाऊं लागली. पांद ओलांडून ती टेकावर आली आणि मोठ्या आशेने तिनें समोरच्या गाडीवाटेकडे पाहिलें. पण थेट क्षितिजापर्यंत दिसणाऱ्या वाटेवर कोणी नव्हतें. सोबतीला कोणी नसतांना पांच मैलांची ही आडरानांतली वाट एकटीनें आवरायची कशी ? आत्तां मैलभर जाई-पर्यंत अंधार होणार होता. रात्र काळोखी होती. काळोख्या रात्रीं तरण्या-ताठ्या बाईने एकटे जावे कसें ?

वरचेवर मागेपुढें बघत, पवाराची बंचा वाट काटीत होती. हिरव्यागार लुगड्याच्या पदराखालीं तिचा ऊर धपापत होता. ओल्या हळदीच्या गाभ्यासारखी तिची काया घामेजून गेली होती. ही वाट तिच्या पाया-खालची होती. रातची अंधाराची वाट तुडवणें तिला नवीन नव्हतें, मळ्यांतून माघारी यायला रोजच उशीर होई, हें सगळें खरें असूनहि तिला भीति वाटत होती. तिच्या जिवाची दैना दैना झाली होती.

आणि अशांत एकाएकीं मागें सायकलची घंटा वाजली आणि सुखा

*घर जवळ आलं होतं...पण भुकेलेल्या मनाला आणि थकलेल्या शरिराला विसांवा हवा होता !*

अनुक्रमणिका

माधव जोरकस सायकल मारीत वंचाच्या अंगावरून पुढें गेला. जातां जातां मागें वळून त्यानं वंचाकडे पाहिलें, पण तो थांबला नाहीं. त्याच्या बोजाखालीं सायकल कराकरा वाजत होती आणि पेंडीचें पोते कॅरेजवर बांधून सुखा अंधाराच्या आंत गांवांत पोचण्याच्या हिशोबानें जोसांत चालला होता.

वाटेने पळतां पळतां वंचा मनांत म्हणाली, 'ह्यो जर पायीं पायीं जात असता तर सोबत झाली असती. असंना का गडीमानूस, पर गांवचा हाय. पर ह्यानं घेतलिया सायकल. का करावं ह्या कहाराला ?' आला तसा सुखा जोरकस पांच सात कासरे पुढे गेला आणि एकाएकी सायकलीवरून खालीं उतरला. वाकून चाकाकडे बघूं लागला. त्याला तसें बघतांना वंचानें लांबून पाहिलें आणि ती म्हणाली, 'बया ग, वाफ गेली जनूं चाकांतली!'

एका हातानें सायकल धरून सुखा वाटेवरच उभा होता. वरचेवर चाकाकडे आणि मागून येणाऱ्या वंचाकडे पाहात होता. ही बाई येईपर्यंत वाटेवर उभे राहाणें बरे दिसेल का? का आपण आपले पुढे चालूं लागावे? तिनें होऊनच जर मधलें अंतर काटलें आणि कांहीं बोलणें केलें, तरच बोलावें, सोबत द्यावी? असा विचार त्याच्या मनांत चालू होता. हा विचार सुखाच्या मनांत यावा याला कारणहि होतें. गांवांतल्या कुणाहि बाईशीं आपणहून बोलणें निराळें, आणि वंचाशीं बोलणें निराळें! तिच्याशीं बोलतांना गांवांतल्या कुणाहि तरुण माणसानें विचार करावा अशीच परिस्थिति होती. कारण वंचा ही पद्मिणीसारखी देखणी होती. लग्न होऊन आठ वर्षें झालीं तरी तिचें तरुणपण सारखें फुलतच होतें, आणि असलें देखणेपण जवळ असूनसुद्धां ही बाई फार मर्यादशील होती. तिच्याविषयीं गांवांत वाईट बोलवा अशी मुळींच नव्हती. विशेष म्हणजे उदनेवाडींत ही बोलवा नव्हती, ही ध्यानांत घेण्याजोगी बाब होती. कारण हें गांवच थोडें फाजील होतें. गांवांत पांचसात पोरें अशी होतीं कीं, त्यांनीं चांगली बाई अशी ठेवली नव्हती. त्यांच्यापाशीं कळाच अशा होत्या कीं, कितीहि साधीसुधी बाई बनेल व्हावी! हीं बांड पोरें खळगीं कापडें घालून नको तिथे भोकें पाडीत सारखीं हिंडत असायची. गांवांतल्या भल्याभल्या बायका त्यांनीं नादीं लावल्या होत्या, आणि सगळें गांव बाटवलें होतें. गांवांत भानगडी फार झाल्या होत्या. त्याला आवर घालणें मोठें कठीण होतें. या बाबतीत उपाययोजना करणें ही मोठी नाजुक बाब असते. अब्रूला संभाळायचें म्हणजे तोंड दाबून बुक्क्याचा मार सहन करावा लागतो. अशीं बरींच कुटुंबें गांवांत होती. या बायका असे कांहीं करतील असें कधींहि मनांत न आलेले त्यांचे नवरे माना खालीं घालून गांवांतून फिरत, बायकांवर करडी नजर ठेवत, त्यांना वेळोवेळीं काठीने बडवत, आणि तरीहि व्हायचें तें चोरून-मारून होईच. या सगळ्या घाणींत ज्या कांहीं थोड्या बायका चांगल्या राहिल्या होत्या, त्यांपैकी एक वंचा होती. पोटीं मूलबाळ नसलेली ही देखणी बाई नीट संसार करीत होती. तिच्या वाटेला कोणी गेलें नव्हतें.



सुखा वाटेवर उभा होता. भराभर पाय उचलीत वंचा जवळ जवळ येत होती. दिवस बुडाला होता. आतां दिसेनासे होणार होते. चांदण्या चमकणार होत्या. रातकिडे किरकिरणार होते. सुरेख वारा वहात होता. तांबड्यालाल पश्चिमेकडून वटवाघळांच्या झुंडी येत होत्या आणि पूर्वेकडे जात होत्या. पाकोळ्या फिरूं लागल्या होत्या; आणि अद्याप बरीच वाट चालायची होती.

दोन पायांवर लुगडें नेसलेली वंचा जवळ आली आणि धीर धरून सुखा म्हणाला,

"अंधार करून निगाला?"

सुखापासून चारसहा वावांवर वंचा उभी राहिली. हातांतील बाटल्या तिनें दगडाला टेकवून उभ्या ठेवल्या आणि पदराने गळ्याचा घाम पुसला. मंजुळ आवाजांत तिने म्हटलें,

"निगीन निगीन म्हनत झाला वं येळ."

बस्! एवढेंच ती बोलली. डोईवरचें गठळें तिने सारखें केलें. थोडका दम घेतला. आणि पुन्हा बाटल्या उचलून पाय उचलला. सुखाच्या बाजूनें पुढें होऊन ती चालूं लागली. मागून सुखा बोलला,

"ऐन टायमाला काटा लागला चाकाला. आतां सायकल ढकलत गांवापतूर जागं आलं!"

आणि सायकल रेटत तोहि चालूं लागला.

मागें गडीमाणसाच्या जाड पायतणांचा आवाज येत होता, त्यामुळें वंचाला निर्धास्त वाटत होतें. आतां गांवांत पोंचेपर्यंत उशीर झाला तरी हरकत नव्हती; सोबत होती. सुखा गांवचा होता. माहितींतला होता. त्याची सायकल ऐन वेळीं पंक्चर झाली हें बरेंच झालें होतें. वाटेनें चालतांना वंचाचे विचार सारखे घराकडे धांवत होते. आणखी थोडा वेळ वाट बघून नवऱ्याने गांवांत चौकशी केली असेल. बाजारला तो स्वतः गाडी जोडून यायलाहि निघेल...असे विचार तिच्या मनांत येत होते, आणि ती सपाट्याने पाऊल उचलीत होती. आणि मागून सुखा येत होता.

कांहीं वेळ एकमकाशीं न बोलतांच तीं दोघंहि अशीं वाटेनें चालत होतीं.

अंधार आला. आभाळांत चांदण्या चमकूं लागल्या. रातकिड्यांची किरकिर सुरू झाली. वंचाला वाटलें, सोबतीच्या माणसाशीं अक्षरहि न बोलतां वाट चालत राहणें बरें दिसतें का? हा माणूस कांहीं परका नाहीं; गांवचाच आहे. चांगला पोक्त आणि लेकराबाळांचा धनी आहे. मीहि कांहीं नवी पोर नाहीं. दोन शब्द बोलायला काय हरकत आहे? बोलत गेलों तर पायांखालची वाट लवकर संपेल. पण आपणच बोलण्यापेक्षां त्यालाच बोलूं दिलें तर? त्यानेंच बोलणें सुरू करावें. बायामाणसानें काय बोलायचें? ०

हा विचार मनांत आला आणि वंचाचीं पावलें हळू पडूं लागलीं. तिच्यातलें आणि सुखातलें थोडेसे अंतर कमी कमी होऊं लागलें. होतां होतां सुखा तिरपा उजव्या बाजूला आला आणि तीं दोघेहि बरोबरीनें चालूं लागलीं. दोघांच्या पावलांचा आवाज येत होता. सायकल वाजत होती. वंचाच्या हातांतल्या बाटल्या एकमेकींना थटून आवाज करीत होत्या. वाट हलके हलके ओसरत होती.

जवळ आलेल्या वंचाच्या लुगड्याचा सुरेख वास सुखाला आला. इरकली लुगड्याची खसखस, सळसळहि त्याला नीट ऐकूं येऊं लागली. आणि त्याचबरोबर तळलेल्या पदार्थांचा खमंग वासहि येऊं लागला. वंचानें लेकराबाळांसाठीं कांहीं मिठाई विकत आणली असावी. पण तिला पोर नव्हतं. मग ही मिठाई कुणासाठीं? कदाचित् तिच्या नवऱ्याला तिखटमिठाचे हे बाजारी पदार्थ खाण्याची इच्छा झाली असेल आणि त्यानें बायकोपाशी ते आणायला सांगितले असतील. किंवा नवऱ्याची आवड जाणून वंचानेंच हे पदार्थ मुद्दाम आणले असावेत. कांहीं का असेना, तिच्यापाशीं असलेल्या त्या खमंग पदार्थांच्या वासानें सुखाच्या तोंडाला पाझर सुटला होता. वरचेवर त्याला घुटका गिळावा लागत होता.

मग सुखा म्हणाला,

"अंधार झाला. अजून सोनाराचा मळा आला न्हाई. टाईम होनार गांवांत पोचायला."

वंचा म्हणाली, "व्हय कीं."

"अर्जुन पाटील म्हनत असतील, तुमी ध्यायला रातीं पावन्याकडं."

"न्हाती कशी?"

"न्हाई, टाईम झाला तवा त्येना वाटलं असंल म्हनतो मी—"

एवढं बोलणें झालें आणि वंचाच्या डोळ्यासमोर घराचा सोपा आला, जोत्यावर खांबाला टेकून बसलेले अर्जुन पाटील आले. उंचीनं बुटके आणि अंगाने सुटलेले. मिशा गोंजारीत ते बसले होते आणि अंगणांत बांधलेल्या बैलाला वैरण घालणाऱ्या भावाला म्हणत होते,

'अरं देवा, तुजी वयनी अजून आली नाहीं बाजारास्नं. कां बरं इतका येळ लागला?'

वंचा सुखाला उद्देशून बोलली,

"तरी बरं. पोरंबाळं न्हाईत नहान घरांत कालवा करायला."

आत्तां हें ती सहज बोलून गेली. पण ही तिची जखम नेहमीचीच होती. जेव्हां तेव्हां तिचें दुःख तिच्या बोलण्यांतून बाहेर उडी घेई. अलिकडे दुसरी बायको करावी असाहि विचार अर्जुन पाटलाच्या मनांत कधींमधीं येत होता, आणि वंचाचें हें दुःख जास्तीच गडद झालें होतें. ती मनांत झुरझुर झुरत होती.

सुखा म्हणाला, "देवाची तरी काय करणी म्हणावी. आमची इष्टेट काय वाया जात न्हाई, पर दर साला-दोनं सालानं पोर होतंया. आन् अर्जुन पाटील पोरासाठीं तरमळत्यात तर त्येना काय न्हाई. त्येंच्या मागनं, चार कां पांच वर्सांनी झालंय माजं लगीन!"

कांहीं वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं. वंचानें मनोमनीं सुखाच्या बायकोची मूर्ति डोळ्यापुढें उभी केली होती आणि ती तिचें रूप पाहात होती. रंगानें काळीसांवळी, रूपानें बेताची, अंगाने बारीक अशी असूनहि देवानें तिची कूस सुपीक केली आहे, आणि मला मात्र कांहीं नाहीं, असा विचार तिच्या मनांत येत होता. आपल्या स्वरूपाची भटी ही अशी सुरेख साधून देवाने काय मिळवलें असेल? पोटीं पोर नाहीं. आठ वर्षें झालीं तरी हें वांझपण फिटत नाहीं. सगळे उपाय केले. औषधें खाल्लीं. नवससायास केले. देवदेवरुषी केले. पण कशाचा कांहीं गुण नाहीं. असें करतां करतां ही नदरी कोनेजून जायची. इतके दिवस आशा करण्यांत घालवले, पुढचे दुःखीकष्टीपणांत घालवायचे!

"का वं, बोलाना काय? बोलण्याशिवाय वाट वसरत न्हाई."

"व्हय कीं, पर काय बोलायचं वसानानसानी?"

"आतां हें काय बोलणं झालं? बरोबर चार बायका सोबतीला असल्या तर गप्च चालला असता का?"

"बोलत्यां असतां कीं. बायाबायांच्या बोलण्याच्या गोष्टी येगळ्या."

सारें आभाळ आतां चांदण्यांनी गजबजून गेलें होतें. वारा वहात होता, वाटेकडेला असलेल्या झाडांतून आवाज करीत होता. अधूनमधून पिंगळ्याची जोडी बोलत होती. सुखानें हातांत धरलेल्या सायकलीचा पायटा वंचाच्या पायाला घासत होता. वंचाने बाजारहून आणलेल्या तळकटाचा वास सारखा दरवळत होता.

"बाटल्या द्या हिकडं माझ्याकडं."

"न्हाई. असूं द्या"

"नका, द्या. सायकलीला अडकवूं म्हनं"

"नका, फोडाल."

"मग गठुळं द्या. मला काय वझं न्हाई त्येचं. सायकलीलाच अडकिवतो—हँडलाला."

सुखानें फार आग्रह केला तेव्हां वंचानें एका हातानें डोईवरचें गठळें वरच्यावर थोडें उचललें. सुखाने सायकल आपल्या पोटाने तोलली आणि दोन्ही हातांनीं गठळें उतरवून घेतलें. तेव्हां वंचाच्या नरम दंडाला त्याचा हात लागला; आणि दहिंवरानें भिजलेल्या गुलाबासारखा, घामाने ओलसर झालेल्या वंचाच्या गळ्याचा, कपाळाचा वास त्याला आला.

सुखाच्या कठीण दंडाचा स्पर्श झाला आणि वंचाला विसू लागल्यासारखे झाले. तिची मान अवघडली होती, हात अवघडला होता. पडलेला पदर नीट घेऊन ती कांहीं न बोलतां चालूं लागली. हँडलला गठळें लावून



## सरबत

*लिंबकांती गे तुझी ती आणि जिव्हेवर शर्करा*
*सरबताचे घोट प्यालों, ओठ ओला हो जरा*
*चार दिवसांची कथा ती आंबली गे बाधली*
*अन् स्मृतीच्या सोकऱ्याची डांस मागें राहिली!*

**—वसंत सबनीस**





सुखा शेजारी आला तेव्हा वंचा म्हणाली, "गांव आलं. इतकी लांब आलें तरी पुढं गेले असते. काय लई वझं न्हाई गठळ्याचं—"

"कुठाय गांव? अजून सोनाराचा मळा आला न्हाई. उचला पाय."

"बया ग, तुमच्या बरोबरीनं माझं पाय उचलायचं व्हय?"

"न्हाई तर मग गांव कसं येनार?"

"ईना सावकास!"

"आं? पाटील वावंत गाडी जोडून म्हनून येळ लावताय का?"

"इक्ती न्हाई बायकूची काळजी त्येंस्नी—"

वंचा हें बोलून गेली आणि तिला वाटलें आपण उगीच बोललो. परक्या माणसापाशीं असें मनांतलें बोलणें बरें नाहीं. एक करतां एक अर्थ निघायचा. गांवांत बभ्रा व्हायचा. गेला शब्द सावरण्यासाठीं मग ती घाईनें म्हणाली,

"लईच येळ झाला. मानसं काळजी करत असतयाल घरांतली!"

"काळजी लागायचीच खरं, पन अर्जुन पाटील काय हरान काळजी करनारा मानूस न्हाई. दिवसभर रानांतनं दमून आलं असतील, त्येनं डोळा बी लागला असंल त्येंचा."

"व्हय कीं—झोपला लई अळकं हायेत बगा. आत्ता बोलतील अन् बोलता बोलता घोरायला लागतील."

"मानसाला काळजी नसली कीं झोप लगीच येती. त्येंना काळजी हाय का काय? शेतीमळा, गुरंढोरं, पैसाअडकं देवानं सगळं दिलंय त्येंना—"

"व्हय बाई, तेवढ्यानं काय दुख न्हाई बगा—!"

"आन् मग?"

"न्हाई म्हनायला एकाच गोष्टीनं कष्टी हायेत!"

"लेकरू म्हनतां काय? तुमाला वाटतंय, पन ती गोष्ट बायामानसा-इक्ती गडीमानसाच्या मनाला लागत न्हाई. आन् अजून काय वय गेलंय काय? हुईल सगळं नीट. अवं, देव मागं हुभा असल्यावर काय कमी पडत न्हाई. मानसाची न्हयात तेवढी चांगली पायजे. आन् त्यांत पाटलास्नी नांव ठेवायला जागा न्हाई. मानूस गांवांत उजवा."

बोलतां बोलतां उजवीकडचा सुखा डावीकडे आला होता. दोघांच्या मधली सायकल बाजूला झाली होती. डौलानें चालणाऱ्या वंचाचें अंग चुकून सुखाच्या अंगाला लागत होतें आणि त्यासरशी सावरून ती लांबून चालत होती, दोन पावलें मागे राहात होती. पण ही गाडीवाट अरुंद होती. अंधारांत अंतर नीट राखतां येत नव्हतें आणि चुकून माकून एकमेकाचा धक्का एकमेकाला लागत होता. पण चुकून कुणाला कुणाचा धक्का बाजारांत लागत नाहीं का? एकमेकाला धक्का मारणें निराळें आणि चुकून कापडाकापडाचा स्पर्श होणे निराळे!

"आतां तुमी म्हनताय खरं—बोलण्यानं बोलणं निगालं म्हनून सांगतें, न्हाई तर घरांतल्या गोष्टी भायेर कोन कुनाला सांगायला जातंय?"

"व्हय की."

"माजी काय वं चूक हाय त्यांत? लेकरंबाळं ही देवाची देनगी. मानसाच्या हातांतल्या गोष्टी हायेत का त्या? पर ह्येस्नी तें पटत न्हाई. माजाच रागराग करत्यात. सासू तशीच, सासरा तसाच आन् दाल्लाबी तसाच. मी म्हनते, करा लगीन दुसरं, तर सरकाराची परवानगी न्हाई म्हनं—"

रात्रीच्या वेळीं हें बोलणें उंच वाटत होतें. त्याची जाणीव एकाएकीं होऊन वंचा हें हळू आवाजांत बोलली. तें नीट ऐकूं यावें म्हणून सुखा आणखी जवळ आला.

"पर मी म्हनतों, बाराबारा वर्सांनी एकाएकाला पोरं हुत्यातच की."

"त्येला दम लागतो. हितं इष्टेट बाबा चाललीया नव्हं!"

"काय तरीच अर्जुन पाटलांचं."

"सारखं घरांत हिडिसफिडीस केल्यावर मानूस कुठपतूर सोसंल वं? मग मीबी बोलते एकांद्या वक्तीं काबानं! का झालं, उठलं मारायला. कासरा म्हनायचा न्हाई, चाबूक म्हनायचा न्हाई, गुरावानी अंगावर धावायचं!"

"आन् बाजीबाबाला खपतं हें? गळ्यांत माळ कशाला मग पंढरीची?"

"दावायला जगाला. लई की हाय म्हातारा. बोलनं हळू घेताचं. पर घरांत बगा, पोरापरीस बाप!"

"असं का?"

"व्हय की. लई हाय म्हातारा!"

मग घरादारांतल्या पुष्कळ गोष्टी निघाल्या. वंचा मनमोकळेपणाने बोलबोल बोलली. तिने सगळें कांहीं सांगून टाकलें. कधीं तिचा स्वर कांपरा झाला, तर कधीं उत्तेजित झाला. वळणें घेऊन बोलणें होत राहिलें आणि चंद्र आभाळांत दिसूं लागला. मंद चांदणें पडलें.

सावल्या हलूं लागल्या. किंचित् गारठा सुटला.

पदरानें अंग लपेटून घेऊन वंचा सुखाबरोबर चालत होती. अंगाला अंग लागेल याची भीति तिला आतां वाटत नव्हती. उंचापुरा आणि धट्टाकट्टा सुखा आपल्या बरोबरीने चालतो आहे, आपल्या सोबतीने तो थोडासा खुलला आहे याचे तिला सुखच झालें. पण हें सुख उघड नव्हतें. तिचे तिलाहि ते नीट जागवत नव्हतं. थोडेफार जाणवल्यामुळें तिला एकीकडून बरें वाटत होतें आणि दुसरीकडून तिलाच वाटत होतें, हें बरें नाहीं, ही वागण्याची पद्धत नाहीं!

सुखदेव थोडासा धीट झाला होता. आणि त्याची त्यालाच मोठी गंमत वाटत होती. एखाद्या मांजरानें मजेंत उन्ह खावे तसे हें चांदणें तो खात होता. गांवांतल्या भल्या भल्या माणसाशींसुद्धां मनमोकळेपणानें दोन शब्द न बोलणारी ही देखणी बाई आपल्याला मनांतलें सगळे सांगते आहे, या गोष्टीने त्याला स्वतःचाच थोडा अभिमान वाटूं लागला होता. तरी पण अद्याप त्याची भीति मोडली नव्हती. आपला तोल थोडासुद्धां जाऊं नये याची खबरदारी तो घेत होता. पण दारू प्याल्यावर








झिंगणेच तेवढें कसें टाळतां येईल ?" तो शक्य तितक्या गंभीरपणें म्हणाला,

"फार येळ झाला, गाडी येतीया आतां तुमची !"

यावर जवळून चालणाऱ्या बंचानें मान वळवून उगीचच त्याच्याकडे पाहिलें. ती लवकर बोलली नाहीं. आणि बोलली तेव्हां चांदण्यासारखेंच तिचें बोलणेंहि मवाळी आलं—

"इतकं ऐकलेसा मघापासनं, अन् वर असं बोलतां ?"

तें बघणें आणि या बोलण्यांतला हा स्वर सुखाला वेगळा वाटला. आंतल्या आंत तो बावरा झाला.

"न्हाई, चांद उगवला म्हनतां—"

"उगवूं द्या. आपन वाटंला नसतां तरी त्यो उगवलाच असता कीं. चालल्याचालल्यानं माजं पाय दुकून आलं बघा !"

"मग थांबतां का थोडकं ?"

"हां ? उशीर झाला म्हनून तुमीच दटावताय आन् थांबायला बी तुमीच सांगताय. काय म्हनावं ह्या दुतोंडी बोलन्याला ?"

आजुबाजूला शेतें होती. त्यांतले उभं पीक चांदणें घेत उभं होतें. बंचा एकदम म्हणाली,

"पिकं कमरंपतूर आली की—"

सुखी पिकाकडे बघत म्हणाला, "व्हय की."

बंचाचा ऊर उगीचच धडधडला. शरमेनें ती ऊन ऊन झाली. आपण जमिनीवरून चालतां आहोंत असें तिला वाटेना.

सुखा तिच्या अंगाला अंग लावून म्हणाला,

"बोला ना कां ?"

"बोलणंच झालं की येदूळपतूर !"

"पर वाट तरी वसरली पायजे—"

"झालं. आतां गांव ईल. सोनाराचा मळा कवाच गेला मागं. बामनाचा वड आला न्हय ! ह्या टेकावरनं बघितलं की गांवातलं दिवं दिसतील."

"व्हत की"

मग एकाएकी बंचा वाटेवरच उभी राहिली आणि पलीकडे असलेल्या बांधाकडे जात म्हणाली,

"या म्हणं, बसू या थोडकं"

सुखानें सायकल झाडाला टेकवून उभी केली. ती दोघेहि बांधावरचे खडे सांवरून एकमेकांशेजारीं बसलीं. ओटी सोडून बंचानें कागदाचा पुडा बाहेर काढला आणि तो उलघडून सुखापुढें धरीत म्हटलें,

"मेवा खाता का ?"

मघापासून येणारा खमंग वास सुखापुढें उघडा झाला. तो तर कधींचाच भुकेला होता. चिरमुरे, शेव, गांठी याचा तो पुडा समोर येतांच त्याच्या तोंडाला पाणी सुटलें. मूठ भरून घेत त्यानें विचारलें,

"आन तुम्ही बं ?"

"मी घेतें मागनं. पयलं तुमी तर खा"

सुखाच्या तोंडांत कुरमुरे वाजूं लागले. त्याच्या तोंडाकडे बघत बंचा बसून राहिली. तिनें दोन्ही पाय पोटाशीं घेतले होते, हाताचा मुटका गालावर टेकून ती मोठ्या मोठ्या डोळ्यांनीं सुखाकडे पहात होती. सुखा भुकेला होता.

चंद्र पाझरत होता. चांदणें झिरमिरत होतें. झाडेंझुडें भिजत होतीं. बाजाराची वाट आतां जवळजवळ संपली होती आणि उदनवाडी आली होती.

• • •










अनुक्रमणिका

*...अशी मासळी आणि अशीं माणसें मिळत राहिलीं, तर माझी प्रतिभा ओसरण्याचें भय नाहीं. आमरण तिचा विलास चालत राहील!*

# मासळी आणि माणसें



—वा. भ. बोरकर

त्या पत्रानें मी एकदम भानावर आलों. नाटकाच्या जागरणानंतरच्या झोपेंतून कुणीतरी गदगदां हालवून उठवावें तसा. माझ्या संपादक मित्रानें मला चांगलेंच खडसावलें होतें. इतकीं स्मरणपत्रें पाठवलीं तरी मागितलेल्या निबंधाचा पत्ता नाहीं कीं साधें पत्रोत्तर नाहीं म्हणून त्यानें मला छेडलें होतें आणि पुढें म्हटलें होतें, 'कसलीच सबब चालणार नाहीं. निबंध तावडतोब पाठवून द्या. अगदीं फर्मास.'

गडी रागावला आहे हें मी ओळखलें होतें. पण त्याची मला फारशी खंत नव्हती. कारण गोव्याच्या माणसाला खऱ्या अर्थानें रागावतां येत नाहीं हें मला पक्कें माहीत आहे. तो रागाचा केवळ बहाणा असतो आणि एक वेळ खरा असला तरी तात्कालिक असतो. आडोळ्या पावसासारखा खळखळ करीत येतो...आणि हां हां म्हणतां अनुरागाचीं उन्हें टाकून चार क्षणांत अदृश्य होतो.

अर्थात् त्याच्या रागाची मला खंत नव्हती; पण स्नेहाचें अगत्य होतें. त्याची समजूत काढायची होती आणि निबंध वेळेवर पाठवायचा होता. पण कांहीं केल्या त्याला हव्या असलेल्या 'फर्मास' निबंधासाठीं विषय सुचत नव्हता आणि त्याची समजूत काढील अशी योग्य सबबहि सुचत नव्हती.

खरें कारण मला चांगलें माहीत होतें. कुणाहि गोवेकराला तें सहज पटलें असतें. पण तें पत्रांत कसें लिहायचें? इथें या दिवसांत सृष्टि सुंदर आहे, हवा मिठास आहे, सवड मुबलक आहे, लिहिण्याची इच्छाहि खूप आहे. पण एवढें सारें भांडवल फर्मास लेखनाला पुरेसें नाहीं. त्यासाठीं मासळी लागते, माणसें लागतात. त्यांच्या अभावीं माझी लेखणी पंगळून पडली आहे हें त्याला कसें लिहायचें? आजकाल अशीं दिलखुलास पत्रें लिहायचीहि चोरी झाली आहे. केव्हां चार चौघांत येतील आणि अर्थ घेतील याचा काय नेम! आणि एवढा धोका पतकरायचाच तर निबंधच लिहिलेला काय वाईट? आपली पुरी कैफियत तरी लोकांसमोर येईल आणि तिची योग्य कदर करणारा निघेल एखादा समानधर्मा.

कुणाला पटो, न पटो माझी ही अडचण सोळा आणे खरी आहे. इथें सारें कांहीं आहे; पण मासळी मिळत नाहीं आणि माणसें भेटत नाहींत हीच माझी मोठ्यांतली मोठी व्यथा आहे. त्यांच्याखेरीज मला लिहिण्याचा उत्साहच वाटत नाहीं. केवळ अनुभवाची पुंजी वाढल्यानें चांगलें लेखन होत नसतें. तो अनुभव रंगून सांगावा लागतो. तेव्हांच त्यांतलें सत्य जिवंत होतें. ही किमया उत्साहाशिवाय घडत नाहीं. त्यासाठीं मला तरी मासळी आणि माणसें या दोन्ही गोष्टी अवश्य लागतात. जेवणाला मासळी आणि बैठकीला माणसें.

मासळी हवी; पण ती गोड्या पाण्यांतली असून भागत नाहीं. असल्या अळणी मासळीनें जेवणांत 'लावण्य' येऊं शकत नाहीं. त्यासाठीं ती खाऱ्या पाण्यांतली किंवा जोडपाण्यांतलीच पाहिजे. आणि तीहि ताजी, रसरशीत. ती जरा 'सुद्धां लागलेली असतां कामा नये आणि बर्फांत थिजलेली तर मुळींच चालायची नाहीं.

अशी रसरशीत मासळी जेव्हां नारळाच्या रसांत आणि खोबऱ्याच्या तेलांत गांधली तळली जाते, आतिथ्यशील आणि कसबी सुगरणीकडून आग्रहानें वाढली जाते आणि कोडकौतुकें करीत आस्वादली जाते, तेव्हां साऱ्या रसांची मुळी असलेली रसना आनंदाचें मूलद्रव्य स्रवूं लागते. अन्नांतले रस, शरीरांतले रस आणि साहित्यांतले रस यांच्यांत मैत्र जमून ते साम्यांत येतात आणि असा कांहीं रंग उभा करतात कीं, अंतरंगांतला रसेश्वर मनापासून खुलूं डुलूं लागतो आणि पुष्टितुष्टीची प्रसन्न कांति दाखूं लागतो.

भोजनाचा हा असा आनंद ज्यांनीं कधीं घेतला नाहीं त्यांची मला कींव येते. आनंदाचें भोजन करण्याच्या कितीहि गप्पा त्यांनीं मारल्या, तरी त्या मला फसवूं शकत नाहींत. ज्यांना असला अगदीं प्राथमिक आणि सर्व सुलभ आनंद देखील नीट घेता येत नाहीं आणि तो विकसित करण्याची कला साधत नाहीं, ते उच्च सात्त्विक आनंदाची पायरी गांठूं शकतील हें सर्वस्वी असंभव आहे. भोजन म्हणजे केवळ उदरंभरण समजून कोण त्याला स्वार्थाचें कुपण घालतो, तर कोण तें जोखमीचें यज्ञकर्म मानून तें भारभूत करून घेतो आणि त्यामुळें दोघेहि या आनंदाला मुकत असतात. या आनंदाची लज्जत आणि रंगत वाढवायची असेल तर पंक्तीला रसज्ञ भोक्ते हवेत. असले भोक्ते आपल्या संख्येनें तो आनंद द्विगुणित करतात आणि आपल्या रसज्ञतेनें त्याची पातळी वाढवीत नेतात.

भोजनाच्या आनंदाचें हें रहस्य वैदिकांनीं ओळखलें होतें. म्हणूनच त्यांनीं घोषणा केली



अनुक्रमणिका






'सहनौ भुनक्तु.' त्यांना जें सहभोजन अभिप्रेत होतें तें अर्थात्‌च प्राणान्नाचें होतें. तृणान्नाचें नव्हे. अतिरेकी अहिंसेच्या नादीं लागून जीवनाच्या ह्या रसस्रोताला आंचवलेल्या जैन-बौद्धांची त्यांनीं वेळीं अवेळीं चेष्टा केली, ती या प्राणान्न भोजनाचें मोल त्यांना कळलें होतें म्हणूनच. मला तरी वाटतें कीं त्यांच्यांतल्याच पहिल्या रसवेत्त्यानें जिव्हा आणि वाणी या उभयतांसाठीं 'रसना' या एकाच शब्दाची अर्थपूर्ण योजना केली. जिव्हेचें असें षोडशोपचार कोड-कौतुक झाल्याशिवाय शरीराची रसप्रक्रिया रंगांत येत नाहीं. मन पालवत नाहीं. स्मृति मोहरत नाहींत, प्राण ताजातवाना होत नाहीं आणि त्याच्या अंतरंगांतलें सारस्वत पिकत नाहीं. द्वादश वर्षांच्या सार्वत्रिक दुष्काळांत देखील सारस्वत ऋषी वेदांचें आणि शास्त्रांचें प्रसन्न चित्तानें जतन करूं शकला, याचें रहस्य त्यानें आरंभलेल्या मत्स्याहारांत होतें यांत मुळींच शंका नाहीं. त्याची वेदाध्ययनाची परंपरा आम्हां मत्स्याहारी ब्राह्मणांतून आतां लोप पावत असली, तरी त्यानें मागें ठेवलेली मत्स्यसेवनाची आणि म्हणूनच प्रसन्न जीवनाची परंपरा जोंवर आम्ही जिवापाड टिकवीत आहोंत तोंवर आम्हांला भीति नाहीं. जुने वेद आणि जुनीं शास्त्रें दुरावलीं तरी एवढ्या भांडवलाच्या जोरावर आम्ही नवे वेद आणि नवीं शास्त्रें निर्माण करूं !

मत्स्याहार आणि साहित्य यांचें घनिष्ठ नातें सिद्ध करायला फार लांब जायला नको. मासळीच्या सेवनानें कुणीहि बोलका होईल. त्यांत विस्मयकारक असें कांहींच नाहीं. पण ज्यानें एकदां तिचा खराखुरा स्वाद चाखला तो तिच्या दर्शनानें— एवढेंच काय तर स्मरणानें देखील बृहस्पतीसारखा बोलूं लागतो. आपण बोलतांना पट्टीच्या साहित्यिकांनाहि लाजवीत आहों हें त्यांच्या ध्यानींमनींहि नसतें. तो केवळ शब्दांनीं बोलत नाहीं, तर शब्दांच्या अर्थक्षमतेची उणीव क्षणोक्षणीं बदलणाऱ्या भावमुद्रांनीं आणि अंगविक्षेपांनीं भरून काढीत असतो. गोव्यांत तुम्ही कुठेंहि जा. असलीं बोलकीं माणसें तुम्हांला हरघडी आढळतील.

त्यांना विषयांची कधीं वाण पडत नाहीं. वेळेचें भान रहात नाहीं. विशेष परिचयाची गरज वाटत नाहीं. मोठमोठे सामाजिक किंवा राजकीय प्रश्न लागत नाहींत. कसलीहि किरकोळ बाब त्यांना पुरते. तासन् तास ते त्यांत रंगून बोलत असतात आणि जीवनोत्साहाची उधळण करीत असतात. त्यांच्या सहवासांत जीवन ही फुलासारखी खेळवीत खेळवीत हुंगण्याची वस्तु आहे याचा आपल्याला पदोपदीं प्रत्यय येतो.

मला बैठकीला माणसें लागतात तीं हीं असलीं. अशीं माणसें आज शहरांतून दुर्मिळ होत चाललीं आहेत. शहरांतील माणसें भेटतील पण कामापुरतीं. बोलतील तीं व्यवहारापुरतें. तोलून मापून. आंखून रेखून. त्यांचा वेळ बांधलेला, वृत्ति बांधलेल्या आणि तींहि बांधलेलींच. वेळेचा हिशेब श्रमांत, श्रमाचा हिशेब फायद्यांत आणि फायद्याचा हिशेब रुपये आण्यांत असा त्यांचा खाक्या. ते बोलण्याऐवजीं लिहि-तील. 'शतं वद, मा लिख' या वचनाचें मोल त्यांना कळायचें नाहीं. लहान लहान गोष्टींचा आनंद घेणें, किरकोळ बाबींनेंसुद्धां धुंद होणें त्यांना जमायचें नाहीं. टेकडी चढायची झाली तरी ती तीं आयुर्वर्धनासाठीं चढतील आणि पोहायला गेलीं तरी किती आरोग्य पदरांत पडलें हें पडताळून पहातील. त्यांतलीं कांहीं त्याग, दान, सेवा असल्या गोष्टींनाहि जीवित वहातील. पण त्यांनीं डोक्यावर घेतलेलें तें ओझें असतें. तो स्नेहाचा, आनंदाचा विलास नसतो. अशा या ओझ्याखालीं त्यांच्या मुद्रेवरची रोषनी मावळलेली असते. अशा लोकांच्या दुर्मुखलेल्या उपकृत्यांपेक्षां जीवनोत्साहानें धुंद असलेल्या निरुद्योगी पण स्नेहल

माणसांचा हंसतमुख सहवास मला अधिक लोभनीय वाटतो. आनंदाचे हे स्पर्शमणि जीवनाच्या समृद्धीनें आपणाला न्हाणीत असतात. हीं माणसें फारशीं व्युत्पन्न नसलीं, तरी त्यांच्या संपर्कात आपण रंगून जातों, उल्हसित होतों आणि साहित्याला अवश्य असलेला उत्साह सहजच आपल्याला मिळून जातो.

माझ्याप्रमाणेंच माझ्या अनेक स्नेह्यांनाहि हा फरक जाणवला आहे. ते मला विचारतात, "तुमच्याकडचे लोक लहानसहान गोष्टींतदेखील रंगून जातात, धुंद होतात, हातवारे करीत बोलतात, तसें आपल्याकडे कां होत नाहीं? हा त्या मातीचाच गुण आहे काय?"

त्यावर गमतीनें मी म्हणतों, "हा त्या मातीचा गुण नाहीं. तिथल्या पाण्याचा आहे. त्या पाण्यांतल्या मासळीनें तो आमच्या अंगीं येतो."

यांतला विनोद सोडून दिला तरी या विधानांत पुष्कळच तथ्य आहे. मासळीनें त्यांना भोजनाचा आनंद घ्यायला शिकवलें आहे आणि त्यामुळेंच जीवनातल्या सर्व लहानमोठ्या आनंदाचा ते मुक्त मनानें आस्वाद घेऊं शकतात.

अशी मासळी आणि अशीं माणसें हें जीवनाचें वैभव आहे आणि साहित्याचें मूलधन आहे असें मला वाटतें. जगांत आजवर जें कांहीं चांगलें साहित्य निर्माण झालें असेल, तें मला वाटतें, त्यांच्याच प्रेरणेनें. निदान माझ्यापुरतें तरी हें शंभर टक्के खरें आहे. त्यांचा मी खरोखरच ऋणी आहें. जिथें जाईन तिथें जर मला अशी मासळी आणि अशीं माणसें मिळत राहिलीं, तर माझी प्रतिभा ओसरण्याचें मला भय नाहीं. आमरण तिचा विलास चालत राहील. म्हणूनच माझी इच्छा आहे कीं, अशा मासळीवर पोसलेला माझा हा देह शेवटीं मातीला मिळण्याऐवजीं पाण्याला मिळावा आणि ज्या माशांनीं मला आयुष्यभर सुखानें जगवलें, त्यांचें मुख थोडा वेळ तरी माझ्या मुळें गोड व्हावें. माशांच्या स्नेहाची अशी थोडी तरी फेड व्हावी असें जसें मला वाटतें, तसेंच माणसांच्या बाबतींतहि वाटतें. त्यांच्या सकारण धुंद आनंदांत थोडी तरी भर पडेल असें कांहीं तरी साहित्य मी मागें ठेवून जाऊं शकलों, तर माझ्या शरीराप्रमाणें माझ्या चित्ताचेंहि सार्थक झालें असें मला वाटेल. त्यासाठीं एखादें 'नवें मत्स्यपुराण' मला लिहायचें आहे. कारण संस्कृतीचा आणि जीवनाचा विकास म्हणजे मासा आणि मनू यांच्या कथेचाच वाढता विकास आहे. नाहीं का?

आतांच पहा ना. ज्या मासळीचें आणि माणसांचें मी गुणगान इतका वेळ करीत आलों, त्यांची माझी कित्येक दिवसांत गांठभेट झालेली नाहीं आणि तरी देखील केवळ त्यांची आठवण निघाल्याबरोबर माझी रसवेल कशी अगदीं तरारून आली! यावरून त्यांचा लाभ होता, तर हा निबंध किती 'फर्मास' झाला असता याची तुम्हीच कल्पना करा.

'फर्मास' नाहीं तर नाहीं. पण एवढा निबंध मुदतीपूर्वी लिहून झाला आणि माझ्या मित्राचा रोष घालवण्याचें श्रेय मिळालें हें काय थोडें झालें?

• • •






APHALI



# क्षणाची सोबत

—अच्युत बर्वे

पंचवीस वर्षांच्या माझ्या आयुष्यांत मी कधीं कुणाची वाट पाहिली नाहीं; तसा माझा स्वभावच नाहीं. कधीं कुणासाठीं ताटकळत राहिलों नाहीं; तें मला मानवणारें नाहीं. कुणासाठीं जीव टाकला नाहीं; तसा माझा पिंडच नाहीं. कधीं कुणाची पर्वा केली नाहीं, कुणाचा ध्यास घेतला नाहीं कीं कुणाची उगाच मिजास सांभाळली नाहीं. हिरवळीवरून चालावें तशी मी माझ्या आयुष्याचीं सोनेरीं वर्षें अल्लदपणें ओलांडलीं. फुलांनीं फुलावें किंवा चांदण्यांनीं उगवावें तितक्या सहजपणें माझें आयुष्य विकसित झालें. वाटेंत आले त्यांना मी ठोकरून लावलें आणि ज्यांनीं माझ्याशीं हातमिळवणी केली, त्यांना वेळोवेळीं डोक्यावर घेऊन नाचलों. विश्वविद्यालयाच्या परीक्षा सन्मानानें पास झालों. नामांकित खेळाडू म्हणून क्रीडांगणावर चमकलों. मोठ्या पगाराची झक्कपैकीं नोकरी पटकवली. पुढें पुढें सरकत गेलों. फुललेल्या फुलाचा सौरभ अवकाशांत दाटावा तसा माझा कीर्तिसुगंध आसमंतांत दरवळला. पंचविशी ओलांडायच्या आंतच पैशाचें आणि सन्मानाचें गांठोडें पाठीशीं घालून मी स्थिर उभा राहिलों. अशावेळीं मला कुणी सांगितलें असतें कीं, जे इतर सामान्य तरुणांच्या बाबतींत होतें तें तुझ्या बाबतींत होणार आहे, तर मी खदखदां हसलों असतों आणि सांगणाऱ्याला गचांडी दिली असती. पण हें झालें होतें, होत होतें आणि तेंहि एका पोरीपायीं...

लग्नाच्या बाजारांत मला भाव होता. अनेकजण माझ्यावर लक्ष ठेवून होते. ऑफिसांत, स्टेशनावर, सिनेमागृहांत माझ्याकडे वारंवार नजरा वळत होत्या. मुग्धेपासून प्रौढेपर्यंत अनेकांनीं मला हेरला होता. मुग्धेनें स्वतःसाठीं, तर प्रौढेनें आपल्या उमेदींत येणाऱ्या मुलीसाठीं. मी जिथें जात होतों तिथें मुली माझ्याभोंवतीं जमत होत्या. लोभस नजरा माझ्यावर फिरत होत्या. माझ्या बारीकसारीक आवडीनिवडींकडे लक्ष पुरवलें जात होतें. माझी मर्जी संपादन केली जात होती. माझ्याभोंवतीं असलेल्या प्रभावळींत पारशी पोरी होत्या, ख्रिश्चन होत्या, ज्यू होत्या, सारस्वत होत्या, ब्राह्मण होत्या. नर्गिस कात्रक, ल्यूसी डिसोझा, जेरूषा रुबेन, वत्सला रांगणेकर, इंदू साठे अशा अनेक नांवांचा गराडा माझ्याभोंवतीं पडला होता.

*क्षणभर हातांत हात घेतला; क्षणभर नजरेला नजर भिडवली; पण त्यामुळें मोठा चमत्कारिक प्रसंग आला—*

अनुक्रमणिका

त्यांपैकीं कुणालाहि मी दाद देत नव्हतों. कुणाला स्पर्शहि करीत नव्हतों. हंसण्याखिदळण्यापुरतेंच मी हें सारें मर्यादित ठेवलें होतें. अनेकांनीं माझ्यासाठीं खटपट केली, जाळ्यांत ओढण्याचा प्रयत्न केला, वासनेंत भिजवून काढायचा चंग बांधला. पण मी कोरडा ठणठणीत राहिलों. पाऱ्याच्या चपळतेनें प्रत्येकीच्या हातून निसटलों. मी असा तसा बधत नाहीं, त्याअर्थी मी सनातनी आहे, सनातन मूल्यांवर माझा विश्वास आहे असा ग्रह रूढ चाकोरींतून जाणाऱ्या मुलींच्या पालकांनीं करून घेतला. त्यांच्या जिवांत जीव आला. रीतसर मार्गानें मला गटवण्याचे सोपस्कार सुरूं झाले. मुली सांगून येऊं लागल्या. फोटो, पत्रें आणि पत्रिका यांचा माझ्या घरीं खच पडूं लागला. कामसेना, मन्मथप्रिया अशा उघडउघड शृंगारसूचक नांवांपासून गंगा, गोदा अशा बालबोध वळणाशीं नातें जोडणाऱ्या नांवांनीं मी गुदमरून जाऊं लागलों. वडीलधाऱ्यांच्या आग्रहाखातर मी मुली पाहूं लागलों आणि एकापाठोपाठ एक नाकारूं लागलों. बांध्यानें उंच असलेली मुलगी ठेंगणी ठुसकी नाहीं म्हणून नाकें मुरडीत होतों आणि ठेंगणी ठुसकी मुलगी शेलाटी अंगकाठीची नाहीं म्हणून तोंड वाकडें करीत होतों रेखीव नाकाडोळ्यांची मुलगी काळी सांवळी आहे म्हणून नाकारीत होतों, तर वर्णानें उजळ असलेल्या मुलीचे अवयव गोबरे आहेत म्हणून तिला नापसंत करीत होतों.

मी इतक्या मुली पाहिल्या, पण एकीनेंहि माझें लक्ष वेधून घेतलें नाहीं. एकीनेंहि माझ्या काळजाला हात घातला नाहीं. एकही माझ्या मनांत शिरली नाहीं. आपल्या सौंदर्यानें, आपल्या स्वभावानें, आपल्या हालचालीनें मला बांधून ठेवूं शकेल अशी एकही आढळली नाहीं. माझ्या ह्या वधूपरीक्षेला मी कंटाळलों, वडीलधारी माणसें वैतागलीं आणि नातेवाईक कातावले. सर्वांच्या संमतीशीं जुळेल अशी मी तडजोड करावी अशा गोष्टी सुरूं झाल्या. थोडीफार दमदाटीची भाषा ऐकूं येऊं लागली. बिचारे! माझ्या अंतरीच्या कळा कुणालाच कळत नव्हत्या. मिश्र रागिनीची खुमासदार लज्जत असलेल्या षौकिनाला खडे सूरकी रागिन कशी रुचणार ?

दमदाटीनें मी वळत नाहीं असें पाहून आर्जवाची कळकळीची भाषा सुरू झाली. माझ्या सर्वथैव पसंतीस उतरेल अशी मुलगी मामांनीं शोधून काढली. इतरांनीं दुजोरा दिला. मी विशेष खळखळ न करतां मामांनीं शोधून काढलेल्या या मुलीला पसंत करावें म्हणून आग्रह झाला. बॅरिस्टर नगरकरांची ही मुलगी तशी चांगली होती. रूपानें उजवी होती. गोल चेहऱ्याची, उंच पण किंचित् स्थूल. गोंडस देहाची ही मुलगी कुणालाही आवडेल अशी होती. पहिल्या झटक्यांत मलाही ती आवडली. पण पुन्हा पुन्हा तिच्याकडे पाहूं लागलों, तेव्हां तिची वैगुण्यें माझ्या ध्यानांत येऊं लागलीं. स्थूलपणाबरोबर असलेली मंदता आणि टपोऱ्या डोळ्यांतली स्थिरता माझ्या वृत्तीला मानवणारी नव्हती. त्यामुळें मी नकार दिला नाहीं तरी पसंतीची मानही डोलावली नाहीं. 'पाहूं—आतांच काय आहे' अशा शब्दांत संभावना करून उडवाउडवी केली. पण वडीलधारी माणसें आतां स्वस्थ बसायला तयार नव्हतीं. ह्या मुलीला मी होकार दिलाच पाहिजे म्हणून त्यांनीं गळ घातली. तशी थोड्याफार प्रमाणांत ती मलाही आवडली होती. त्यामुळें झटकून टाकायला माझें मन राजी नव्हतें. जमल्यास चालढकल करावी एवढाच माझा बेत होता. पण माझा हा बेतही ह्या लोकांनीं हाणून पाडला. पुन्हा पुन्हा आर्जवाची, विनंतीची भाषा सुरूं झाली. वाटल्यास मी तिला पुन्हा पहावें, एकांतांत भेटावें असेंहि सुचवून झालें. ही सूचना








मात्र मला पटण्यासारखी होती. तिनें माझ्याबरोबर सिनेमाला यावें, तास-दोनतास माझ्या सहवासांत रहावें म्हणजे मी नक्की काय तें सांगेन असें भीत भीत मी वडीलधाऱ्यांच्या कानावर घातलें. माझ्या म्हणण्याला मुलीकडचीं माणसें एकदम कबूल झालीं. तिला घेऊन मी सिनेमाला जावें असें सर्वानुमतें ठरलें.

तिला सिनेमाला घेऊन जाण्याच्या माझ्या सूचनेचा तिच्याकडच्या माणसांनीं स्वीकार केला, तरी तिला सिनेमाला पाठवतांना सावधगिरी बाळगली. पण ही सावधगिरीच त्यांच्या आड आली. कुसुमावतीबरोबर त्यांनीं तिची मैत्रिण पाठवली होती. आम्ही भेटलों तेव्हां, मैत्रिणीची ओळख करून देण्यासाठीं कुसुमावती म्हणाली, "ही माझी मैत्रीण, वैजयंती साळगांवकर..." आणि तिनें पुढें केलेला हात हातांत घेऊन मी म्हटलं, "मी मधुसूदन शारंगपाणी–" आणि हंसत हंसत तिच्याकडे पहात राहिलों. माझा हात तिच्या हातांतच राहिला आहे हें पाहून कुसुमावती म्हणाली, "चला. ड्रिंक तरी घेऊं–" तिच्या ह्या बोलण्यानें मी भानावर आलों. वैजयंतीचा हात सोडून दिला आणि म्हटलं, "चला कीं—"

थंड पेयाचा चषक माझ्या हातांत होता तरी हातांना गारवा वाटत नव्हता. वैजयंतीचा हात मी क्षणभरच हातांत घेतला होता, पण त्या हाताचा उबदार, मऊ स्पर्श अजूनही माझ्या हाताशीं खेळत होता. हातांतून हात काढून घेतांना तिची रंगीत अणकुचीदार नखें माझ्या तळव्यांना टोचलीं तेव्हां मीं विव्हल झालों होतों. ती हुळहुळ अजूनही तळव्यावर रेंगाळत होती. तो हात पुन्हां हातांत घ्यावा, तो स्पर्श पुन्हां पुन्हां अनुभवावा असें मला वाटूं लागलें. मी तिच्याकडे सहज म्हणून पाहिलें तों चषकाआडून ती माझ्याकडेच पहात असल्याचें दृष्टीस पडलें. मी तिच्याकडे स्नेहार्द्र नजरेनें पहात आहें हें तिच्या लक्षांत आलें, तेव्हां तिनें पापण्यांची उघडझांप केली. दृष्टी कुसुमावतीकडे वळवली आणि विचारले, "आंत जायचं ना ?" माझ्याकडे पाहतांना मी तिला पकडली; त्यामुळें तिचा गोंधळ उडाला होता. अशावेळीं माणसें असंबद्ध बोलतात. तशीच तीही बोलत होती. पिक्चर चालू व्हायला चांगलीं पंधरावीस मिनिटें होतीं, तरी 'आंत जायचं ना ?' असं घाईत येऊन कुसुमावतीला विचारीत होती.

प्रियकराला संकेतस्थानीं आणण्यासाठीं प्रेयसीनें आपल्या जिवलग सखीची योजना करावी, पण प्रियकराचें, दूतीकर्म करणाऱ्या सखीवरच मन जडावें तसें झालें होतें. पसंतीचें शिक्कामोर्तब करण्यासाठीं मीं कुसुमावतीला घेऊन आलों होतों आणि वैजयंती नजरेंत भरली होती. ओढाळ मन तिच्याकडे धांव घेत होतें. तिच्याशीं सलगी करूं पहात होतें. जणूं पूर्वसंचितानुसार तिची आणि माझी गांठ पडत होती. जणुं अशा ठिकाणीं आणि अशा तऱ्हेनें गांठ पडावी हें ठरलेलेंच होतें. जणुं तिच्यासाठींच मी इतके दिवस थांबलों होतों माझी चलबिचल आणि तिची असंबद्ध वागणूक कुसुमावतीच्या लक्षांत आली असावी. आमचें हें वागणें तिला सर्वस्वी नापसंत असावें. मध्यंतरानंतर डोकें दुखण्याचें निमित्त करून तिनें सिनेमा अर्ध्यावरच सोडला. वैजयंतीकडे पाहून खोंचकपणें म्हटलें, "मी नाहीं म्हणून तुला संकोच वाटायला नको." आणि आम्हां दोघांकडे पाहून ती पुटपुटली, "तुम्हांला बसायचं असेल तर खुशाल बसा. माझी आडकाठी नाहीं.. मी चाललें" आणि ती सरळ चालूं लागली.

तिनें आम्हां दोघांनाहि फटका मारला होता. बिचाऱ्या वैजयंतीची मात्र मधल्यामधें कुचंबणा झाली. तिनें एकवार माझ्याकडे पाहून घेतलें. जें अनेक शब्दांनीं सांगतां येणार नाहीं तें तिनें एका दृष्टिक्षेपांत सांगून टाकलें. जणुं तिला म्हणावयाचें होतें, 'तुम्हीच सांगा. मी तरी काय करूं?' पण केवळ संकोचामुळे ती असं कांहीं बोलली नाहीं. माझ्याकडे पहात पण कुसुमावतीला हाका मारीत ती तिच्या दिशेनें झपाझप चालूं लागली. आणि मी एका हाताने कमरेवर हात घेऊन तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात राहिलों.

आयुष्यांत होणारे चमत्कार नेहमीं क्षणा दोन क्षणांतच होत असतात. आयुष्यभर खूण राहील अशी जखम डोळ्याचें पातं लवतें न लवतें एवढ्या अवधींत होऊन जाते. वैजयंतीचा हात मी क्षणभरच हातांत धरला होता, क्षणभरच तिच्या नजरेला नजर भिडवली होती, क्षणभरच तिच्या देहावरून माझी दृष्टी फिरली होती. ह्या क्षणभंगांतच मी माझ्या आयुष्याची जोडीदारीण मनोमन नक्की केली होती. कांहीं सूचक बोलून तिचा कल अजमावण्याच्या मी बेतांत होतों, तोंच ती मैत्रिणीबरोबर निघून जात होती. मला पाठीमागें ठेवून; दृष्टीनें बरेंच सांगून; पण तोंडानें कांहीं न बोलतां!

ती दिसेनाशी होईपर्यंत तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे मी पहात होतों. अनेक स्त्रिया दिसायला चांगल्या असतात. नाकाडोळ्यांनीं रेखीव असतात. सुखासीनता देहावर झळाळत असते. कोचावर, झोंपाळ्यावर किंवा गाडींत त्यांना बसलेलें पाहिलें म्हणजे मन चलबिचल होतें, मोहाचा क्षण जवळ येतो. पण त्या कोचावरून उठून किंवा गाडींतून उतरून चालूं लागल्या म्हणजे मोठा विरस होतो. बहुतेक स्त्रिया कसेतरी पाय ओढीत, बिनबांधें पोट काढून किंवा डोक्यावर मणादीडमणाचें ओझें आहे अशा भावनेनें चालत राहतात. अशा वेळीं जें वाटलेलें असतें, तें मनांतल्या मनांत जिरून जातें. वैजयंतीला मी पाहिलें, तेव्हां तिचा उंच बांधा, देहाचें सौष्ठव आणि चपळ नजर ह्या गोष्टी माझ्या लक्षांत आल्या होत्या. तिला पाठमोरी चालतांना मी पाहिलें तेव्हां तर हरखूनच गेलों. मोठ्या रुबाबांत, जलदपणें पण अवघा देह ताठ ठेवून ती चालत होती. तिच्या अवयवांच्या वक्र रेषा त्यामुळें जास्तच वक्र होत होत्या. नाजूक देटानें फुलाचा भार पेलून धरावा त्याप्रमाणें तिच्या विती दीडवितीच्या कमरेनें वरचा वजनदार भाग सांवरून धरला होता. तिचे नितंब पुष्ट आणि मांसल असले तरी त्यामुळें चाल मंद होत नव्हती. उलट त्यामुळें चालीला एक प्रकारचा डौल आला होता. डौलदारपणें चालतांना ती हातांना एक विशिष्ट प्रकारचा हेलकावा देत होती. आणि प्रत्येक हेलकाव्याबरोबर माझी नजर फरफटत होती. चालीबरोबर पुढें होणारा हात मला ओढून नेत होता आणि मागें होणारा हात जागच्या जागेवर थोपवून धरीत होता. जणूं पुढें होणारा हात, 'चल. हिंमत असेल तर ये-' म्हणून मला खुणावीत होता. आणि मी पाय उचलणार तोंच मागें होणारा हात, 'नको नको. इतक्यांतच नको' म्हणून मला दटावीत होता.



त्या दोघी दिसेनाशा झाल्या तेव्हां माझ्या मनानें एकदम उचल खाल्ली. घडल्या प्रकारांत मी एखाद्या मूर्खासारखा वागलों होतों. डोकें दुखण्याचें निमित्त करून कुसुमावती जाते म्हणाली, तेव्हां एका शब्दानेंहि मी तिला थांबण्याची सूचना केली नव्हती. ती चालू लागली तेव्हां तिच्याबरोबर न जातां मी खुंभासारखा जागच्या जागेवर उभा राहिलों. औपचारिकतेला सोडून मी हें वर्तन केलें होतें. मुलगी पसंत नसली तरी मी तिला घरीं आणून सोडीन एवढी किमान अपेक्षा तिच्या घरच्या माणसांनीं माझ्या बाबतींत बाळगली असेल. वैजयंतीनेंही मनांतल्या मनांत माझी किंमत केली असेल. मनांत असे विचार आले तेव्हां मी तावडतोब टॅक्सी केली आणि त्या गेल्या होत्या त्या दिशेनें जाऊं लागलों.

बसस्टॉपवर त्या दोघी दिसल्या, तेव्हां टॅक्सी त्यांच्या बाजूला नेऊन उभी करण्यास मी ड्रायव्हरला सांगितलें. टॅक्सी थांबली तेव्हां मी दार उघडलें आणि अर्धवट बाहेर झुकून म्हटलें, "तुमच्यासाठीं टॅक्सी घेऊन आलों आहें. चला—" पण दोघींपैकीं एकीनेंही हालचाल केली नाहीं. मी जरा मोठ्यानें, पण ह्या खेपेला कुसुमावतीला उद्देशून म्हटलें, "तुमच्यासाठीं मुद्दाम आलों आहें. वेळ दवडूं नका. चला—" कुसुमावतीचे डोळे एक क्षणभर लकाकले. तिच्या डोळ्यांत आशा डोकावली. तिनें विचार केल्यासारखें केलें व म्हटलें, "चला—" आणि तावडतोब ती टॅक्सीमधें येऊन बसली. वैजयंती मात्र जागच्या जागेवर उभी राहिली. आंत येण्याची मी तिला खूण केली, तेव्हां तिनें मानेनेंच नकार दिला. मी खालीं उतरलों आणि आर्जवीपणें म्हटलं, "असं काय बरं! तुमची मैत्रीण केव्हांची आंत बसली आहे. चला कीं—" तरीहि तिनें हालचाल केली नाहीं. वास्तविक, जिला मी थोडेंफार दुखावलें होतें, त्या कुसुमावतीनें ताणून धरलें असतें तर शोभून दिसलें असतें. पण ती बिचारी शहाण्यासारखी वागली होती. आणि जिच्यामुळें हें सारें घडलें होतें ती वैजयंती आडमुठेपणानें वागत होती. तिच्या ह्या वर्तनानें निराश होऊन मी कुसुमावतीकडे पाहूं लागलों. मला काय म्हणावयाचें आहे तें तिच्या ध्यानांत आलें असावें. कुसुमावतीनें कपाळाला आंठ्या घातल्या, तिच्याकडे रोखून पाहिलं आणि म्हटलं, "चल आंत ये—बस्स् झालं!—" वैजयंती जागेवरून हलली. पण एक क्षणभर घुटमळली. डोळ्यांच्या कोपऱ्यांतून तिनें माझ्याकडे पाहून घेतलं आणि ती कुसुमावतीशेजारीं जाऊन बसली. मी पुढच्या सीटवर बसलों, दार लावून घेतलं आणि ड्रायव्हरला म्हटलं "चलो—"

कुसुमावतीला तिच्या घरीं उतरून टॅक्सी सुरू झाली तेव्हां मी वैजयंतीला विचारलं, "तुम्हीं कुठें राहतां तें मला ठाऊक नाहीं. खाणाखुणा सांगाल काय?" माझ्या ह्या प्रश्नावर ती पुढें झुकली आणि ड्रायव्हरला ठिकाणाच्या खुणा सांगूं लागली. टॅक्सी त्या दिशेनें धांवूं लागली, तेव्हां मला उद्देशून पण नजर दुसरीकडे लावून ती म्हणाली, "पुढं बसण्यापेक्षां मागं येऊन बसलेत तर जास्त चांगलं दिसेल—" तिच्याकडे माझ्या पुन्हा पुन्हा वळून पाहण्याला उद्देशून ती असं बोलली होती

कीं केवळ औपचारिकपणा सांभाळण्यासाठीं? मी तसाच बसून राहिलों, तेव्हां ती पुढें झुकली आणि म्हणाली, "मागें येऊन बसा—"

मागच्या बाजूला मी तिच्या शेजारीं जाऊन बसलों आणि टॅक्सी सुरू झाली तेव्हां तिला विचारलं, "तुम्ही रागावला अहां काय?—"

खरोखर रागावलेली स्त्री अशा वेळीं बोलत नाहीं; गप्प बसून राहते. पण रागावल्याचें सोंग करणारी स्त्री आवाज चढवून बोलूं लागते. माझा प्रश्न संपायच्या आंतच तिनें विचारलें, "रागवूं नाहीं तर काय करूं? तुम्ही असे वागलेत—"

"मी कसा वागलों बुवा! —"

"तेंहि मीच सागूं काय! कुसुमावतीला घेऊन सिनेमाला आलेत, जरा तिच्या तंत्रानं वागायचं होत. किती दुखावलीत तिला! धड बोलत-सुद्धां नव्हता तिच्याशीं. डोळे वर करून पहातही नव्हता तुम्ही तिच्या-कडे. कां असं वागलेत तुम्ही?"

"कुसुमावतीबरोबर तुम्ही कशाला आलांत?—"

"ती चल म्हणाली, मी आलें. मला काय ठाऊक असं कांहीं होईल म्हणून—"

"काय झालं बुवा?"

"मला नका विचारूं" असं म्हणत तिनें रुसल्याचा अविर्भाव केला आणि ती खिडकींतून बाहेर पाहूं लागली. मी तिच्या बाजूला सरकलों आणि म्हटलं,

"कुसुमावतीजवळ मी असा तुसड्यासारखा वागलों म्हणून तुम्हांला रागवायला काय झालं?"

"काय झालं म्हणजे! किती टाकून बोलली मला! माझ्यामुळें तुम्ही असं वागलेत असं वाटलं तिला—"

"मग खोटं आहे कीं काय?"

"चला—" म्हणून ती एकदम लाजली. मी आणखी कांहीं विचार-णार तोंच टॅक्सी तिच्या घरासमोर उभी राहिली. खालीं उतरतांना तिनें माझ्याकडे पाहून घेतलें. पण ती कांहीं बोलली नाहीं. ती निघून जाणार तोंच धीर करून मी विचारलं, "आतां पुन्हा भेट?"

"भेटूं अशीच केव्हांतरी—"

"केव्हांतरी नको. उद्यां भेटाल काय?"

"भेटेन—"

"कुठें?"

"बॅंडस्टॅंडवर" आणि ती चालूं लागली. मी हांक मारून तिला थांबवली आणि घाईघाईत विचारलं, "अहो, पण किती वाजतां?" तिनें आपल्या उजव्या हाताचा पंजा वरती केला. अंगठा मिटून घेतला आणि चार बोटं दाखवून ती झपाझपा चालूं लागली.

आमच्या ह्या भेटीनंतर तिची आणि माझी अनेक ठिकाणीं, अनेक वेळां भेट झाली. मी कधीं न पाहिलेल्या ठिकाणीं तिच्यासाठीं ताटकळत उभा राहिलों. पहिल्या भेटींत ज्या आपुलकीनें आणि ज्या सूचक पद्धतीनें ती माझ्याशीं वागली होती, त्यावरून मी बांधलेले अंदाज फसले होते. मधाचें बोट लावून एखाद्याला रेंगाळत ठेवावें, तसें गोड बोलून ती मला लोंबकळत ठेवीत होती. माझ्या प्रश्नाचें उत्तर देत नव्हती. पुनः पुन्हां प्रश्न विचारला तर टाळाटाळी करीत होती. पण स्पष्ट नकार देऊन मला तोडून टाकीत नव्हती. मी तिला आवडत होतों, माझा स्वभाव तिला आवडत होता, तरी माझ्याशीं लग्न करण्यास ती कबूल होत नव्हती. ह्याविषयीं मी तिला एकदां खोदून खोदून विचारलें तेव्हां ती म्हणाली, "एवढ्यांतच काय घाई आहे?"

"तुम्हांला नसेल पण मला आहे"

"मग कुसुमावतीला होकार देऊन टाका"

"तें माझं मीं पाहीन. तुम्ही सांगायला नको."

"राहिलं! ह्या विषयावर मला तरी बोलायची कुठं हौस आहे?—" असं म्हणून ती गप्प राहिली. मी तिला नाना प्रश्न विचारले. पण तिनें उत्तर दिलें नाहीं.

बाहेरच्या जगांत मी एवढा ताठ्यानें वागत होतों पण हिच्यापुढें लाचार झालों होतों. ती म्हणेल तसा वागत होतों. ती सांगेल तसा वाकत होतों. माझ्या स्वभावाला मुरड घालीत होतों. मला न आवडणाऱ्या गोष्टी तिच्या-साठीं करीत होतों. पण त्याची तिला दखलही नव्हती. एखाद्या राणीच्या रुबाबांत ती वागत होती. तिच्यापायीं माझें मन वेडावलें आहे हें तिच्या लक्षांत आलें होतें आणि आतां ती मला मुद्दामच खेळवीत होती. धड होकार देत नव्हती कीं धड तोडूनही टाकीत नव्हती. तिच्या आणि माझ्या ह्या रेंगाळत चाललेल्या संबंधाचा बाहेर बभ्रा होत होता. हित-चिंतक माझ्या तोंडावर धीराच्या गोष्टी बोलत होते आणि पाठीमागें चेष्टा करीत होते. वडीलधारी माणसें रुष्ट होत होतीं. आणि तरीहि नादावलेल्या माणसासारखा मी तिचा ध्यास घेत होतों—

पण हें असें फार दिवस रेंगाळत चालण्यासारखें नव्हतें. हिच्याकडून येणाऱ्या उत्तरावर माझे पुढचे बेत अवलंबून होते. हिनें मला होकार दिला तर मी कुसुमावतीला नकार देणार होतों. हिनें नकार दिला तर तिला जवळ करणार होतों. पण कुसुमावतीच्या घरचीं माणसें आतां अधीर झालीं होतीं. माझ्याकडून निर्वाणीचें उत्तर त्यांना आठवड्याच्या आंत हवें होतें. मी कांहीं उत्तर दिलें नाहीं तर ते माझा नकार धरून चालणार होते. अशा स्थितींत वैजयंतीकडून एकदां सोक्षमोक्ष लावून घेणें भाग होतें.

नेहमीप्रमाणें ती भेटली तेव्हां या गोष्टी तिच्या कानावर घातल्या आणि म्हटलं, "मला तुझं उत्तर हवं आहे—होय किंवा नाहीं सांगून टाक—"

"किती घाई करता!—"

"इतके दिवस थांबलों तेंच चुकलं. आतां मात्र थांबणार नाहीं."

"दोन दिवसही थांबणार नाहीं?"

"थांबेन—"

"मग दोन दिवसांनीं तुमच्या प्रश्नाचं उत्तर देईन."










"कुठं भेटशील?"

"बोरीबंदरला. घड्याळाखालीं"

"किती वाजतां?"

"चार वाजतां–"

"बरोबर चार वाजतां?"

"हो–"

"पहा. नाहींतर उशीर करशील. मला ताटकळत ठेवशील–"

"नाहीं ठेवणार."

"ठेवलंस तरी मी थांबणार नाहीं. फार फार तर साडेचार वाजेपर्यंत मी तुझी वाट पाहीन. तूं आली नाहींस तर तुझा नकार धरून चालेन–"

"ठीक आहे."

● ●

इतकें निर्वाणीचें बोलणें होऊनही तिनें आज उशीर केला होता. चार वाजल्यापासून ह्या घड्याळाखालीं मी उभा आहें. आतां साडे चार वाजायला आले आहेत आणि अजूनही तिचा पत्ता नाहीं. ठरवलेला संकेत पाळण्यासाठीं मी माझी महत्त्वाचीं कामं झुगारून दिलीं. ऑफिसमध्यें नाना सबबी सांगितल्या आणि बाहेर पडलों. बरोबर चार वाजतां घड्याळाखालीं येऊन उभा राहिलों. वाट पाहून मी आतां कंटाळलों आहें. थकलों आहें. तिच्यासाठीं बटनहोलमध्यें खोचलेल्या गुलाबाच्या कळीनेंही आतां मान टाकली आहे. अत्तराचा सुगंध उडून चालला आहे. मला नको ते लोक ह्या ठिकाणीं भेटत आहेत. दांत काढून, "तुम्ही इकडे कुठें?" म्हणून विचारीत आहेत. त्यांना चुकवतां चुकवतां आणि खोटीं उत्तरं देतां देतां माझी त्रेधातिरपीट उडत आहे. पांच पांच मिनिटांनीं लोकलगाड्या माणसें बाहेर टाकीत आहेत. माणसांचे थवेच्या थवे स्टेशनामधून बाहेर पडत आहेत. पण अजूनहि वैजयंतीचा पत्ता नाहीं. स्टेशनसमोर टॅक्सीज् थांबत आहेत. जोडीजोडीनें माणसें उतरत आहेत. माझी शोधक नजर भिरभिरत आहे. पण ती कुठेंहि दिसत नाहीं. येणाऱ्या जाणाऱ्या वाहनांकडे मी वेड्यासारखा पाहतों आहें. निराश होतों आहें. आणि अजूनहि ती येईल म्हणून आशा बाळगून आहे...

घड्याळाचा कांटा साडे चारवरून पुढें सरकला आहे. मी दिलेली मुदत टळली आहे. मनाशीं मी चुळबुळत आहें आणि तिच्या वाटेकडे डोळे लावून पाहतों आहें. ठरावाप्रमाणें आतां संबंध संपला आहे. मी निघून जावयास हवें. पण एखाद्या लोचटासारखा मी ह्या ठिकाणीं उभा आहें. कुरकुरत कां होईना पण पांच वाजेपर्यंत तिची वाट पहायची मी आतां ठरवीत आहें. तसा निर्धारच केला आहे. इतका वेळ थांबलों, आतां अर्धा तास थांबायला काय हरकत आहे, म्हणून मनाचें समाधान करून घेतों आहे. पुन्हा पुन्हा येणाऱ्या आणि जाणाऱ्या वाहनांकडे पहात आहे. संकेत ठरवितांना जें बोलणें झालें तें पुन्हा पुन्हा आठवतों आहें. सांगण्यामध्यें वा ऐकण्यामध्यें कांहीं चूक झाली नाहीं ना, म्हणून शंका मनाला ग्रासते आहे. आणि तेवढ्याकरतांच लोकलच्या स्टेशनवरून मी थ्रू गाड्यांच्या स्टेशनकडे चालूं लागलों आहें.

थ्रू गाड्यांच्या स्टेशनवर मी चांगलीं दहा मिनिटें उभा राहिलों, तरीही ती दिसली नाहीं. पुन्हा लोकल गाड्यांच्या स्टेशनवर आलों. भिरभिऱ्या नजरेनें पाहूं लागलों आतां पांच वाजायला आले आहेत. ही मला समजली तरी काय? जिला माझी पर्वा नाहीं, तिच्यासाठीं मी इतका जीव कां टाकावा? जी मला नुसतीच झुलवते आहे, तिच्या शब्दाला मी एवढी किंमत कां द्यावी? तिच्यासाठीं एवढा वेडा कां व्हावं? निराशेनें मन भरलं तेव्हां मी उसासा टाकला आणि जाण्यासाठीं रस्त्याच्या बाजूला वळलों.

मी रस्त्याच्या बाजूला वळलों आणि, 'शारंगपाणी, अहो शारंगपाणी' म्हणून हांका मारीत कुसुमावती माझ्या शेजारीं येऊन उभी राहिली. ह्या अशा वेळीं आणि अशा ठिकाणीं तिला पाहून मी चमकलों. कांहींतरी बोलावयास हवें म्हणून मी विचारलें, "तुम्ही इकडे कुठें?"

"सिनेमाला जातें आहें. आतांच गाडींतून उतरलें. बाहेर आलें तों तुम्ही दिसला–" आणि माझ्याकडे ती पहात राहिली. माझ्यासाठीं जीव टाकणारी, माझ्यासाठीं थांबून राहिलेली ही मुलगी तिच्यापेक्षां अनेकपटीनें चांगली नव्हती काय? मी हंसलों आणि म्हटलें, "वेळ जात नव्हता म्हणून सहज उभा होतों. चला, कुठेंतरी चहा घेऊं—"

माझ्या ह्या सूचनेवर ती माझ्याकडे आश्चर्यानें पहात राहिली. तिच्या डोळ्यांत पुन्हा आशा डोकावली. माझा बेत फिरेल म्हणून ती घाई-घाईत म्हणाली, "चला, मलाहि चहा घ्यायचाच आहे—"

कुसुमावतीला घेऊन दिवाडकराच्या हॉटेलांत मी चांगला अर्धा तास बसलों. इकडच्या तिकडच्या गप्पा केल्या. तिच्याशीं मनमोकळेपणानं वागलों. सूचक बोललों. माझी निवड मी आतां नक्की केली होती. कांहींही झालं तरी माझा बेत मी आतां बदलणार नव्हतों. बोलण्याच्या ओघांत मी विचारलं, "तुम्ही सिनेमाला एकट्याच जाणार?"

"मैत्रिणीबरोबर जाणार होतें..."





अनुक्रमणिका

"म्हणजे वैजयंतीबरोबर कीं काय?"

"नाहीं नाहीं. ती माझ्याशीं हल्लीं धड बोलतही नाहीं."

"असं!—"

"तर काय! मोठी लहरी मुलगी आहे ती!" तिच्याविषयीं आणखीहि कांहीं तिला बोलायचं होतें. पण वाईट दिसेल म्हणून मोठ्या कष्टानें ती थांबली. मला विचारूं लागली, "आतां उठूं या काय? नाहींतर मला उशीर होईल—"

"उठूं या कीं—अजून तुम्हांला तुमच्या मैत्रिणीकडे जायचं आहे."

"आतां कसली जाते! माझी वाट पाहून तीही कंटाळली असेल. पांच वाजतां येते म्हणून कबूल केलं होतं—"

"मग आतां?" पण माझा प्रश्न टाळून ती हातांतल्या पर्सशीं खेळत राहिली. ह्या मुलीला ताबडतोब होकार द्यावा आणि तिला इकानें सिनेमाला घेऊन जावें असें माझ्या मनांत फार आलें. सुरवातीसुरवातीला वैजयंतीला विसरणं कठीण गेलं असतं हें खरं; पण मृगजळापाठीमागें धांवण्यांत तरी काय अर्थ होता? मनाशीं विचार पक्का करून मी तिला म्हटलं, "चला मी येतों तुमच्याबरोबर सिनेमाला—"

"तुम्ही येतां?" असं विचारून ती आश्चर्यानें माझ्याकडे पहात राहिली.

"हो. मी येतों." असं म्हणत आम्ही दोघं उठलों. लिफ्टनें खालीं आलों. लोकल स्टेशनवरच्या घड्याळाखालीं आलों, तेव्हां धांवत धांवत वैजयंती एकदम माझ्या बाजूला आली. तिनें एकदम माझा हात पकडला आणि विचारलं, "उशीर झाला म्हणून रागावलात काय?—" भावनेचा पहिला वेग ओसरला, तेव्हां कुसुमावती तिच्या दृष्टीस पडली. तिला पाहून ती एकदम ओशाळली आणि माझ्याकडे पहात राहिली.

माझ्यावर प्रसंग मोठा चमत्कारिक आला होता. हा माझ्या आयुष्याचा प्रश्न होता. कुणाला तरी मी दुखवणारच होतों. मी कुसुमावतीकडे वळलों आणि विचारलं, "आपल्याबरोबर वैजयंती आली तर तुमची हरकत नाहीं ना?"

"माझी कसली हरकत असणार? ठरवणार तुम्ही—" असं तुटक उत्तर देऊन ती चालूं लागली. ती पुढें गेली तेव्हां वैजयंती म्हणूं लागली, "माझ्यावर फार रागावला असाल तुम्ही! पण मी तरी काय करूं? बसच बंद पडली."

"कांहीं हरकत नाहीं. वेडे, मी तुझ्यावर कधीं तरी रागवेन का?—" असं म्हणून मी तिचा हात हातांत घेतला आणि कुसुमावतीला गांठण्याकरितां भराभर चालूं लागलों. ● ● ●





# Pompous Ass !

—रूप कथ्थक

खरं सांगायचं म्हणजे मला त्यावेळीं बदली नको होती. पण आंध्र वेगळा करायचा ठरल्यावर माझ्यासारख्या कन्नड अधिकाऱ्याला मद्रासहून कुर्नूलला पाठवलं तर त्याबद्दल फारसं कांहीं करतां येण्यासारखं नव्हतं.

मी आलों तेव्हां जागेची टंचाई सर्वत्रच होती. पण माझ्या सुदैवानं मला एक वेगळाच आणि स्वतंत्र लहानसा बंगला मिळाला. वास्तविक तो एकाद्या दुय्यम मंत्र्यानंच पटकावायचा, पण मिळाला माझ्यासारख्या 'बाहेरच्या' ऑफिशिएटिंग अंडर सेक्रेटरीला. बंगला होता गांवाच्या एका कडेला. जवळपास राहतीं घरं नव्हतींच असं म्हटलं तरी चालेल. समोर थोड्या अंतरावर एक जुनी धर्मशाळा होती तेवढीच. धर्मशाळेचं पहिलं स्वरूप जाऊन तिचं मार्केटांत केव्हां रूपांतर झालं तें कळायला कांहीं मार्ग नव्हता. मी माझ्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें डायरींत नोंद केली : हें मार्केट केव्हां सुरू झालं तें रेव्हिन्यू खात्याला विचारायचं. ओट्यावर, आंत, बाहेर लहान-मोठीं चिल्लर दुकानें; कोपऱ्यावर एक कॉफीचा अड्डा आणि नेहमींच अंवतीभंवती गर्दी. बाजूच्या देखाव्यांत हें मार्केटाचं मोहोळ नीटसं बसत नव्हतं. पण माझ्यासारख्या एकट्या माणसाला तेवढाच विरंगुळा.

कोंडाप्पा, माझा पट्टेवाला, घरचं बहुतेक काम करी—झाडलोट, जेवण आणणं वगैरे. तो होता कुर्नूलचाच. तेव्हां रात्रीं घरीं जाई. पहिल्या पहिल्यांदा ऑफिसचं काम बरंच असे. इकडेतिकडे लक्ष द्यायला फुरसदच नव्हती. रविवारची सुटीहि क्वचितच मिळायची. पण हळूहळू कामाला शिस्त लागली आणि मी आजूबाजूला पाहूं लागलों.

तो दिवस होता शनिवारचा. संध्याकाळचे ५-५॥ झाले असतील. मी बंगल्याच्या आवारांतच आरामखुर्ची टाकून नवीन मागवलेलीं पुस्तकं चाळीत बसलों होतों. मार्केटाकडे नेहमीचीच संथ वर्दळ चालू होती. पण मधेंच आवाज थोडे चढले असं वाटलं. एकदां उठून काय चाललं आहे तें पाहून यावं असंहि वाटलं. पण वाचतांना तो विचार तसाच बारगळला.

दोन-तीन मिनिटांनीं मला उठावंच लागलं. सगळी गर्दीच बंगल्याच्या आवारापाशीं येऊन ठेपली, आणि रडत-ओरडत एक तरुण पोरगी मी उभा होतों तिथं येऊन माझ्या पायालाच बिलगली. तिच्यामागें एक म्हातारी होती. सगळेच ओरडत होते. एकमेकांशीं वाद घालीत होते. मी त्यांच्याहि वर आवाज चढवून सगळ्यांना निघून जायला सांगितलं. इतक्या मोठ्यानं आपल्यालाहि ओरडायला येतं याचं मलाहि त्यावेळीं थोडं कौतुक वाटलं. माझ्या त्या आविर्भावानं जमाव एकदम शांत झाला. पण त्यांचे पाय हालेनात. पुढं काय होणार तें त्यांना पहायचं होतं. मी पुन्हां आवाज चढवून सर्वांना चालतं व्हायला सांगितलं—म्हातारीलाहि. पोरीला सांगितलं. आंत—बंगल्यांत हो. म्हातारी ऐकणार नाहीं असं मला वाटलं होतं. पण काय झालं कुणास ठाऊक! पोरीला हजार शिव्या देत ती परतली. तिच्या मागें बाकीचेहि गेले. दोघेतिघे रेंगाळण्याचा प्रयत्न करीत होते. पण मी कांहींच झालं नाहीं अशा आविर्भावांत जेव्हां खुर्चीवर बसून पुन्हां वाचीत राहिलों तेव्हां तेहि निघून गेले.

पंधरा-एक मिनिटांनीं ती पोरगी दबत दबत बाहेर आली आणि थोडी दूर उभी राहिली. मी मुद्दामच तिच्याकडे पाहिलं नाहीं—आणि मग पाहिलं. पाहिलं. आणि लगेच स्वतःला आवरून पुन्हा निर्विकार झालों.

थोड्या वेळानं म्हणालों, "तूं जात का नाहींस?"

ती बोललीच नाहीं. मीहि पुन्हां वाचूं लागलों.

मग आपणच ती म्हणाली, "मला भूक लागली आहे. म्हातारीनं काल्पासून खायलाच घातलं नाहीं."

मी उठलों आणि तिला आंत बोलावलं. दुपारचा डबा तसाच पडला होता. तिला तो दाखवला आणि आणि सांगितलं, "यातलं हवं तें खा."

एकदां वाटलं तिकडेच थांबावं. जातांना एकादं भांडं नेलं तर काय घ्या? पण मग वाटलं, असा अविश्वास दाखवणं बरं नाहीं. त्या बुभुक्षेनं ती अन्नावर तुटून पडली तीहि मला फार वेळ पाहवली नसती.

मी बाहेर जाऊन बसलों. अर्धा पाऊण तास झाला तरी ती बाहेर येईना म्हणून थोडा काळजींतच होतों. शेवटीं आंत उठून गेलों. तिनें खाऊन भांडीं घासून लख्ख करुन ठेवलीं होतीं आणि झाडलोट करायला लागली होती.

मी तिला म्हटलें, "हें कशाला? तूं जा आतां. माझा नोकर येईल"

ती पहिल्यासारखी कांहीं बोललीच नाहीं. किंचित् थांबली. पण काम-मात्र तसंच चालूं ठेवलं.

मी विचारलं, "नांव काय तुझं?"

"रुखमण" ती म्हणाली.

"आणि ती म्हातारी?"

"ती माझी आई — पण सासूसारखी सदा मला मारते."

"तूं काय करतेस?"

"मिळेल तें काम. मी आतां इकडेच येईन."

मला तिची धिटाई आवडली आणि उगाच भीतिहि वाटली.

काळोख पडायला लागला होता म्हणून माझीं बाहेरचीं पुस्तकं आवरुन आंत व्हरांड्यांत टेबलावर ठेवलीं. उघड मिटीची आरामखुर्ची रुखमणच घेऊन आली. खुर्ची तिनं नीट पुन्हां उघडून ठेवली. तिला हें काम माहीत होतं असं दिसलं.

कोंडाप्पाला नेमका आजच उशीर झाला होता. तो ह्यानंतर येऊन मग रात्रीचं जेवण आणणार होता.

इतक्यांत दारावर थाप पडली. कोंडाप्पाच असेल म्हणून मीच पुढं झालों. दार उघडलं तों एक कुणी नवखाच.

"रुखमणला मी न्यायला आलों आहें" तो म्हणाला. दिसायला होता धिप्पाड--थोडासा भयंकरच. पण आवाजावरुन अगदींच मेंगळा वाटला.

"तूं कोण?" मी विचारलं.

"मी भाऊ तिचा." तो म्हणाला.

"पुन्हां माय-लेक तिला बडवणार आहां काय?"

"तुम्हांला तिची माहिती नाहीं." तो म्हणाला "तुम्हीं सांभाळून घेणार असलां तर इकडेच ठेवा. मी तर बेकारच आहे."

"माझ्याकडं कांहीं काम नाहीं." मी म्हणालों.

इतक्यांत आंतून कांहीं फुटल्याचा आवाज आला. मी आंतल्या खोलींत गेलों. रुखमणनें पेबल लँप चादर झटकतांना फोडला होता. तिला फारसं कांहीं वाईट वाटलेलं दिसलं नाहीं.

ती हलक्या आवाजांत मला म्हणाली, "मी मुद्दामच हा फोडला. तुम्हांला बोलायला. त्याला सांगा मी राहीन. रोजचा पगार रुपया देईन."

"रोजचा पगार?" कांहींच समजलं नाहीं म्हणून मी विचारलं.

"हो रोजचा! त्याला द्यायलाच पाहिजे. जा सांगा—माझ्यासाठीं."

मी मुकाट्यानं बाहेर गेलों आणि त्याला म्हटलं, "ती नीट काम करील ना?"

"तिला संवय आहे. तिचं घरींच पटत नाहीं."

"हा रुपया. आजचा पगार."

मी त्याच्या हातावर पैसे ठेवतों, इतक्यांत रुखमणच बाहेर आली आणि त्याच्या हातावर हात मारून तो रुपया तिनं काढून घेतला.

"हा पहिला माझा आहे. उद्यांपासून त्याला द्या."

ती उतरली आणि त्याच्याबरोबर चालूं लागली.

मी मनांत म्हटलें, "रुपयावरच भागलं!" आणि मग एकदम आठवलं, "फुटलेल्या टेबललँपवर." ती तशीच गेली होती. त्या दिवशीं कोंडाप्पाहि आला नाहीं.

खोलींतल्या कांचा मीच आवरल्या. खायला कांहीं तरी हवंच होतं, तेव्हां एक ऑमलेट बनवलं अन् वेळ मारून नेली.

● ●

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी उठायच्याच आधीं ती आली. कडी लावलेलं दार उघडून ती आंत कशी आली तें मला कळलंच नाहीं.

कॉफी तिनं तयार केली होती.

टेबलावर ठेवतांना मला म्हणाली, "मी इथं कामाला आहे म्हणून कोंडाप्पाला सांगून आलें. तुमची फुटलेल्या दिव्याची-कांचहि आणली आहे. तुम्हीं कांचा उगाच काढल्या. मी सकाळीं आल्यावर काढल्या असत्या."

त्यानंतर घरचीं सर्व कामं ती बिनबोभाट करी. क्वचितच बोलायची. तिचा भाऊ नियमानं संध्याकाळीं एक रुपया वसूल करायला यायचा.

[पुढील मजकूर पान १३२ वर]

*घराशीं दोस्ती जडते. घराचा लळा लागतो तुमचीं सारीं सुखदुःखें घराला कळतात. घराला मन असतें, आत्मा असतो, स्वप्नें असतात—*

# स्वप्नांत येणारें घर



—मंगेश पाडगांवकर

मतें जितक्या लवकर बदलतां येतात तितक्या लवकर घरें बदलतां येत नाहींत. निदान सध्यांच्या काळांत तरी नाहींत हें अगदीं खरें आहे! मला मात्र अजूनपर्यंत चारपांच वेळां घरें बदलण्याचा योग आला. असा योग आतां यापुढें येईल असें वाटत नाहीं. इच्छा असो नसो, तशी शक्यता आतां या गजबजलेल्या शहरांत उरली नाहीं! आतां यापुढें घर बदलायचें म्हणजे रूपकात्मक भाषेंतच विचार करावा लागणार! इहलोक हेंच एक या जन्मीं मिळालेलें प्रचंड घर आहे! हें घर आतां बदलायचें म्हणजे—थेट परलोकच गांठावा लागणार! पण सध्यां हें घर बदलायची मुळींच इच्छा नाहीं! अजून या प्रचंड घरांत खूप रहायचें आहे, खूप हिंडायचें आहे! या घरांत रहाण्यासाठीं हवी तितकी पागडी भरण्याची तयारी आहे! पागडी काय, कुठल्याहि घरांत गेलें तरी भरावी ही लागणारच! परलोकांत पागडी नसेल या गोष्टीवर मुंबई शहरांतल्या कुठल्याहि माणसाची श्रद्धा बसेल असें वाटत नाहीं! तिथेंहि पागडी ही असणारच! इहलोकाहून ती कदाचित् जबरदस्त असेल असें वाटतें! "स्वर्ग नको, सुरलोक नको, मज लोभस हा इहलोक हवा" असें म्हणायचें तें याच उत्कट भावनेनें. या उत्कट भावनेच्या पोटीं दडलेला छुपा हिशेब सारेच जाणतात. तो जागलेला नाहीं असें वरवर सोंग करीत जगायला थोडी गंमत वाटते; अशा जिण्याला अध्यात्माची लज्जत येते इतकेंच!

मीं चारपांच वेळां घरें बदललीं, पण खऱ्या खुऱ्या अर्थानें माझी एकाच घराशीं दोस्ती जडली होती. आणि तें आमचें कोकणांतलें घर! घराशीं दोस्ती जडते, घराचा लळा लागतो हें अगदीं खरें आहे! घर तुमच्याशीं बोलतें. दिवेलागणीची वेळ झाली, वातावरण कातर झालें, झाडांना उगीचच कांहीं अनामिक भीती वाटूं लागली आणि अशा वेळीं तुम्हीं घरीं वेळेवर आलां नाहीं, तर घर तुमची उत्सुक होऊन वाट पहातें. "अगो, हो अजून कसो येवंक् नाय!" असें म्हणून मनांत तळमळणाऱ्या म्हाताऱ्या आजीसारखें घर तुमची वाट पहात मनांत तळमळतें. तुमचीं सारीं सुखदुःखें, आशाआकांक्षा घराला कळतात! तुम्ही घराच्या स्वप्नांत येतां. तुम्ही प्रवासाला निघालां कीं घर तुमच्यासाठीं मनोमन प्रार्थना करतें! होय, घराला मन असतें, आत्मा असतो, स्वप्नें असतात! घराशीं तुमची दोस्ती जडते याचें कारणच मुळीं हें आहे! मुंबईत मीं दोन तीन वेळां घरें बदललीं; पण कुठल्याहि घराचा असा लळा कधींच लागला नाहीं. या घरांच्या गुळगुळीत भिंती माझ्याशीं कधींच बोलल्या नाहींत. मी रात्रीं झोंपल्यावर हें घर माझ्या पाठीवरून मायेनें हात फिरवील असें मला कधींच वाटलें नाहीं. भाडें वसूल करणाऱ्या भय्याला माझ्याविषयीं जेवढें प्रेम किंवा आपुलकी वाटत होती, तेवढीच या शहरांतल्या घरांना वाटत होती! मी उशिरां आलों तर हें घर आपली वाट पहात असेल असें मला कधींच वाटलें नाहीं! उलट असेंच वाटायचें कीं एक दोन दिवस जर मी आलों नाहीं तर हें घर दुसऱ्या एखाद्या भाडेकरूकडून चक्क रुपये आणे पै मोजून घेईल आणि त्याला त्या चार भिंतींच्या आंतली सुरक्षितता खुशाल बहाल करील! शहरांतलीं हीं घरें आजूबाजूच्या वातावरणापासून पार तुटून गेलीं आहेत अशी माझी उगीचच भावना होते. या घरांसमोरचें एखादें झाड तोडलें गेलें, ती जागा उदास, बुंडी दिसूं लागली, तर या घरांना कधीं दुःख होईल ही कल्पनाच करवत नाहीं. या घरांचें आजूबाजूच्या झाडांशीं कधीं नातेंच जुळू शकत नाहीं.

आमचें कोकणांतलें घर त्याच्या भोंवतींच्या सृष्टीहून वेगळें करून पहाणें शक्य होत नाहीं. आमच्या घरासमोर एक फणसाचें मोठें झाड होतें. फणस लागले कीं कडेवर गुटगुटीत मूल घेतलेल्या पुरंध्रीसारखें हें झाड दिसूं लागे. मग आमचें घर वात्सल्याच्या भावनेनें या झाडाकडे पहातें आहे असें वाटे. समोरची जास्वंदी किंवा कण्हेरी सुकूं लागली कीं प्रथम काळजी वाटे या घराला. आजोबांच्या स्वप्नांत येऊन तें ही गोष्ट त्यांच्या नजरेस आणून देत असावें! आणि मग एक दिवस आजोबा अचानक ओरडत, "अरे, त्या जास्वंदीच्या पोराक् पाणी घाल रे." कळशा घेऊन आम्ही घसाघस पाणी ओतलें कीं, त्या जास्वंदीच्या अगोदरच घराच्या भिंतींतून, कौलारांतून गारवा झिरझिरत जाई! जास्वंदीच्या फांदीवर लालभडक फूल यावें, तसें घराच्या ओठांवर हास्य फुलून येई. जास्वंदी सुकत चालल्याची बातमी घरच आजोबांच्या स्वप्नांत जाऊन सांगतें अशी माझी माझ्या बालवयांत अगदीं पक्की खात्री झाली होती! कारण, आजोबांच्या

अनुक्रमणिका

डोळ्यांत मोतिबिंदू पडले होते. त्यांना स्वतः कांहीं पहाणें मुळींच शक्य नव्हतें! मग ही गोष्ट त्यांना कशी बरें कळत असावी?

समुद्राच्या काठांशींच आमचें हें घर उभें होतें. समुद्राची गाज अहोरात्र कानावर पडत असे. दुपारच्या वेळीं मागीलदारीं पडवींत उभें राहिलें कीं, कलाबतूचें गाणें म्हणणाऱ्या लाटा दूरवर दिसत. कधीं दूरवर धुराचा लोट फेंकीत येणारी आगबोटहि दिसत असे. घराच्या भोवतीं माडाचीं उंच झाडें होतीं. हिरव्या झावळ्या हलवीत तीं मजेंत डोलत रहात. घरासमोरच तुळस उभी होती. तिच्या चौथऱ्यावर चुन्यानें डिझाइन् काढलेलें होतें. तुळशीच्या हिरव्या गर्दीत कसें कुणाला ठाऊक, गुल्छबूचें बी पडलें होतें. त्या चिमुकल्या रोपट्याला कधीं तरी बगळ्यासारखी उंच मान करून पहाणारें पांढरें शुभ्र फूल येत असे! तुळशीच्या बाजूला एक जुनाट चांफ्याचें झाड होतें. उंटाच्या मदारीसारख्या या झाडाच्या फांद्यांवर जाडजूड गांठी आल्या होत्या. दोन पिढ्या तें झाड शांतपणें उभें होतें. ऐंशी वर्षांच्या म्हातारीसारखें तें कमरेंत वाकलें होतें. पण अचानक हें जुनाट झाड पांढऱ्या शुभ्र फुलांच्या भाषेंत बोलूं लागे. त्या फुलांच्या शुभ्र पाकळ्यांना आंतून सुंदर पिवळा रंग असे. सकाळीं उठून खळ्यांत उभें राहिलें कीं, झाडाच्या खालीं मातीवर त्या पांढऱ्या पिवळ्या फुलांची रांगोळी उमललेली दिसे.

मी त्या घराचा नुसतें घर म्हणून विचारच करूं शकत नाहीं. आजूबाजूचीं झाडें, घरांतलीं माणसें, पुढल्या दारीं भिंतीवर टांगलेला तो कंदील...या साऱ्या गोष्टी त्या घराशीं माझ्या आठवणींत एकजीव झालेल्या असतात! त्या घराचा, घरांतल्या वातावरणाचा त्या अपरिहार्य भागच झालेल्या असतात!

पुढल्या दारीं भिंतीवर दशावतारांतलीं चित्रें असलेलीं कॅलेंडरें टांगलेलीं असत! तीं कोणकोणत्या सालांतलीं होतीं हें त्या चित्रांतले देवच जाणत! या भिंतीला लागूनच एक खोली होती, त्या खोलीचें नाव होतें गवताची खोली! गुरांना घालायचें गवत या खोलींत सांठवून ठेवलेलें असे. त्या अंधाऱ्या खोलींत पिवळसर गवताचा ढीग पडलेला असे. त्या खोलीची मला उगीचच भीति वाटायची! आम्हा मुलांचा त्रास फारच वाढला कीं, आम्हांला गवताच्या खोलींत कोंडून ठेवण्याची धमकी मिळत असे! गांवांतल्या एका घरांत अशाच एका खोलींत म्हणे एका मुलाला शिक्षा म्हणून कोंडून ठेवलें होतें. त्या खोलींत आधींच एक अजगर लपून बसला होता! त्या भेदरलेल्या पोराला त्या अजगरानें गिळून टाकलें! ही गोष्ट मला कुणी तरी सांगितली होती! मला सारखें वाटायचें कीं त्या गवतांत कुठेंतरी एकादा अजगर निश्चितच लपून बसलेला असणार! त्याचा घट्ट विळखा कल्पनेंतच माझ्या अंगाभोवतीं पडलेला मला जाणवत असे! गवताच्या खोलीचीं भीतिदायक स्वप्नें मला पडत!

या खोलीच्या समोरच लाकडी कठड्याला टेकून माझे पणजोबा बसत. त्यांच्या वयाचीं ऐंशी वर्षें उलटून गेलीं होतीं. तरुण वयांत ते गांवाचे फौजदार होते! प्रथमदर्शनींच डोळ्यांत भरावी अशी त्यांची उंच धिप्पाड शरीरयष्टि होती. दृष्टि पार गेली होती. अंधाराच्या समुद्रांत त्यांची दृष्टि कितीक वर्षें बुडून गेली होती. हातांत काठी घेऊन पायांतल्या खडावा बाजवीत पुढल्या दारच्या व्हरांड्यांत ते शतपावल्या घालीत असत. त्या खडावांच्या आवाजानें घर कसें भरल्यासारखें वाटायचें! भर रस्त्यावरून आपल्या बापाचें बोट धरून लहान पोर जसें आत्मविश्वासानें तुरुतुरु

---

[पान १३० वरून पुढें चालू]

त्याच्या मागोमाग काम उरकून तीहि जायची. कोंडाप्पानेंहि कांहीं तक्रार केली नाहीं. नाहीं तरी त्याला माझा बंगला लांबच पडायचा.

ह्या एकंदर प्रकाराची मला लवकरच इतकी संवय झाली कीं त्यांत कांहीं विचित्र आहे असं वाटेच ना—आंध्रनिर्मितीच्या पहिल्या वाढदिवसापर्यंत.

त्या दिवशीं सचिवालयांत पार्टी होती. रात्रीं यायला बारा वाजले. त्या पूर्वी मला कदाचित् जर उशिरच झाला तर रुखमण वेळेच्या पलिकडे थांबत नसे. कुलूप लावून जाई. मी तिच्याकडे एक वेगळी किल्लीच दिली होती. रात्रीं बाहेरचं दार ढकलल्यावरच उघडलं. आंतल्या दोन्ही खोलींत दिवे होते. मी प्रथम स्वयंपाकघरांत गेलों. तिकडे कांहीं ती नव्हती. तिकडून झोपायच्या खोलींत गेलों. दिया तसाच उघडा ठेवून माझ्या पलंगावर ती गाढ झोंपून पडली होती.

"रुखमण," मी थोडी मोठ्यानंच हांक मारली. पण ती कांहीं जागी झाली नाहीं.

मी गांगरलों—पण थोडाच वेळ.

कपडे उतरून व्हरांड्यांतल्या दिवाणवर जाऊन झोपलों.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिनं नेहमींसारखींच कामं केलीं. रात्रीच्या घटनेबद्दल मी तिला विचारलं नाहीं. तिनंहि चकार शब्द काढला नाहीं.

आठवड्यांतच मला कुर्नूलहून पुन्हां मद्रासला जावं लागलं. सरकारी यंत्रणेंतील कांहीं चाकं अचानक फिरलीं होतीं.

गोष्ट अशी ही एवढीच—इथंच संपायला हवी. पण मागाहून मला एक दोन गोष्टी समजल्या. त्याहि सांगायल्या हव्यात.

माझ्यामागून त्या बंगल्यांत सुब्रह्मण्यम्—माझाच एक जुना मित्र आणि सहकारी—रहायला आला होता. रहायला गेल्यानंतर चार-पांच दिवसांतच त्यानं मला पत्रांत लिहिलं.

"गेल्या शनिवारीं संध्याकाळीं मी बंगल्याच्या आवारांत वाचीत बसलों होतों. इतक्यांत समोरच्या मार्केटांतून एक लोकांचा घोळका आला. एक म्हातारी एका पोरीला मारीत होती. पोरगी थेट माझ्यापाशीं आली. मी सगळ्यांना हांकलून काढलं. ही पोरगी आतां माझ्याकडेच कामाला आहे. ती म्हातारी तिची सासू आणि पैसे न्यायला येतो तो तिचा नवरा. ही माहिती मी स्वतः काढली. पोरीनं पुष्कळच कांहीं थापा दिल्या होत्या. कांहीं असलं तरी पोरगी मोठी स्पोर्ट आहे. पैसे थोडे जादा द्यावे लागतात पण मी तरी इतके घेऊन काय करणार आहे? गरिबाला मला पाहवत नाहीं. you know!" इत्यादि...

डायरींत मी त्या दिवशीं लिहिलं

"माझं कुठं चुकलं का?"

आणि त्याचं उत्तर:

"मुळीच नाहीं वाटत. तिनं माझ्यावर विश्वास टाकला. विश्वासाला मी विश्वास दिला. बाकीचं जग चुकत असतं. आपण नाहीं."

आणि मग लगेच खालीं ओळ मारून लिहिलं:

Pompous Ass.

• •

• • •





चालतें, तसें त्या खडावांच्या आवाजाच्या धीरानें घरांतलें वातावरण धिटाईनें उभें आहे असेंच वाटे! नुकत्याच फोडलेल्या नारळाचें वरवरचें किसलेलें मऊमऊ खोबरें आजोबा जेवणानंतर मुखशुद्धि म्हणून खात! शेवटीं वाटींत थोडेसें उरलें कीं, मला हांक मारून तें माझ्या हातावर ठेवीत. हा क्रम इतका नित्याचा झाला होता कीं, ते केव्हां हांक मारतील हें मी दुसऱ्या खोलींत असलों तरी मला अगदीं नेमकें कळत असे!

दिवेलागणीच्या वेळीं आजोबांच्या पुढें बसून आम्ही परवचा म्हणत असूं. बे एके बे पासून शक्य तितक्या बेसूर आवाजांत सुरवात करून थेट औटकीपर्यंत सर्व पाढे म्हणावे लागत! पाढे सरळ म्हणण्यापेक्षां मधले मधले पाढे न म्हणतांच पुढें उड्या मारणें यांतच आमचें सारें कौशल्य पणाला लागत असे! आजोबांना आमच्या सगळ्या युक्त्या ठाऊक असत! मधून मधून ते एकदम खड्या स्वरांत विचारीत, "उडक्यो मारतासात् काय रे हरामखोरांनो, आं?" यावेळीं जादूच्या सतरंजीवरून उड्डाण करणाऱ्या राजपुत्राप्रमाणें नवाच्या पाढ्यावरून आम्ही उड्डाण करून एकदम अठरा एके अठरावर पुढच्या उड्डाणाची तयारी करण्यासाठीं कांहीं काल स्थायिक झालेले असूं!! परवचा संपल्यावर आजोबांच्या गोष्टी सुरू होत! आजोबा म्हणजे गोष्टींचें, जुन्या जुन्या आठवणींचें भांडारच होतें! हां हां म्हणतां त्या काळांतल्या अंधुक अद्भुत वातावरणांत ते घेऊन जात! म्हातारा गोविंदा गडी विझलेली विडी कानाला लावून मुंडकें डुगुडुगु हलवीत भारून गेल्याप्रमाणें सारें ऐकत बसे! आम्ही तर नेहमींचेच भाविक श्रोते होतों! त्या गोष्टींची अनेकदां पुनरावृत्ति होत असे! पण तरीहि त्या पुन्हा ऐकतांना नवीनच वाटत! कांहींतरी अंधुक अंधुक आठवत असल्याप्रमाणें हलक्या, उत्सुकता जागृत करणाऱ्या आवाजांतच आजोबा सुरवात करीत :

"मानशीच्या पुलावरसून मी घराकडे येय् होतंय्"

"किती वाजलेले?" गोविंदा विचारी.

"दीड दोन झाले रात्रीचे! चान्नां पडलालां. रस्त्यार कुत्रांसुद्धां नाय् होतां. माझ्या मागसून पावलां वाजल्याचो आवाज आयलो. मी मनांत समाजलंय्. तो मानशीच्या पुलावयलो देवचारच होतो! मी मनांत म्हटलां आतां चकार शब्द बोलून उपयोगी नाय! बोललंय् कीं दगड होवून पडलंय्! देवचार लागी आयलो. माका म्हणालें,

"मासळी होयी रे"

मी गप! वाचा नाय्!

"ताजी आसा. अत्तांच पागलेली!"

माझ्या तोंडांतसून शब्द नाय्! मी वळून बघलां. सरंगे, संवदाळे, मुडदुशो! मीं पिशवी पुढें धरली. तेनी ती सगळी मासळी पिशवेंत ओतली. मी एक शब्द बोलूंक नाय्. झपझप पावलां टाकीत घराकडे आयलंय्! फाटफटेचें चार वाजलेले. पिशवेंतली मासळी ताटलेंत ओतलंय् तर काय! सगळे दगड!"

देवचाराच्या भीतीनें आमच्या पोटांत गोळा उठलेला असे. आजोबांच्या मागून चालणाऱ्या त्या देवचाराच्या पावलांचा आवाज त्या अंधारांत आम्हाला स्पष्ट ऐकूं येई. आजोबा त्या देवचाराशीं एक शब्द जरी बोलते तरी खैर नव्हती! त्या रात्रींच्या माझ्या स्वप्नांत देवचार हा अगदीं ठरलेला असे!

नंतर आम्ही शाळेसाठीं म्हणून मुंबईला स्थायिक झालों. सुट्टींतच गांवीं जात असूं. आगबोटी बंद होण्याच्या वेळीं पुन्हा मुंबईला परत यायचें! सुट्टीचे महिने दोन महिने कसे उडून जात तेंच कळत नसे; जाण्याची वेळ येई. लक्ष्मण गाडीवाल्याची सारवट गाडी बंदरावर नेण्यासाठीं बाहेर उभी असे. आम्हाला सगळ्यांना देवघरांत घेऊन आजोबा देवापुढें नारळ ठेवण्यासाठीं उभे रहात. बाहेरून उग्र गंभीर भासणारा तो ऐंशी वर्षांचा वृद्ध पुरुष गहिंवरून येई! नमस्कार करून आजोबा बोलत,

"देवा सायबा, तुकां हो नाल ठेवतसंव्. लेकरांबाळांर तुझी नजर असां दे. तेंका सगळ्यांक सुक्षेम घेवन् जा! सुक्षेम पोचल्याचां पत्र आयल्यार भायल्या पिंवळार तुझ्या नांवान् सोमवारीं दिवो लांव्..."

गाडींत बसण्यासाठीं सर्वांना नमस्कार करून आम्ही बाहेर निघालों कीं डोळ्यांत अश्रू उभे राहिल्यामुळें मला कांहींच दिसत नसे! आजोबा गंभीर होत. अगदीं आमच्या घरासारखे गंभीर होत! भावनाविवश होऊन ते कधींच बोलत नसत! सारवट गाडींत बसून जातांना माझ्या मनांत आठवणी गोळा होऊं लागत! माझ्या डोळ्यांपुढें आजोबा उभे रहात. आतां आजोबा त्या लाकडी कठड्याला टेकून बसले असतील. माझ्याप्रमाणेंच त्यांच्याहि डोळ्यांसमोर अनेक आठवणी तरळत असतील. आम्ही मुलें समोर बसून परवचा म्हणत आहोंत अशी कल्पना ते करीत असतील. हे सारे कल्पनेचे खेळ आहेत हें विसरून एकदम ओरडत असतील, "उडक्यो मारतासात् काय रे हरामखोरांनो, आं!"

मी घराविषयीं लिहितों आहें कीं आजोबांविषयीं? पण माझा या गोष्टीला इलाज नाहीं. घराविषयीं लिहायचें म्हणजे मला आजोबांविषयीं, त्या चांफ्याच्या झाडाविषयीं, त्या 'मंगळा' गायीविषयीं, 'सिंधु' मांजराविषयीं, माजघरांजवळ्या त्या कुंद अंधाऱ्या वातावरणाविषयीं, तरुण वयांतच वारलेल्या माझ्या मावशीविषयीं, दाजी आजोबांविषयीं, आजी विषयीं......लिहिलेंच पाहिजे. या सर्वांशिवाय घर आणि त्या घराशिवाय हे सर्वजण माझ्या डोळ्यासमोर मुळीं उभेच राहूं शकत नाहींत. 'सिंधु' मांजराच्या शुभ्र अंगावरचा डौलदार हिरवा ठिपका मला अजूनहि स्पष्टपणें आठवतो. आजीनें तव्यावर टाकलेली लाललाल नाचणीची भाकरी अजूनहि मला दिसते—नव्हे तिचा वास मला येतो! आजोबांनीं सांगितलेल्या गोष्टींतलीं देवचाराचीं पावलें माझ्या मनांत वाजूं लागतात! गवताच्या खोलींतलें अंधाराचें कांबळें डोक्यावर मुरूप घेऊन बसलेलें गवत मला दिसतें. या साऱ्या गोष्टी त्या घराचेच अपरिहार्य असे अवयव आहेत असेंच मला वाटतें!

माणसांसारखींच घरेंहि म्हातारीं होतात! झाडावर बसलेलीं पांखरें हळूहळू उडून जातात, तशीं कधींहि परत न येण्यासाठीं माणसेंहि दूरदूर उडून जातात! घराला एकटें एकटें वाटूं लागतें. घर व्याकुळ होतें. आजोबांच्या पायांतल्या खडावांचा आवाज ऐकूं येतो आहे असा उगीचच घराला भास होतो! रिकाम्या खोल्यांच्या गळ्यांत अंधाराचा हुंदका दाटून येतो!

आठ वर्षांपूर्वी कोंकणांत जाण्याचा योग आला. घराचें 'दर्शन' घेण्यासाठीं मी मुद्दामच गेलों. घर पार कोसळलें होतें. गळ्यांत गळे घालून वासे पडले होते. गोठा रिकामा होता! बिळांतून जिवाणूंनीं आश्रय घेतला होता. सारा शुकशुकाट!

ऐंशी वर्षांच्या म्हाताऱ्यासारखें कमरेंत वांकलेलें चांफ्याचें झाड मात्र अजून तसेंच उभें राहून जमिनीवर तें पांढऱ्या पिवळ्या फुलांची रांगोळी घालीत होतें!

कोसळलेल्या भिंतींकडे पहात तें एकटेंच उभें होतें!!

• • •








# लालन बैरागीण

*मराठ्यांच्या इतिहासांतलि एक अज्ञात, करुणरम्य प्रीतिकथा !*

उत्तमोत्तम कादंबऱ्या चित्ररूपानें सादर करण्याचा प्रयत्न आपल्या भाषेंत कुणी केलेला नाहीं. इंग्रजींमध्यें असे असंख्य प्रयत्न झालेले आहेत. ते पहात असतांना आपणहि आपल्या भाषेंत असा एकादा प्रयत्न करून पहावा असें वाटत असे. 'लालन बैरागिणी' च्या रूपानें ती कल्पना प्रत्यक्षांत उतरत आहे. वाचक या अभिनव प्रयोगाचें स्वागत करतील असा विश्वास वाटतो.

इ. स. १७६१ मध्यें पानिपतच्या रणभूमीवर मराठे आणि गिलचे यांच्यामध्यें झालेलें युद्ध ही मराठ्यांच्या इतिहासांतील अत्यंत महत्त्वाची घटना आहे. मराठ्यांच्या वाढत्या सत्तेला या युद्धानें जोराचा हादरा बसला. इथूनच त्यांच्या साम्राज्यसत्तेला उतरती कळा लागली. हा इतिहास सर्वांच्या परिचयाचा आहे.

या ऐतिहासिक घटनेच्या आधारें कै. नागेश विनायक बापट यांनीं 'पानिपतची मोहीम' या नांवाची एक कादंबरी सुमारें ६० वर्षांपूर्वी लिहिलेली आहे. त्या काळांत ही कादंबरी खूप गाजली होती. कै. हरिभाऊ आपटे किंवा नाथ-माधव यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या जाण्यापूर्वीचा तो काळ होता. त्या काळीं आजच्यासारखीं मराठ्यांच्या इतिहासाचीं विश्वसनीय साधनें फारशीं उपलब्ध नव्हतीं; आणि ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिण्याचे प्रयत्नहि आपल्या भाषेंत रूढ झालेले नव्हते. स्कॉट, थॅकरे प्रभृति इंग्लिश कादंबरीकारांचा आदर्श समोर ठेवूनच 'पानिपतची मोहीम' लिहिण्याचा प्रयत्न कै. बापट यांनीं केलेला आहे.

ऐतिहासिक कादंबरी म्हणजे केवळ तत्कालीन घटनांची तपशीलवार, साद्यंत हकीगत सांगणारा ग्रंथ नव्हे. कादंबरीला कथानक लागतें; शृंगार-वीर—करुणादि नवरस प्रकर्षानें निर्माण करणारे प्रसंग लागतात; आणि नायक-नायिका लागतात! ऐतिहासिक सत्याप्रमाणें कवि-सत्याची कांसहि अशा स्वरूपाच्या कादंबरीला धरावी लागते. मात्र हा कल्पित भाग संभवनीयतेच्या कोटींतला आणि मूळच्या ऐतिहासिक प्रकृतीशीं सुसंवादी असा असावा लागतो. ऐतिहासिक कादंबरीच्या या मर्यादा आणि अपेक्षा ध्यानांत घेऊनच कै. बापट यांनीं 'पानिपतच्या मोहिमें'त लालन बैरागिणीची कथा रंगविली आहे. या कल्पित कथेचें मूळहि त्याच नांवाच्या इंग्रजी कादंबरींत आहे.

पानिपतच्या रुद्रभीषण पार्श्वभूमीवर लालनच्या प्रीतीची आणि त्यागाची करुणकथा विशेष खुलून दिसते. त्यांतील कारुण्याच्या छटा अधिक गडद होतात. विजनवासांत वाढलेली, प्रेमासाठीं परदेशी आणि वनवासी झालेली, प्रियकरासाठीं कसलेंहि दिव्य करायला तयार होणारी आणि अखेर त्याच्यासाठींच प्राणार्पण करणारी ही षोडशवर्षीय भाबडी पोर वाचकांना चटका लावते.

'पानिपतच्या मोहिमें'तील लालनची प्रीतिकथा आम्ही प्रस्तुत चित्रकथेसाठीं निवडली आहे. कादंबरीचा विषय क्रांतिकारक; आणि त्यांत रोमहर्षक प्रसंगांची रेलचेल आहे. स्थलसंकोचास्तव कांहीं मोजक्या प्रसंगांमध्यें ती सुसूत्रपणें चित्रित करणें अत्यंत अवघड होतें. आमच्या प्रयोगाचें यश अजमावण्याचा अधिकार वाचकांचाच आहे. मात्र या प्रयोगामुळें आपल्या भाषेंतील उत्तमोत्तम कादंबऱ्या चित्रित करण्याचे प्रयत्न सुरू झाले, तरी आमच्या श्रमांचें सार्थक होईल !




बैरागिण
अहमदशाह अबदालीनं हिंदुस्थानवर स्वारी केली होती. त्याला तोंड देण्यासाठीं मराठ्यांच्या फौजा सदाशिवराव भाऊंच्या अधिपत्याखालीं पुण्याहून निघाल्या होत्या. त्या काळांतली गोष्ट—


एक तरुण मराठा शिलेदार तहानेनं व्याकुळ होऊन गावच्या मठांत गेला.
त्याची तहान भागली. मन तृप्त झालं! पण तिचं मन..? पहिल्या नजर भेटींत त्यानं तिचं मनोगत अचूक जाणलं!—


“तुझ्यावर मोहिनी मंत्र टाकून जातो. त्यानं तूं माझ्या मागं माझा शोध काढीत येशील!”
—असं म्हणून त्यानं रिकिबींत पाय ठेवला.


ती उदास झाली. तिच्या बापानं ओळखलं: मुलगी उपवर झाली आहे. तिच्यासाठीं नवरा शोधला पाहिजे—


“आतां बापानं शोधून आणलेल्या नवऱ्याचा काय उपयोग?...”
बैराग्याचा वेष घेऊन तिनं घर सोडलं, आणि त्या तरुणाच्या शोधासाठीं ती गांवोगांव हिंडूं लागली

[अनुक्रमणिका](#)


नाहीं ठावुक नाव नाही गांव! मग तो तरुण कुठून भेटणार! पण पानिपतकडे निघालेल्या मराठ्यांच्या फौजा भेटल्या तिला दिशा दिसली
पानिपत गांठलं. पण अखेरच्या टप्प्यावर दैव आडवं आलं! मराठ्यांच्या छावणी ऐवजी ती नेमकी दुराणीच्या छावणीकडे वळली!—
दाऊदखान आणि खुदाधार या पहारेकऱ्यांनी पहातांक्षणी तिला गीरफदार केलं. भुकेलेल्या लांडग्यांना भक्ष्य दिसलं...
दाऊदखान आणि खुदाधार यांची सुंदोपसुंदी चालू असतांना पहाऱ्यावरला अमलदार लुत्फखान तिथं आला प्रथमदर्शनीच तिच्या सौंदर्यानं वेडावून गेला!
पण लालनच नशीब शिकंदर! खुद्द अहमदशाह त्या जागीं उपस्थित झाला. तिचं गायन आणि बीन वादन ऐकुन त्याचं मन प्रसन्न झालं —
स्वार शिबंदी देऊन कडक बंदोबस्तांत तिची रवानगी मराठ्यांच्या छावणीकडे
हुकूम शहानं लुत्फखानाला सोडला!—

अनुक्रमणिका


हातची शिकार जाणार म्हणून लुत्फखान
कासावीस झाला. तिनं एक मात्र तरी रहावं
आणि आपल्या प्रेमाच्या स्वीकार करावा
म्हणून तो तिची मनधरणी करूं लागला.


पण तिचा निश्चय ढळला नाहीं. रहात्या हुकुमा-
पुढं त्याची मति कुंठली. तिला मराठ्यांच्या छावणी-
कडे पोंचवणं भाग होतं. मात्र तिच्या उजळ्यांतून
आपला एक हेर त्यानं गुप्तपणें पाठवलाच!—


अचानकपणें तिचं भाग्य तिला भेटलं! तिनं
ज्याच्यासाठीं घर सोडलं, वनवास पत्करला,
तोच तरुण रणस्तंभाजवळ उभा होता! त्यानं
तिला आपल्या ताब्यांत घेतलं. केवळ कर्तव्य
म्हणून! तिची ओळख तो पूर्ण विसरला होता-


भेट झाली, पण तिच्या कपाळीचा विरह
मात्र चुकला नाहीं! वैरपूर्ण समजून तिची
व्यवस्था त्यानं एका महालांत केली. आणखी
हेरानंहि तिथंच आपली वर्णी लावून घेतली!


हेरानं आपली कामगिरी चोख बजावली!
त्याच रात्रीं लुत्फखानानं महालावर छापा
घातला आणि जबरदस्तीनं लालनला
आपल्या छावणींत पळवून नेलं!—


पण याहीवेळीहि दैव तिच्या मदतीला धावून आलं! अचानक
छावणीवर पुन्हा हल्ला चढविण्यासाठीं शिंदे-होळकरांच्या
स्वारांनी तीच वेळ निवडली! महिपतराव नामक शिंद्यांच्या
शिपायानं पिंडाऱ्यानं जळती तिथून सुटका केली!—


महिपतराव तिला घेऊन परत येत होता. वाटेंत रणमैदानावर तिचा प्रियकर लुत्फखानाशीं द्वंद्वयुद्ध खेळण्यांत गुंतला होता. अनिमिष नेत्रांनीं तीं त्याचा पराक्रम पाहूं लागली —
खानाचा घोडा रणांगणांतून पळून गेला. त्यानं शरणागति पत्करली! आपल्या प्रियकराचं शौर्य पाहून लाजून हरखली. मग महिपतरावानं तिला त्याचें नांव सांगितलं .... 'महादजी शिंदे!'...
ओळख पटली. तिची आणि तिच्या उत्कट प्रेमाची!... आपण सहज बोलून गेलों. पण त्या भोळ्याभाबड्या जीवानं आपल्या प्रेमासाठीं केवढं दुःख भोगलं .... महादजीला हें जाणवलं; आणि त्यानं ति च्या प्रेमाचा स्वीकार केला!
या अनागर मुलीला खानदानी रीतिरिवाज कुठून माहीत असणार? वाकचतुर सवतींचा ससुरवास तिला सोसवेल का? महादजींच्या मनांत या शंका आल्या; आणि तिची व्यवस्था कबिल्यांत न करतां महिपतरावाच्या छावणींतच त्यांनीं केली!...
'पहिली ओळख गोडीची!'
महादजींच्या सहवासांत लळन स्वर्गसुख उपभोगीत होती! ...पण मराठ्यांच्या छावण्यांतून अनर्थ माजला होता! फौज तळ ठोकून स्वस्थ बसली होती. अहमदशहानं रसद मार- त्यामुळें त्यांची उपासमार सुरू झाली होती. सैनिकांचा धीर सुटूं लागला होता. प्रत्येकाला वाटूं लागलं, असं अधांतरी स्थितींत कितीकाळ राहायचं? त्यापेक्षां शस्त्र उचलावं आणि जन्माचा सोक्षमोक्ष लावावा. उपासमारीपेक्षां मरण बरं!-


भाऊसाहेबांनीं दरबार भरवला. प्रमुख सरदारांची सल्लामसलत घेतली. दुसऱ्या दिवशीं युद्धाला तोंड फोडायचं, मारीन किंवा मरेन अशा ईर्ष्येनं लढायचं असा निर्णय झाला. भाऊसाहेबांनीं साऱ्या सरदारांना केशरी पोशाख आणि निरोपाचे विडे दिले!
भाऊसाहेब काळजींत पडले. सैनिक गलितधैर्य झालेले आणि सरदार फंदफितुरीनं, कारस्थानांनी पोखरलेले!... मराठ्यांना विजयश्री मिळेल का?...


लखनूरचा नवाब सुजाउद्दौला भाऊसाहेबांचा मित्र होता. त्याला शत्रूच्या गोटांतून फोडतां येईल का? पण एवढ्या जोखमीच्या कामगिरीवर कुणाला पाठवायचं! भाऊसाहेबांनीं महादजी शिंद्यांचा विचार घेतला—


पुरुषी वेष केला म्हणून काय झालं? शत्रूच्या गोटांत घुसणं धोक्याचं होतं. महादजींच्या तें जीवावर आलं होतं. पण त्याच्या प्रेमासाठीं ती तेंही दिव्य करायला सिद्ध झाली


स्वार शिपायांची सोबत घेऊन लालननं गुप्तपणें शत्रूच्या छावण्यांकडे प्रयाण केलं. शत्रूचा गोट तिला अपरिचित नव्हता ...पण आजचा प्रसंग मात्र वेगळा होता!


मोठ्या हिकमतीनं तिनं सुजाउद्दौलाशी भेट घेतली, अत्यंत चतुराईनं त्याच्याशी बोलणं केलं. पण भाऊसाहेबांना काय उत्तर पाठवायचं, या काळजींत सुजा पडला!—


धोका पत्करला, पण शिष्टाई फुकट गेली! निराश अंतःकरणानं ती परत फिरली. शत्रूच्या गोटांतून सुखरूपपणें बाहेर आली खरी!—



अनुक्रमणिका


पण तिला आपल्या खाळणीचं दर्शन घडायचं नव्हतं!… मराठ्यांच्या फौजा पानिपतच्या युध्द-भूमीवर खड्या झाल्या होत्या, आणि त्यांना तोंड देण्यासाठीं अहमदशहाचं सैन्य सज्ज झालं होतं!–
'हरहर महादेव' आणि 'अल्ला हो अकबर' अशा गर्जना झाल्या. लढाईला तोंड फुटलं. तोफा आग ओकूं लागल्या, बंदुका कडकडूं लागल्या, आणि फौजेशीं फौज भिडून तरवारी खणखणूं लागल्या.
मराठ्यांच्या फौजेनं पराक्रमाची शर्थ केली. मध्यान्हकाळपर्यंत जयाचं पारडं त्यांच्या दिशेला झुकलं होतं. पण अकस्मात् विश्वासरावांना गोळी लागून ते पडले! एक मोती गळालं....
भाऊसाहेब बेभान झाले. दोन्ही हातावर पट्टे चढवून रणधुमाळींत घुसले. मराठ्यांच्या फौजेला दुराण्यानं वेढा दिला होता. भाऊसाहेबांनी पराक्रमाची कमाल केली. पण नियतीचा संकेत वेगळाच होता! —
भाऊसाहेब धारातीर्थी पडल्याचं वृत्त समजतांच मराठी फौजेनं शस्त्रास्त्रं खालीं टाकलीं, आणि जीव ंच बचावासाठीं पळापळ सुरू केली! त्यांना रोखण्याचा यत्न महादजी शिंदे करीत होते— पण व्यर्थ!...
पराभव अटळ आहे, आतां दुराण्यांची फळी फोडून दिल्लीच्या रोखानें पळून जाण्यावांचून गत्यंतर नाहीं, शिंद्यांच्या फौजेनं हें ओळखलं व भालफेंक करीत दुराणी फौजेवर हल्ला चढवला!–

अनुक्रमणिका


त्या धुमश्चक्रींत महादजी आणि लुत्फखान पुन: समोरासमोर आले. निकरानं लढले. खान घोड्यावरून खालीं कोसळला, पण पडतां पडतां त्यानं महादजीवर जोराचा वार केला. त्यांना मांडीला जबरदस्त दुखापत झाली.


महादजींना मूर्च्छा आली. घोडीच्या ... त्यानं ओळखलं. लाडनानं चटकन् त्यांच्या घोडीवर उडी घेतली; डोकीवरचा फेटा सोडून त्यांची जखम बांधली, त्यांना सावध केलं आणि धीर दिला! —


शेल्याच्या पदरानं लाडनला आपल्या पाठीशीं बांधून घेतलं; आणि मोठ्या हिकमतीनं त्यानं दुश्मनांची फळी फोडली. विजेच्या वेगानं तीं दोघं दिल्लीच्या रस्त्याला लागलीं. पण सावध झालेल्या लुत्फखानानं पुन: त्यांचा पाठलाग आरंभला होता.


महादजींची घोडी थकली होती. खानाच्या हातीं आपण सांपडणार! त्याचा डोळा आपल्यावर आहे हें खरं; पण आपल्यामुळं कदाचित् महादजींचं मरण ओढवेल हें तिनं ओळखलं. आणि त्याच क्षणात तिनं हलकेच ... ने घोड्याची पाठ सोडली!


थोडंसं पुढं गेल्यावर महादजींच्या लक्ष्यांत आलं.... लाडन पाठीशीं नाहीं! काय करावं त्यांना सुचेना. क्षणभर ते निश्चल गोंधळले. तेवढ्यांत लाडनची किंकाळी त्यांच्या कानीं आली


लाडन लुत्फखानाच्या तावडींत सांपडली. जबरदस्तीनं तो तिला पकडून नेऊं लागला—

अनुक्रमणिका


घोडी विलक्षण थकली होती; पण लाडनची किंकाळी ऐकतांच महादजीनं पुनः तिला टांच दिली. पण अखेरच्या आवेशांत तिनंजी उडी मारली, तीच अखेरची ठरली! घोडी गतप्राण झाली आणि महादजी बेशुद्ध होऊन कोसळला!
मोड झालेली मराठ्यांची फौज पळून येत होती. त्यांतल्या कांहीं स्वारांनीं महादजीला ओळखलं; पखालीच्या बैलावर बांधलं; आणि राणेखान भिस्ती बैल हांकलीत निघाला. मजल दरमजल करीत तो महादजीला सुखरूपपणें घेऊन दिल्लीला पोंचला!
लाडननं आपल्या जनान्यांत यावं म्हणून लुत्फखानानं तिची मनधरणी केली, तिला मोठमोठीं आमिषं दाखवलीं! पण ती त्याला वश होईना....
एके दिवशीं अचानकपणें लुत्फखानाच्या घरांत दाऊद-खान येऊन थडकला. आपली शिकार उपटली म्हणून त्याला लुत्फखानावर दांत होताच! आतां शक्तीच्या जोरावर ती पुनः हस्तगत करण्याचा विचार दाऊदनं केला होता. ते दोघे लाडनच्या प्राप्तीसाठीं रानटी पशूंसारखे लढूं लागले —
दाऊदला कंठस्नान घालून रक्तलांछित तरवारीनिशीं लुत्फखान परत आला; पण समोरचं दृश्य पहातांच भयचकित झाला... जागच्या जागीं खिळून उभा राहिला! आतां आपल्यापुढं काय वाढून येणार आहे हें लाडननं ओळखलं, आणि क्रूर विटंबनेऐवजीं मृत्यूचा स्वीकार केला!.....
पानिपतावर दोन मोत्यें गळालीं, सत्तावीस मोहरा खर्ची पडल्या, व मोडखुर्दा किती उडाला याची गणतीच नाहीं. पण लाडन नांवाची एक अज्ञात हिरकणीहि त्यांत हरपली; तिच्या दिव्य प्रेमाची आठवणदेखील इतिहासानं ठेवली नाहीं!

अनुक्रमणिका



# समांतर रेषा

—विभावरी शिरूरकर

नागपंचमीचा तो फेर पाहिल्यापासून मी ठरवलं होतं. आणि अखेर मी तिकडे वळलें. तीं सगळीं घरं कलावंतांचीं होतीं. कळकांच्या मोळ्या कितीक घरांशीं उभ्या होत्या. आणि त्या कलावंतांच्या एकेक दोन दोन खोल्यांचीं घरंच नव्हेत, तर त्यांच्या दुतर्फा घरांच्या रांगांतून जाणारा सारा रस्ता कळकांच्या तारांनीं अस्ताव्यस्त सजवून टाकला होता.

एकनाथच्या घरीं जातांना माझं मन संकोचलं होतं. गेल्या चार वर्षांत त्याची मला कधींहि आठवणसुद्धां झाली नव्हती. असेंब्लीच्या निवडणुकांच्या हुल्लडबाजींत एकनाथनें साऱ्या बुरुड वस्तीचीं मतें मला मिळवून दिलीं होतीं. त्यावेळीं एकनाथ जणुं माझ्या स्नेह्यांच्या प्रभावळींतला अशी मी त्याच्याशीं बोलतें असे. आणि तोही बिचारा आपण कांहीं सार्वजनिक कार्य करीत आहों या दृढ विश्वासानें जेवणाखाणाची पर्वाही न करतां राबत होता. पण मी? मी कधीं त्याच्या वस्तींतही गेलें नव्हतें कीं घरींही गेलें नव्हतें. एकनाथचं घर, त्याचं दारिद्य, त्याचं अन्नवस्त्र—मला त्याबद्दल विचारच करण्याची इच्छा कधीं झाली नव्हती. तें कांहीं मला स्पर्शलंच नव्हतं!!

आज माझं मन ओशाळलं होतं. कारण ती जुनी चार वर्षांपूर्वीची माझ्याच कामानिमित्त झालेली ओळख आज पुनः माझ्याच कामानिमित्त उजळावला मी चाललें होतें! त्या भाजी मंडईत गेल्या चार वर्षांत हजारों वेळां मी आलें होतें. पण एकनाथ माझ्या विस्मरणाच्या पेटींत जणुं कायमचा मोहोरबंद होऊन पडला होता. माझ्या गांवचा, माझा बांधव, माझ्या धर्माचा, माझी भाषा बोलणारा, माझ्या घरांतली सुपाटोपल्यांची नि चिकाच्या पड्यांची सोय भागवून देणारा एकनाथ. माझ्या घरांतल्या वेताच्या खुर्च्या कलावंताच्या हातांनीं करून देणारा एकनाथ. हजारों वेळ मंडईंत जाऊनही माझ्या स्मरणांत कधीं आला नव्हता! मंडईच्या प्रदक्षिणेंतच त्याचं घर असावं. त्या घराच्या आसमंतांत तीन फर्लांगाच्या परिघांत एकनाथचं दुकान, एकनाथाचं घर, एकनाथचे बांधव, एकनाथचें जातिसर्वस्व पहुडलें होतें. त्यालाही माझ्या घराकडे कधीं यावंसं वाटलं नसावं. कदाचित् तो आमच्यांतील दूरता तितक्याच तीव्रतेनें जाणत असावा.

आज मी त्याचं घर शोधीत होतें.

---

*दुकोरी सोडून धांवणारे सुशिक्षित आणि जुनापुराणा समाजपुरुष यांचा खेळ आजहि चालू आहे—समांतर रेषांसारखा!*

---

"एकनाथ बुरूड कुठें राहातो हो ?"

"कोणता एकनाथ ?" कुतूहलानें पांच सात जणं माझ्या भोंवतीं जमून विचारायला लागलीं. पण मला तरी कोणता एकनाथ हें कुठें माहीत होतं !

"एकनाथ बुरुड माहीत नाहीं ?" उगीचच मी म्हटलं.

"बाई पांच सहा एकनाथ हाएत इथं. कोणता हवा तुमाला ?" एका बुरुडानें विचारलं.

अखेर मी म्हटलं, "तो गेल्या निवडणुकीच्या वेळीं काम करीत होता तो."

"हां. हां. तो परशाचा मुलगा." असं म्हणत दोघं चौघं चौदा पंधरा वर्षांचीं पोरं माझ्याबरोबर एकनाथचं घर दाखवायला आलीं. त्या वस्तींतून कितीकांची रहदारी राजरस्त्यानें चालत होती. मीही त्या रस्त्यानें अनेकवार गेलें होतें; पण घोड्याच्या डोळ्याला झांपड बांधून तो सरळच पहात जातो तशी. त्या वस्तींतलं एकही दृश्य माझ्या मनाला कधीं तीव्रतेनें शिवून गेलं नव्हतं. इतकंच काय पण आज एकनाथचं घर शोधायला निघालें, तेव्हां बुरुडवस्ती कुठें आहे ही चवकशी करीत मला हिंडावं लागलं होतं ! इतकी त्रयस्थपणें मी त्या बुरुडवस्तींतून आजवर गेलें होतें. मला वाटतं, त्या आंवतींभोंवतींच्या बुरुडांच्या घरांतील माणसांतही तितकाच त्रयस्थपणा होता. त्यामुळें आज मी एकनाथची चवकशी करीत निघालें, तेव्हां माझ्याभोंवतीं चालणाऱ्या त्या चार पांच पोरांबरोबर आणखीही केवढा घोळका जमत जमत गेला. त्या सर्वांनाच कुतूहल असावं. "निराळ्या जातीची शिकलेली बाई एकनाथची चवकशी कशासाठीं करते आहे ?" एकनाथच्या घराशीं येईपर्यंत त्या घोळक्यानें मी अगदीं कानकुंडी होऊन गेलें.

आज पहिल्या प्रथम मला त्या घरांकडे पाहणारी नज़र आली होती. आज पहिल्या प्रथमच मला तो सारा कळकांच्या तारांनीं चिंताडलेला रस्ता लक्षांत आला. घरं अपुरीं म्हणून रस्त्यावर बसून काम करीत असलेलीं बायामाणसं नि भुईला डोकीं लागायला आलेलीं म्हातारीं कोतारीं नव्यानेंच आज लक्षांत आलीं. दारिद्र्याच्या क्रूर खेळांत निस्तेज झालेल्या त्या वस्तीकडे पाहून आज माझं मन द्रवलं. माझी मला लाज वाटूं लागली. जगाचं राजकारण, जगाच्या उस्तवाऱ्या, जगांतील काळ्यागोऱ्यांचे उच्चनीचतेचे झगडे—कशाला हें हवेंतलं नि गंधर्वनगरींतलं मी वाचीत नि बोलत असतें ? माझी नजर तर जवळचंही पहात नव्हती कधीं !

एकनाथ घरीं नव्हता. घर उघडंच होतं. मी आंत डोकावलें. कमींत कमी किती जिनसांत माणसांना जगतां येतं ! तें एक खोलीचं घर अगदीं रिकामं होतं. नजरेंत भरत होती ती फक्त चूल. अन्नदाती. बाकी सामान हें फजीत पावल्यासारखं पडलं होतं.

एकनाथ घरांत नाहीं असें आढळल्यावर मी काय करतें इकडे त्या घोळक्याचं लक्ष होतं. माझ्याही अंतरंगीं झगडा सुरू होता. "जावं झालं. नसते उपद्व्याप !" असं एक मन म्हणत होतं. दुसरं तिथें लोभावून पडलं होतं. "एकनाथ येईपर्यंत थांब. बघ तर त्या म्हाताऱ्याकडे. एवढा घोळका नि डोंबकावळ्यासारखी तूं त्यांत परकी घुसून आलेली. पण त्याचं लक्ष आहे का पहा ! पाठीची धनुकली आणखी वांकवून समोरच्या कोयत्यानें तो सपासप तारा कापतो आहे."

मी एकनाथच्या दाराजवळच्या दगडावर थांबलें, "जा तुम्ही बाळांनो आतां. एकनाथ येईपर्यंत मी थांबतें." असं म्हणून मीं मुलांना रजा देण्याचा प्रयत्न केला. त्यांनीं पायांची चाळवाचाळव केली. ज्याच्यावर माझी नजर जाई तो दुसऱ्याच्या मागें पावलें चाळवीत उभा राही नि पुनः पुढें येऊन माझ्याकडे पहात राही माझ्यांत किती तरी बघण्यासारखं होतं ! पांढरं, स्वच्छ, कृत्रिम रेशमाचं पातळ माझ्या नेसूं चमचमत होतं. हातांत सोन्याच्या बांगड्या. बोटांत अंगठी, गळ्यांत सोन्याच्या साखळीचे पदर नि मंगळसूत्र. कानांत कुड्या, डोळ्याला चष्मा, हातांत पर्स, लहानशी छत्री नि हातरुमाल—हो. हें किती तरी बघण्यासारखं होतं त्यांना. आणि त्या लक्तरीं लोंबत असलेल्या गराड्यांत तें सारं मला भाजीत होतं. मी उभी होतें ती तिथेंच बसलें. स्नेहाची कणाकणाची आर्द्रता मिळवण्यासाठीं मी त्या म्हाताऱ्याला म्हटलं, "बाबा, किती तास काम करतां अजून ?" तो अक्षरही बोलला नाहीं. त्याला ऐकूं येत नसावं. घोळक्यांतील एक मुलगा म्हाताऱ्याजवळ गेला नि त्यानें मोठ्यानें म्हटलं, "बाई काय इच्यारत्यात."

म्हाताऱ्यानं वर मान उचलून तिरसटपणानें म्हटलं, "त्यांना म्हणावं मला नका इचारूं. दुसरीकडे इचारा."

मायाळू स्नेहाला त्यानें लाथ झाडली. पण मीही बथ्थडपणें तिथेंच बसलें. एका लहानग्याला मांडीवर घेऊन पाजतां पाजतां एक बुरुडीण चिकाचा पडदा विणीत होती. किती झपाझप. किती सुंदर दिसत होता तो पडदा. पलीकडेच टोपलीच्या बुडांतलं कमळ एक जण कळकीच्या तारांनीं विणीत होती. समोर करंड्यांच्या वहातुकीची भली मोठी करंडी तयार होत होती. आज पहिल्यांदा त्या कलावंतांच्या कलेनें माझं मन खरंखुरं वेधलं. शिवणाच्या सामानाच्या नाजूक साजुक करंड्या, लहान मुलांना ठेवायला प्रवासो-











पेटारे, वेलाच्या कमानी, वेलांचे मंडव, पाळणे, पावसाळ्यांत गरिबांच्या छत्रासाठीं तीं इरलीं, वांसऱ्या, खुर्च्या, कोच, पंखे, करंड्या, सुपं, टोपल्या, किती वस्तूंची आरास समोर, भोंवतीं, निरनिराळ्या घरीं दिसत होती. सगळ्या घरीं कोयते लखलखत होते. कळकाच्या ताग सपासप उंचावत, वांकत होत्या. तरीही यंत्रयुगापुढें निष्प्रभ होऊन गेलेली ती सारी कला माणसांच्या अंगावर लक्तरींच गाळीत होती, माणसांनीं तारुण्यांतही गालफड बसवीत होतीं, तिन्ही ऋतुराजांपुढें नंगपणानें त्यांना नाचवीत होती.

मी खिन्नपणें पहात होतें. विचार करीत होतें. इतक्यांत घाईगर्दीनें एकनाथ आला. "बाहेर बसलां बाई ? आंत या ना." गर्दीगर्दीनें त्यानें घरांतलं एक जुनं पोत माझ्यासाठीं पसरलं. त्याच्या त्या वागण्यानें मी थक्क झालें. पोत्यावर जाऊन बसलें. मुलांचा घोळका पांगून निघून गेला.

"चहा मागवूं ?"

"छेः छेः"

"असं कुठं झालंय बाई. आज माझ्या घराला पाय लागले तुमचे—" असं म्हणत एकनाथ बाहेरही गेला आणि मी मात्र ओशाळून गेलें. क्षणार्धांत एकनाथ पुनः आला. मला काय बोलावं सुचेना. पुनः माझच काम ! नि त्यासाठीं या दरिद्रीनारायणानें माझंच आतिथ्य चालवलं होतं ! कांहीं तरी बोलायचं म्हणून मी म्हटलं, "एकनाथ, तुम्ही नाहीं वाटतं बुरुडकाम करीत ?"

"न करून कसं भागणार ? शिकलों असतों ना बाई, तर कधीं हात लावला नसता कोयत्याला."

"कां हो ?"

"कां हो ? अहो. बघा ना. रात्रंदिवस मरून काय मिळतंय या साऱ्या लोकांना ?"

"पण मग शिकतही नाहींत तुमचे लोक !"

"तेंच तर."

"पण एकनाथ, शिकून पैसा मिळतो असं कुठं आहे ?"

"पण बाई ते वेगळं असतं. आतां आमच्यांत दहापाच शिकलेत. त्यांची सर आम्हांला येणार आहे ?"

"तुमच्यांत शिकलेले लोक आहेत ?"

"मग ?"

"तर मग माझी ओळख करून द्या त्यांच्याशीं."

"आज तर ते हपीसाला गेलेत. पुनः याल ?"

"वाः ! कां नाहीं. जरूर येईन" आतां न कळतां माझ्यांत औदार्य उसळत असल्याचं माझ्या लक्षांत आलं ! "त्यांच्या घरीं बुरुड काम करीत नसतील नाहीं ?" मी विचारलं.

"बाई, बुरुडाचा जन्म म्हणजे कीस बोट नि भर पोट. शिकला तरी घरीं आला कीं बुरुडकामांतच पडायचा तो."

"कीस बोट नि भर पोट? म्हणजे काय? मला नाहीं कळलं." मी एकनाथला विचारलं. इतक्यांत हॉटेलांतून एका पोऱ्यानें चहा आणला. त्या आतिथ्यानें मी शरमून गेलें. एकनाथनें खिसे धुंडले. दोन आणे नव्हते बिचाऱ्याच्या खिशांत. मला कसंसंच झालं. मी चटकन् रुपया काढून म्हटलं, "एकनाथ, तुम्हीं नाहीं पैसे द्यायचे. मी देईन."

"बाई !—"

"नाहीं. मी पुनः येऊं नको का तुमच्याकडे ?"

"बरं बरं. द्या बाई. पण रुपया ?"

"असूं द्या तुमच्याजवळ."

एकनाथनें नाखुषीनेंच रुपया उचलला, चहावाल्याचे पैसे दिले.

"एकनाथ, मला 'कीस बोट नि भर पोट' म्हणजे काय तें नाहीं सांगितलं तुम्ही."

एकनाथ हंसून म्हणाला, "तो शाप आहे शाप. देवानं दिलाय बुरुड जातीला."

"म्हणजे ?"

"तुम्हांला ऐकायची आहे ती गोष्ट ?"

"जरूर."

"चला मग. मला सांगायला सुधरत नाहीं. तो म्हातारा सांगेल."

आम्ही दोघं त्याच म्हाताऱ्याकडे गेलों. त्या म्हाताऱ्यानें एकदां माझ्याकडे नि एकदां एकनाथकडे तिरसटपणें पाहिलं नि तो पुनः अक्षरही न बोलतां काम करायला लागला.

"आमची जात अशी आहे बाई. सात तट बांधून बसलेली असते. त्यांना पाहायला नको. ऐकायला नको. करायला नको. नवं नकोच कांहीं. भुके मरतील. पण जुनं सोडायचे नाहींत."

आम्ही बोलत पुढें गेलों. एकनाथनें दुसऱ्या एका म्हाताऱ्याला विचारलें. तो मोठा रसिक असावा. एकदम रंगांत येऊन तो म्हणाला, "बाई, देवाचा शाप कधीं खोटा होत नाहीं. माझ्या वयाला सत्तर वर्षे झालीं. हें गांव एवढंसं होतं तें एवढं झालं. नवे रस्ते झाले. जुने हौद गेले. नवे नळ आले, मोटारी आल्या, विमानं आलीं. वस्ती वाढली. माणसं बद-

ल्लीं. नवे धंदे आले. पण आम्ही कां हो अशीं ? दांत कोरतो नि पोट भरतो. असं कां अजून ? शापच आहे ना देवाचा."

एकनाथनें म्हाताऱ्याला पुनः गोष्टीची आठवण करून दिली. म्हातारा म्हणाला, "त्याचं असं आहे. एकदां शिवपार्वती बसली होतीं. त्यांनीं पृथ्वीवर माणसं केलीं. पार्वती म्हणाली, या माणसांना धंदे कोणते ? तेव्हां शिवानं अठरा पगड जातींना अठरा धंदे करायला दिले. तियें बुरुड पण आला होता. याला धंदा कोणता ? पार्वतीमाईला सत्यवान्सावित्रीचं व्रत होतं. त्यासाठीं तिला वाणाची सुपली नि कुरकुली हवी होती. तेव्हां शंकर म्हणाले, अव्यंग वनांत बुरुड तपश्चर्या करतो आहे. त्याला हें काम देतों. शंकरांनीं कळकीचं वेट तयार केलं आणि बुरुडाला सुपली नि कुरकुली करायला सांगितलं. झालं बाबा. पार्वतीमाईसाठीं बुरुडानं सुपली नि कुरकुली तयार करून नेली. पार्वतीमाईनीं त्याच्यासाठीं पाट मांडला आणि त्या आंत गेल्या. बुरुडाला पाटावर बसायचा धीर होईना. इतक्यांत एक ब्राह्मण आला नि बुरुडानें आपला पाट ब्राह्मणाला बसायला दिला. ब्राह्मण झट की पट पाटावर बसला. पार्वतीमाई आंत गेल्या. त्यांनीं हिरे-माणकांनीं ताट भरलं नि नोकराला सांगितलं, पाटावर बसलेल्याला नेऊन दे.

नोकर आला नि पाटावरल्या ब्राह्मणाच्या पदरांत त्यानें हिरेमाणकांचं ताट ओतलं. ब्राह्मण निघून गेला. बुरूड आपला उभाच. बराच वेळ उभा राहिला. पार्वती आली. तेव्हां म्हणतो कसा : आईमहाराज, मी फार वेळ उभा आहें. तुमच्यासाठीं मी सुपली नि टोपली आणली. मला कांहीं द्या.

पार्वतीला आश्चर्य वाटलं: अरे मी मघाशीं ताटभर हिरेमाणकं दिलीं ना ?

बुरुड म्हणाला: ती पाटावरल्या ब्राह्मणाच्या पदरांत घातलीं.

पार्वती म्हणाली : तूं चांगलाच कमनशिबी दिसतोस. पाट तुझ्यासाठीं ना मी मांडला. तूं कां नाहीं बसलास ? आतां मी देतें तें घे नि घरीं जाईपर्यंत पाहूं नको काय आहे तें.

पार्वतीनें पदरांत दान घातलं. बुरूड घरीं चालला. पण पदरांत काय आहे हें पाहायला त्याचा जीव तळमळत होता. अखेरीस त्यानें पाहिलंच तो काय ! पदरांत मातीचीं ढेकळं !

तो माघारीं आला आणि शंकराला म्हणाला: देवा ! मला माझ्या कामाबद्दल माती दिली ?

शंकर म्हणाले : तूं फुटक्या कपाळाचा आहेस. पदरीं पडलेल्या हिरे-माणकांची सुद्धां माती होऊन गेली. आतां जन्मभर कीस चोट नि भर पोट. बांबू छिल्त जा आणि पोट भरीत जा.

"बाई देवाचा शाप आहे आम्हांला बुरुडांना. म्हणून अठरापगड जातींला कामाचा दाम मिळतोय आन् आम्ही कष्ट करतों तरी पोटाला मिळत नाहीं."

देवाचा शाप म्हणून दारिद्र्यापुढें साष्टांग नमस्कार घालणाऱ्या त्या मूर्तिमंत असहायतेकडे पाहून मला वाईट वाटलं. त्या शापांतून उद्धार होईल अशी कुणाचीच कल्पना नसावी बिचाऱ्यांची !

म्हातारा गोष्ट सांगत होता. मुलांचा घोळका जमून ऐकत होता. गोष्ट संपली. आठ चार आणे देऊनच मला कृतज्ञता दाखवा‍वी लागणार होती. मी एक अधेली म्हाताऱ्याला दिली. सगळ्या नजरा आपसांत बघूं लागल्या, तेंही माझ्या लक्षांत आलं. माझ्या औदार्यावर मनांतल्या मनांत मी खूष होतें.

"एकनाथ, मला तुमच्या लोकांत महिनाभर हिंडायचं आहे. मला तुम्ही ओळखी करून द्या आणखी. तुमच्यांतल्या शिकलेल्या लोकांच्या"

एकनाथचा उत्साहही शिगेला पोहोंचला होता. "चला. आतांच जाऊं शिवरामकडे."

अंधार पडत चालला होता. मी म्हटलं, "आज आतां मी घरीं जातें. उद्यां येईन पुनः. मी तुम्हांला एक गोष्ट सांगणार आहें. परवां तुमच्या विठोबारखमाईच्या देवळांत गायकांनीं फेर धरला होता. त्या बायका तेंच गाणं नि तोच फेर एका समारंभाच्या वेळेला करून दाखवतील का ? त्यांना सगळ्यांना पैसे मिळतील. आणि मला शिकलेले दोनचार लोक हवेत. त्यांनाही बोलण्याबद्दल पैसे मिळतील. त्यांचा फुकट वेळ घेणार नाहीं."



अनुक्रमणिका

दुसऱ्या दिवशीं रात्रीं साडेदहा वाजतां पुनः घंटी वाजली. आतां कोण? एकनाथ तर नक्की नाहीं. मी दार उघडलं. एकनाथच होता तो!

"काय एकनाथ?"

"बाई, काय सांगावं तुम्हांला. गेला महिना नुसता विंचू डसल्यागत रहात होतों."

"कां? काय झालं?"

"बाई, तुम्ही पहिल्या दिवशीं माझ्याकडे आलां तेव्हांपासून माझ्यावर दांत धरलाय् बघा. त्या दिवशीं तुम्ही गेलां. मग मी आमच्या लोकांना समजावून सांगितलं. तर म्हणतात कसे : आतां त्या बाईला गुरू करा गुरू तुम्ही. फार बघितलेत असे लोक नि बाया. आमच्या जातींत आम्हांला शिकवायला यांची गरज आहे काय? यांना काय कळणार आहे? कांहीं ऐकतील, कांहीं बोलतील. आमच्या जातीचं उणं काढतील. कशाला सांगायचं आपल्या जातीचं या बाईला. शिकलीस तर म्हणावं आपली जात सुधार. आमच्या जातीची पंचाइत नको करूं. बाई, आज महिनाभर झाला. तुम्ही येऊन गेलां कीं हीच चर्चा चालते. ती दहा पांच माणसं माझा जीव पणाला लावून कशीं तरी आणली मी. त्यांनीं काम केलं. पैसे मिळाले त्यांना. पण याची पोटदुखी वाढतीच. बायामाणसांची रीत म्हणे घालवली आम्ही! बायकांना गायला लावलं. अन् रस्त्यावर फेर धरतात तेव्हां? पण पटतच नाहीं. आज जातपंचायत भरून विचार करीत होते सगळे. आम्हां लोकांना जातीबाहेर टाकावं म्हणून? आतां आला का घोर? गेला महिना झोप नाहीं. सुचित नाहीं. अन् आतां हें पाप! काय नशीब करील तें करील."

मला भीतीच वाटली. माझ्या या उपकारकर्त्यांना वाळीत तर पडावं नाहीं ना लागणार?

"पण माझ्याशीं तर ठीक बोलत होते तुमचे लोक." मी म्हटलं.

"तेंच तर. तुमच्या तोंडावर ठीक बोलायचं. माघारीं अरेतुरे करून बोलायचं. 'बाईला आतां गुरु कर' ही काय भाषा झाली? आम्ही दहा पांच जण रोज विस्तवावर बसलों होतों. आतां आज—"

"एकनाथ, माझी कांहीं मदत होईल का तुम्हांला? मी मदत करायला तयार आहें."

"नाहीं बाई. नाहीं. जातीची तात फार अघोरी असते. त्यामुळेंच आम्ही माणसं सरकत नाहीं पुढें. कुणी हात देऊन वर काढील बुडत्याला, तर हात धरणाराचा हात तोडतील, पण जगूं देणार नाहींत. सगळ्यांनीं मरा म्हणतील. यापायीं शिकलेला पण धीर सोडतो नि गुपचिप बसतो.'

"बरं. पण एकनाथ मी काय करूं? सांगा."

"कांही नाहीं. तुम्ही काय करणार? मी मन मोकळं करायला आलों होतों. जातों."

एकनाथ एवढासा चेहरा करून निघून गेला. माझ्या अंतःकरणावर मणाचं ओझं पडलं. माझ्यामुळें केवढा अंतःक्षोभ उठला होता. मला कल्पनाही नव्हती.

धांवत्या जगाचा कानोसा घेऊन जगाच्या चालींत साथ करण्याची उत्कंठा नि हुरहूर लागलेल्या एकनाथाचं नि त्या मूठभर शिक्षितांचं नुसतं कंदन चालवलं होतं पुराणपुरुषानें. मी हतबुद्ध झालें. तसाच कसा हा खेळ? अगदीं समांतर रेषांचा!

चाकोरी सोडून धांवूं पहाणाऱ्या हर एक जातीच्या अंतवेदनांच्या या नि असल्याच समांतर रेषा! माझीही जात एकदां अशीच अंतःक्षोभानें बेभान झाली होती. तीं पाऊणशें वर्षापूर्वींचीं ग्रामण्यं! ते जातिबहिष्कार! तें नि तसलंच पुराणपुरुषाचं आकांडतांडव! त्या खालीं चिरडून उदासवाणे झालेले कितीक नि भळभळत्या अंतःकरणानेंही धांवण्याचीच ईर्ष्या बाळगणारे कांहीं. आणि तिथेंच, त्यांच्याच—एकनाथासारख्याच्याच तिडविडत्या पायांत मला आशा खिदळतांना दिसत होती. मी स्तिमितपणें तिच्याचकडे पहात राहिलें.

• • •





अनुक्रमणिका






# कवि संमेलन

**वसन्त सवनीस**



[वेळ मध्यरात्रीची हरि आपल्या खोलीच्या बंद दारापुढें उभा आहे. त्याची बायको राधा आंत डाराडूर झोपली आहे.]

हरि : उघड दार उघड दार
तिष्ठवूं नकोस फार
[कडी वाजवतो. कांहीं उपयोग होत नाहीं.]

हरि : (मुक्त छंदांत जातो)
दार उघड !
हृदयाचीं दारं माझ्यासाठीं मागेंच उघडलीस
मग घराचीं दारं बंद कां करतेस ?
माझं शरीर आंबलं आहे
दारापुढं थांबलं आहे
पाय इतके थकले, इतके थकले
कीं तेच पायां पडूं लागले !
दार उघड ! !
[पुनः कडी वाजवतो आणि टिपेच्या आवाजांत—]
तूं दार उघडणार नाहींस कां ?
नसलीस तर तसं सांग
बंद दाराचा छंद मी सोडून देईन...
[आंतल्या बाजूनं पावलांचा दणदण आवाज येतो आणि त्या मागोमाग शब्द येतात—]

राधा : झोप माझी मोडण्याला, कोण मेला ये भिकारी
जा निघोनी चालता हो, ये सकाळीं वा दुपारीं

हरि : नसे भिकारी उघड दार मी आलों परतुन घरीं
दो खोल्यांच्या गोकुळांतला राधे, मी तव हरी

राधा : [दणकन् दार उघडते]
इश्श ! तुम्ही कां ? धडपडला हो इनक्या रात्रीं कुठें
त्रिसरलांत ना आणायाला सांगितले पावटे ?
शरम कशी ती जिवास नाहीं; घरीं बायको झुरे
गांवामधुनी फिरतांना हो शुद्ध कशी ती नुरे !

हरि : ऐक राधे, ऐक मीझें...

राधा : ऐकणार ना एक शब्द मी—मीच सांगतें ऐका
असाल विटला संसारा जर खुशाल मजला टाका !

हरि : नको रागवूं राधे ऐशी हरी याचना करी

राधा : सांगा ना मग कोण भेटली कुठली ती सुंदरी ?

हरि : खरें सांगु कां राधे होतें संमेलन मोठें
कवींचें संमेलन मोठें

राधा : फसवुं नका हां उगाच कांहीं सांगुन मज खोटें

हरि : शपथ सखे माडीची
शपथ तुझ्या साडीची
शपथ सखे कंठाची
दाढीच्या खुंटांची

राधा : असाल गेला जर तेथें तर सांगा हो मजला
कसल्या कुठल्या वृंद कवींचा तेथें हो जमला

हरि : चित्त सावधान असावें । कान उघडे ठेवावे.
सांगतों तें तें परिसावें । आर्यें त्वां ॥
काय सांगूं तो आगळा । असा काव्याचा सोहळा
पाहतां निमावा डोळा । रसिकांचा ॥

थोर कवींनीं ठेचुन भरलें व्यासपीठ ग भलें
सरस्वतीनें काव्यरसाचें गुन्हाळ जणुं घातलें
उंच उसापरि कोणी, तुटके, जाड, हडकुळे कोणी
हंसरे, रडवे, चिंतातुर अन् होते कडवे कोणी
टक्कलवाले, बक्कलवाले
धोतरवाले, विजारवाले
मिशाळ थोडे, विशाळ थोडे
कॅस मुलायम आणि कुणाचे मानेवर रुळती
सखी, कुणाचे चष्म्यामधुनी लोचन भिरभिरती
पायघोळ ग झब्बे घालुन कुणी पान खाती
भ्यालेले कुणि मागें बसुनी नखें चावतातीं !
सुरुवातीला कवि होते पण नव्हते सखि, श्रोते
हळुहळू मग जमले थोडे—तेही पेंगुळते !

राधा : कोण म्हणाले कुठल्या कविता सांगा ना नाथा

हरि : उतावीळ गे नकोस होऊं सर्व सांगतो गाथा
पहिला कवि उंचेला, स्वर त्याचा पिचका गे
धरुनि ताल हातानें, सलये तो वदला गे
[पिचक्या आवाजांत गाऊं लागतो]












"जेव्हां मी तुज पाहतों मज दिसे साकारलें स्वप्न तें
जाशी तूं निघुनी पुढें मन खुळें मागें तुझ्या रांगतें
नेत्रांचें परि होत मीलन जधीं रोमांच येती शिरीं
आहे प्रश्न मनांत एक दडला—'येशील माझ्या घरीं ?'"

दुसरा कवि मग पुढती आला सरसावुन बाड
म्हणूं लागला ज्वलंत कविता 'क्रांतीचें झाड'
म्हणतां म्हणतां धरली त्यानें 'माइक' ची मुंडी
शिरा गळ्याच्या फुगल्या, तुडली शर्टाची गुंडी !
दचकुन श्रोते त्या धसक्यानें तीन फूट हटले
थटले मागे भिंतीला मग बिलगुन ते बसले !

राधा : अगबाई ! मग...

हरि : सुटला माइक, सुटले श्रोते तिसरा ये पुढती
चघळित आला पान लागला घोळाया पंक्ती—

"करा सौंदर्याची स्तुति
सांगा खुशाल वारसा
अशी होती तशी होती
तिलोत्तमा मदालसा"

मदालसेच्या सौंदर्याची पर्वा पण कोणा
झोंपेनें परि झुकल्या होत्या श्रोत्यांच्या माना
मीहि विसरलों ओळी त्याच्या—फक्त एक स्मरतें
दिसलें होतें दिव्यामुळें तें टक्कल चकचकतें !
चौथा होता कवी तयाची कंपयुक्त वाणी
काव्य पाजिलें त्यानें मिसळुन तानांचें पाणी

"हळु सोल सोल सोल ग
संत्र्याचि साल बहुमोल ॥
हात तुझा नाजूक लालसा
स्वभाव आणिक तसा गोडसा
डौल तुझा त्रिनमोल ग ॥"



आखडलेला श्रोता

स्वरांत त्याच्या कंप असा कीं श्रोतेही कांपले
थरथरले ग कान तयांचे—कंपगीत सरलें

नंतर आला कवि त्याचा स्वर दणदणीत मोठा
दरडावुन तो फिरवुं लागला शब्दांचा सोटा
दचकुन उठले सारे श्रोते सांवरून बसले
ऐकुं लागले शब्द तयाचे—परी न जे कळले !
"मुळ्यांच्या हातांनीं मी पाताळ पकडलें आहे
पानांच्या बोटांनीं मी आकाश झेललें आहे
आकाश-पाताळाचा व्यास मी जाणला आहे...
गणिती प्रज्ञेच्या कंपासानें
मी तो मोजला आहे...
पण मी पाताळाचा तळ काढणार आहे...
—तुझ्या पातळाचा रंग कां बदलला ?...
तो त्रिकाळ सांधा मी धुंडणार आहे...
उचकटून पाहणार आहे...
प्लेटो सॉक्रेटिसला तो सांपडला नाहीं...
कान्ट–नित्शेनें तो पाहिला नाहीं...
पण मी आकाश–पाताळाचा सांधा शोधणार आहे
वांधा आहे तो तुझ्या येण्याचा !"



कांपरें भरलेला श्रोता

नंतर कवि जो आला त्यानें चमत्कार केले
नाकांतुन गे शब्द तयानें काढुन दाखविले

"आंज सखि पौर्णिमेंत अवनीं हीं न्हाली
हरित तृणें, मुदित तणें धवलरूप ल्यालीं
आंज तुझ्यां लोचनांत पूर्ण चंद्र डोलें
आंज सखीं क्षण सारें अमृतमय झालें—"

एक कवि आखुडसा मग आला पुढती गे
आणि म्हणाला—

"आखुड तूं ! आखुड आखुड आखुड तूं !
आखुड खांदा
आखुड बांधा
आखुड हंसणें
आखुड बसणें
शब्द तुझा आखुड ये
चाल तुझी आखुड गे
अशी आखु—
आखुडाच तू आखुडलेली !"

आखडलेले श्रोते सखये सैल पुरा झाले
अन् झोंपेशीं झुंज घ्यावया सिद्ध पुन्हा झाले
झिंग लोपतां झोंपेची गे हुशारींत आले
आणिक पुढच्या कविचें त्यांनीं स्वागत बहु केलें



अनुक्रमणिका



युगायुगाची झोंप।

"मला म्हणालीस
तूं येऊं नकोस
इतकी कां तुला भिती वाटली ?
पण तुला आठवत नसेल–
तुझ्या अंजिरी रंगाच्या भर्जरी पदरावर
माझ्या श्वासाचा भक्कम ठसा आहे...
तुझ्या विल्वराच्या कंगोऱ्यांत
माझ्या स्पर्शाची स्मृति लपली आहे
त्या दबलेल्या गवताला
तुझ्या केसांचा वास आहे
सदाफुलीच्या फुलांना
तुझ्या श्वासाचा ध्यास आहे...
धडधडीत मग एका कविनें सूर सखे धरला
कंठ तयाचा आला दाटुन डोळाही भरला
"बघुं नको सखे अशि भरल्या डोळयांनीं
उभि नको राहुं अशि दारांत येवोनी
पाहिजेच गेलें मला दुसऱ्या प्रांतांत
बदलिचा आहे ना हा हुकूम हातांत"
नंतरचा एक कवी पसरित ये हात पुढें
लागे अन् ओताया काव्याचे शब्द-घडे
"पहाटल्या...
पहाटल्या क्षितिजावर
किलकिलत्या किरणांनीं
तेजाच्या तंतूंनीं
स्वप्न निळें विणलेलें
आस्मानाचें रेशिम धूसर
लुसलुशीत तें
भुरभुरलें गे
तृणांकुरांवर, कणाकणांवर ......
स्वप्न असें कीं—
झोंप उडावी युगायुगांची
पहाटल्या क्षितिजावर
पहाटल्या क्षितिजावर......"

लोचन परि जड होते, उघडले न कष्टानें
पुढचें नच कळलें गे गिळलें मज झोंपेनें !

तीन चार कवि कवयित्रीही गाउन गेल्या कविता
युगायुगांची झोंप लागली खांबाला टेकतां !
जागा झालों सखये जेव्हां विपरित मजला दिसे
एक कवी गे पायापाशीं दुजा जाहला ठसे !
स्वप्न असें कां ? म्हणुनि पाहिलें चोळुन डोळे नीट
श्रोते होते गात काव्य गे बनूनिया धीट !
होते कविना धरून टेविले श्रोत्यांच्या जागीं
ऐकत होते हताश होउन टाकुनिया नांगी !
व्यासपिठावर बनेल श्रोता वजावीत कर्णिना
कशी लागते पहा एकदां कविता कानांना
मारित होते श्रोते ताना
करुन वाकड्या तिरक्या माना,
सखे, अनन्वित अशा यातना
बघवेना मजला। सखे ग
सहवेना मजला ॥
म्हणून आलों निघुनी तेथुन—तुझ्यापुढें मी उभा
काव्यरसांतच असेल बुडली उरली सुरली सभा !



• • •

### कै. वोवडे यांची अप्रकाशित स्फुटरचना

नको बाहेरची शुद्धी आपुले शुद्ध आपण
जसें तीर्थ, जसा अग्नी, शुद्ध तसेंच साबण !

♤ ♤ ♤

लंकापुरींत सोन्याच्या उदंड मिळती विटा
काळेंच करुनी तोंड दैव धाडीत मर्कटा !

♤ ♤ ♤

सदा कैदाशिणीलाही हवा गोविंदसा पती
धटिंगणासही वाटे मिळावी जानकी-सती !

♤ ♤ ♤

अत्तरदाणींत अत्तर गुलाबदाणींत गुलाबपाणी ही॰
माझ्या मच्छरदाणींत निद्रानिंचा मज प्रवेशही नाहीं !

♤ ♤ ♤





## —शरणं गच्छामि !



सदाशिव आठवले

कारकुनाचें जीवन माझें
नाहीं किंमत, नाहीं हिंमत
क्षुद्र वायको, तिच्यापुढेंही
नाहीं चालत, नाहीं बोलत !
आज सकाळीं चहा पितांना
कलत्र मजला म्हणे ओरडुन—
"येइन म्हणते दंडिया नवा
काढा सोळा रुपये मोजुन"
"सोळा रुपये कुठले आणूं ?"
"आणा उसने किंवा चोरुन
फुटकी कवडी खिशांत नसतां
कशास बसलां लग्न करून ?"
—ही तर होती नुसती नांदी
नाटक नंतर उभें राहिलें !
दणाणलें घर, फुटलीं भांडीं
(कशास वर्णूं सगळे चाळे ?)
आणि शेवटीं काय व्हायचें ?
झालें माझें तोंड आगळें !
म्हटलें, 'दप्ततों संध्याकाळीं'
—कुटुंब थोडें शांत जाहलें !



वेळ मारली खरी, परंतु—
परंतु करतो काय कपाळ
फेऱ्या घालित केंम पिंजले
आली चक्कर दिसला काळ !

●

अर्ध उपाशी चिंतातुर मी
दुचाकीवरी टांग मारली
दूर कचेरी, ऊनहि वरती
तापत गेलों धाप लागली
जाऊन बसलों खुर्चीमध्यें
किचकट कागद पुढें ओढले
—तोंच बोलवी 'बॉस'कशाला
निमूट गेलों, 'यस् सर' केलें !
अजागळासम उभा राहिलों
साहेबाचा पट्टा सुटला—
"कामें करतां हजामती वा ?
अमका पेपर कसा हरवला ?"
हरवलाच मी नव्हता जर तो
काय द्यायचें उत्तर त्याला ?
सरळ आपुला खरें बोललों
"मिस् कुंट्यांनीं काल हरवला!"
बोलुन चुकलों, ध्यानीं आलें
कंबख्ती तर भरली साची.
मिस् कुंटे ही काय समजतां—
आतेमेहुणि साहेबाची !
"शुद्धीवरती अहांत का हो ?"
साहेबांनीं निनाद केला
कसेंबसें मी दचकुन म्हटलें—
"आयॅम सॉरी, मीच हरवला !"
वेंचक नंतर शिव्या ऐकल्या
रस्टिकेटची तशीच धमकी
'गेटाउट' होतांच निसटलों—
खजिल मनानें धरली खुर्ची !

●

नव्हतें डोकें ठिकाणावरी
अंगामध्यें नव्हतें त्राण
मारित होतों तरी पायटे
डावी बाजू नीट धरून
तोंच समोरून एक मवाली
दुचाकीवरी ये भरवेगें
क्षणार्धांमध्यें टक्कर झाली
कोसळलों हो ऽ– खालीं दोघे !
हात उगारून म्हणे मल्ल तो
"साल्या, डोळे फुटले का रे ?"
कण्हत कुथत मी त्यास म्हणालों,
"तुझीच बाजू चुकली आहे !"
"बोल कुणाची चुकली बाजू ?"
ठोसा देउन पुसे धटिंगण



"तुझि नव्हे रे, माझिच बाबा !"
म्हटलें सत्वर हातहि जोडुन !

●

रस्त्याच्या मग जरा बाजुला
मोठ्या पिंपळवृक्षाखालीं
विश्रांतीस्तव जरा बैसलों
मेंदूमधलीं चक्रें फिरलीं...
उजेड पडला, बुद्ध जहालों
नवधर्माची त्रयीहि दिसली
कारकुनाच्या लिहिलीं भाळीं
मुखांतून ती हळुच फुटली :

*— कलत्रं शरणं गच्छामि !*
*— वरिष्ठं शरणं गच्छामि !*
*— बलिष्ठं शरणं गच्छामि !*

अनुक्रमणिका


तुमचा स्टोव्ह
कितपत चांगला आहे ?


गोल्ड
मोहर
स्टोव्ह

# आशा



ग. दि. माडगूळकर

एक निघाली होती सर्कस
या गांवाहुन त्या गांवाला
चालंत हाते हत्ती घोडे
अन् गाड्यांचा एक काफिला
बंद गाडिवर बंद पिंजरा
आंत कोंडल्या वाघवाघिणी
ओढुन नेतां ममूर्त मृत्यू
बैल चालती खिस्तावाणी !
मंद चालले हुंगित मानी
शेळ्या, मेंढ्या आणिक बोकड
घोड्यावरती बसुन निघालें
लाल मुखाचें चौकस माकड
चौचाकांतुन चालू होता
खेळाडूंचा प्रवास रोचक
सुनक्यासम अन् त्यांतच होता
टोपीवांचुन स्तब्ध विदूषक !



सांज उतरली निळी तांबडी
लाल पश्चिमा, लाल उगवती
आकाशाच्या पार्श्वपटावर
चालत होत्या कृष्ण आकृती
पूल लंघुनी पुढती गेली
जाणाऱ्यांची रांग निमुळती
पुलाजवळ ये रखडत रखडत
एक वांकला गाढव अंतीं !

असह्य होतें पृष्ठीं ओझें
निजभाराच्या दुप्पट तिप्पट
कठड्यालागीं टेंकुनिया तो
विश्रामास्तव करितो खटपट
जवळ नदीच्या तीरावरती
रस हरळीचा पिउनी हिरवा
हिंडत होता ग्रामिण गर्दभ
सांजसमीरींचा घेत गारवा
सजातियाची त्रेधा बघुनी
हांक देइ तो गर्दभ त्यातें–
"कुठें चालला पुढें पाहुणे
अमूप ओला चारा येथें !
–द्या फेंकुन तें नदींत अलगद
पाठीवरलें अवघड ओझें
या खिंकाळूं, खाऊं, लोळूं
सौख्य लुटूं या—ऐका माझें !"
जरा वांकला ओझेंवाला
दिलें न कांहीं त्यानें उत्तर
फुर्रर बोलली मात्र नासिका
पाय चालले पुढेंच तुरतुर !
चौपायांवर धांवत आला
ग्रामिण गर्दभ त्याच्या पाठीं
पूल संपला होता तेथें
पडे तयांची गांठ शेवटीं
"काय धांवतां राव अकारण ?
दूर पोंचले सहप्रवासी
कशास आतां दास्य तयांचें ?
या ओझ्याची ऐशी तैशी !"
कष्टानें मुख वळवुन थोडें
स्वरांत दुर्लभ भरून गोडवा
ओझेंवाला गाढव सांगे
ज्ञान थोडकें मुक्त गाढवा

"मित्रा, मजही दास्य नावडे
तरिहि राबतो असा निरंतर
आज सोसतो दुःखभार हा
नजर ठेवुनी 'रम्य उद्यां' वर !"
"उद्यां कांहिं का घडेल अघटित
भारवाहि या हीन जीवनीं ?
असेंच तुम्हां रोज रखडणें
कुठुन सुखाचें चारापाणी ! "
—सजातियाच्या या प्रश्नावर
नागर खर तो किंचित् हंसला
जरा हालला, जरा टेंकला
मउ सादांतच वदूं लागला :
"अर्धे तपाचा काळ लोटला
करितो आहे अशी चाकरी
धरिली आहे आशा कांहीं
तिच्या पूर्तिचा ध्यास अंतरीं
खेळ खेळती जधीं खिलाडी
उभा ठेविती मला तळाशीं
तारेवरली कसरत करते
सुरत सांवळी एक षोडशी !
वर्षे गेलीं, तरी न गेलें
तिच्या वयांतिल उभार आर्जव
दुरुन भासते माझ्या नयनां
तिच्या तनूचें मादक मार्दव
उंच टोपिचा टेंगू माणुस
विदुषक त्याला म्हणती प्रेक्षक
माझ्यापुरता तो पण आहे
आकांक्षांचा माझ्या रक्षक
तारेवर ती फिरे सुंदरी
विदूषकाच्या शेजारीं मी
रोज रात्रिंग मित्र विदूषक
वचन बोलतो मोठें नामी !
"तारेवरुनी थेट पुढें जा
घसरलीस तर तुजसी मारिन
गाढ्यासंगें लग्न तुझें मग
गाढ्यावरुनी वरात काढिन !"
त्या वचनाचा धरुन भरंवसा
कष्ट सोसतो आहे अजुनी
कधींतरी ती पडेल घसरुन
तारेवरली सुंदर रमणी !
सर्कशींत या माझ्यावांचुन
येउं न देतो गाढव दुसरा !
कधींतरी या जन्मामाजीं
उगवेलच कीं दिनकर हंसरा !"

अनुक्रमणिका







### पुरुरवा आणि उर्वशी

दुजीस आसरा दिला असून एक ती घरीं
स्वार्थ तो ठरे जरीहि प्रीत एकलीवरी
मुठी मुठी भरोनिया जगांत प्रेम वाटणें
विश्वबंधुवृत्तिनें असे कुटुंब थाटणें
सोसवे न प्रीतिलागि ही अशी कुचंबणा
व्याज देउनीहि या ऋणांत फेड होइना.
एक फूल कोविंचे नि एक कोवळी कळी
प्रीति माळ गुंफण्या फुलेच वेगवेगळी
एक सावलीपरी ति एक भावलीपरी
टंकलेखकापरी सदाच जी बरोबरी
लघुकलेंत निपुणताहि चालवीत अंगुली
एक लेकरांतली नि एक हो करांतली
स्वैर बुद्धिवादिनीच पंडिता अखंडिता
प्रीत नांदली बुकांत येत ग्रंथबद्धता
रात रात जागतोहि सोडवीत बौद्धिकें
मुके कधींहि होइना सवंग प्रेम बोलके
पुरुरवा नि उर्वशी—करार हाय भंगला
पान पान फाडिले अखेर ग्रंथ संपला.

—राजा वढे

### दोन आठवणी

उत्तीर्ण परीक्षा झालों ज्यावेळीं मी
तेधवां किती आनंद मैनासी झाला !
परि उणीव वाटे त्यांतहि मजला भारी
नाहींत कराया कौतुक वडिल घरांत !
आजही माझिया द्वितिय विवाहविधीचा
दिन मंगल आला घेउन चषक सुधेचा
स्मृति प्रथम पत्निची होउनि जागी तोंच
वाटलें असाया आज हवी ती होती !

### सज्जन डोकें

—जें डोकें डोकें म्हणुनी म्हणितात तें
दिधलेंस जरी तूं मजला तरिही कधीं
उपयोग प्रसंगीं त्याचा नच जीवनीं
—सज्जनापरी तें परहितरत नेहमीं !

### शिक्षक

—छडी हातांत वेताची
गाइडें चार पाठिशीं
इदं शस्त्रं इदं शास्त्रं
शापादपि शरादपि !
—मधु तिष्ठति जिव्हाग्रे
हृदये तु हलाहलम्
मनोविज्ञान तें ओठीं
परि काठिन्य अंतरीं

—पंडित सप्रे

### चहापुराण

चहावांचुनी चैन जीवा पडेना
चहावांचुनी चित्त कोठें जडेना
चहावांचुनी चित्त व्याकूळ झालें
चहानें कसें वेड हें लावियेलें !
चहा पिणें संतत चालवावें
विडी पितां त्यां वय घालवावें
दारू पितांना सहसा न भ्यावें
वेश्येमुखीं मंगल बोलवावें !

—कै. ज. के. उपाध्ये

### काव्यगायन : शोककथा



"आई म्हणोनि कोणी
आईस हांक मारी—"
—बंडू सुरांत गाई
तें काव्य शोककारी !
—येतांच हांक कानीं
चुलखंड फुंकणारी
तापून माय उठली
—झोंबे रडें जिव्हारीं !
—उचलून फुंकणी अन्
आईच त्यास मारी !



"मधु मागसि माझ्या सख्या परी
मधुघटचि रिकामे पडति घरीं !"
—ऐकुन कविचें शोकगीत हें
मधुलोलुप ते भ्रमर पळाले !
परंतु आलें चौखुर उधळत
कुंभारासह गाढव एक
गोळा करण्या कविराजांच्या
काव्यमधूचे घटचि रिकामे !

### पोरसवदा होतास



पोरसवदा होतास
कालपरवां पावेतों;
होता पायांनही अळा
कालपरवां पावेतों.
आज पचळलें पोट
... गलथान टरबूज
झुले कुडींतून खाली
नाहीं शुद्ध...नाहीं बूज
पोरसवदा होतास
कालपरवां पावेतों;
थांव उद्यांचे शेटजी
हात पायांतें लावितों

—शां. शं. रेगे

### नवकविता

जानन्तु ते, जानन्तु ते
नैष यत्नस्तान् प्रति !
काल करुनी बाळ त्या
देईन चेंडू पृथ्वीचा
अर्थ जो लावील त्याची
'माय—वा'चा मूळ तें !

—किन्नर

### चुकीचें मत !

कचेरींत माझ्या—
असे जी हाशी 'सहकारी'
—'मेरी' नांव तिचें
पोरगी स्नेहशील भारी।
महिना सरतांना—
रिकामें माझें 'पाकीट' !
तारांबळ होतां—
पुरविते ती मज सिगरेट !
—धूम्रपान करणें—
—स्त्रियांनीं पसंत मज नव्हतें
अनुभव पण शिकवी—
चुकीचें मत माझें होतें !

—शान्ताराम आठवले









अनुक्रमणिका

# डॉज ट्रक चालविणें फारच फायदेशीर पडतें असेंच अनुभवी चालविणारे म्हणतात



डॉज ट्रक अगदीं थोड्या खर्चात अतिशय जलद वेगानें आपल्या इच्छित स्थळीं पोंचतात. त्यांचा मजबूतपणा आणि त्यांची उत्कृष्ट यांत्रिक रचना यामुळें कमींत कमी खर्चांत ते जास्तींत जास्त कामगिरी बजावितात. अत्यंत जलद गति आणि वळविण्याची सुलभता यामुळें वेळेची बचत होते. या सर्वांचा परिणाम म्हणजे अधिक फेरे, मालाची अधिक वाहतुक आणि भरपूर फायदा.



पेट्रोल आणि
डिझेल दोन्हींवर चालणारे
मिळतात.

## डॉज
ट्रक्स्

प्रगतिशील कारखानदार :—
**दी प्रीमियर ऑटोमोबाइल्स लिमिटेड**
आग्रा रोड, कुर्ला, मुंबई नं. ३७.


उंट छाप सिन्नर बिडी
बस्तीराम नारायणदास महेश्री
मु. सिन्नर, जिल्हा नाशिक
D.D.NERDY
TOM & BAY (POONA)

# देश मराठी लोक मराठी मराठीच भाषा.

• प्रा. मं. वि. राजाध्यक्ष • व्यंकटेश माडगूळकर • प्रा. अनंत काणेकर
• वसंत सवनीस • रणजित देसाई • बाळ मेढेकर • शां. शं. रेगे
• बाळ सामंत • बा. दा. पडवळ • प्रा. शांताराम जोग

---

'मराठा' हा शब्द आज संकुचित अर्थानें वापरला जातो. जातिवाचक म्हणून ओळखला जातो. वास्तविक मराठी भाषा बोलतो तो मराठा. या मराठ्याला इतिहास आहे. खऱ्या आणि चांगल्या बंडखोरीचा इतिहास आहे. परकीय सत्तेची गुलामगिरी, अनिष्ट सामाजिक रूढींची गुलामगिरी, बहुजनसमाजापासून दूर गेलेल्या पढिक भाषेची गुलामगिरी–कसलीच गुलामगिरी त्याच्या मानी स्वभावाला सोसत नाहीं. एरवीं शांत असलेला हा मराठा गुलामगिरीचा काच असह्य होतांच तापून उठतो. त्याच्या निश्चयाला सह्याद्रीचा कणा आहे आणि त्याच्या मनगटांत वज्राची शक्ति आहे. आजवर ज्या ज्या गुलामगिरीविरुद्ध त्यानें बंड केलें आहे, त्या त्या प्रत्येक बंडांत तो यशस्वी झाला आहे. भारतीय इतिहासावर त्यानें आपली स्वतंत्र मुद्रा ठोकली आहे; आपली स्वतःची परंपरा निर्माण केली आहे.

आज हा मराठा एकत्र येत आहे. राजकीय दृष्ट्या शेकडों वर्षें त्रिभंगलेला मराठा फिरून एकत्र येत आहे, पण पराभूत मनःस्थितींत एकत्र येत आहे. पानिपतच्या पराभवापेक्षांहि जबरदस्त आघात सहन करीत तो पुनः एकत्र येत आहे. ही जखम, हा मानभंग सोसून त्याला आपल्या आशाआकांक्षा पूर्ण करीयच्या आहेत. इतिहास त्याच्या पाठीशीं आहे; पण त्याकडे त्यानें डोळसपणें पाहिलें पहिजे. त्याचा भविष्यकाळ उज्ज्वल आहे; पण त्या मार्गावरलीं त्याचीं पावलें एकसाथ आणि एकदिलानें पडलीं पाहिजेत.

स्वतःच्या बुद्धिमत्तेवर आणि कर्तृत्वावर विश्वास असलेला माणूस अपयश आलें कीं, प्रथम स्वतःच्या अंतरंगाचा शोध घेतो, आपल्या गुणदोषांची चिकित्सा करतो. नर्मदेपासून तुगभद्रेपर्यंत पसरलेला हा मराठा एकच भाषा बोलतो; पण तिला अनेक पदर, अनेक लकबी आहेत. त्याची संस्कृति एकच आहे; पण तिला वेगवेगळ्या छटा आहेत, जाति-प्रदेशानुसार चालीरीतींमध्यें वेगळेपणा आहे. मराठा एकच. पण खानेसुमारींत जाती-पोटजातींची संख्या अडीचशेंच्या घरांत गेली आहे. प्रत्येक जाती-पोटजातीचे स्वतःचे असे गुण आहेत, तसे अवगुणहि आहेत; अभिमानस्थानें आहेत आणि दुरभिमानस्थानेंहि आहेत; आशाआकांक्षा आहेत आणि हेवेदावेहि आहेत! या विभिन्नतेंतूनच, या विभक्तपणांतूनच मराठ्याची संस्कृति निर्माण झाली आहे, तिला अखंडत्व आलें आहे. गतवर्षी प्रसिद्ध झालेल्या 'महाराष्ट्र देश सुंदरा' या लेखमालेनें प्रादेशिक दृष्टिकोणांतून या मराठ्याकडे पाहिलें; या वर्षी जातीय दृष्टिकोणांतून या मराठ्याचें दर्शन घडवावयाचें आहे.

एक गोष्ट मात्र मुद्दाम स्पष्ट करायला हवी. प्रस्तुत लेखमाला जातीं-संबंधींची आहे; पण तिचें स्वरूप रूढार्थानें 'जातीय' नाहीं. इथें स्वजातीसंबंधीं संकुचित अभिनिवेश नाहीं किंवा परजातीविषयीं तुच्छताबुद्धि नाहीं. श्रेष्ठ-कनिष्ठतेचा दृष्टिकोण तर मुळींच नाहीं. एकाच मराठ्याचीं हीं विविध रूपें आहेत; आणि या विविध रूपांतून त्याच्या मूळ प्रकृतीचा बोध व्हावा हा उद्देश आहे. गुणदोषदिग्दर्शनांत इच्छा नसतांहि क्वचित् एकादा बोचक शब्द गेला असल्यास वाचकांकडे क्षमायाचना करतो. Truth wounds to cure! जाति-पोटजातींचा पसारा अनावर. सर्वांचा परामर्श घेणें सर्वस्वीं अशक्य. पण कांहीं महत्त्वाच्या जातींसंबंधींहि लिहावयाचें राहून गेलें; त्याबद्दल पुनः क्षमेचीच याचना!

• • •




—मं. वि. राजाध्यक्ष

'गौड सारस्वत ब्राह्मण' या भारदस्त नांवाऐवजीं (अथवा 'सारस्वत' या त्याच्या गौडस संक्षेपाऐवजी) सुटसुटीतपणें शेणवी म्हटलेलें त्या जातीला सहसा आवडत नाहीं. त्यांत कसला तरी हलकेपणाचा वास येतो. पण शब्द तर प्रचारांतला आहे. मग व्युत्पत्तिशास्त्र कशाला? तेव्हां शहाण्णवी (९६ गांवांचे अधिकारी) 'शहा-नवीस,' 'सेनापति', शेणा म्हणजे बुद्धि यावरून 'बुद्धिजीवि' (म्हणजे पंतोजी) श्रेणयः (म्हणजे व्यापारी) असल्या विद्वान कसरती करून शेणवी शब्दाला प्रतिष्ठा आणण्याचे प्रयत्न केले गेले आहेत. गोव्यांत शणै अथवा शेणइ आदरार्थीच वापरतात.

रामभाऊ गुंजीकरांच्या 'सरस्वती मंडल' (१८८४) पासून सारस्वतांचा इतिहास शोधण्याचे अनेक प्रयत्न झाले आहेत. पंजाबांतील सरस्वती या (लुप्त) नदीपासचा कुरुक्षेत्र प्रदेश हें त्याचें मूलस्थान. सरस्वतीचा उगम गौरीशंकराला भिडवून जातीच्या उगमालाहि उत्तुंगपणाचा स्पर्श दिला गेला आहे. सत्ययुगांत म्हणे सर्व ब्राह्मण ऋषींना सारस्वत म्हणत. असो. एकदां बारावर्षांचा दुष्काळ पडला. दक्षिणेंतल्या दुर्गादेवीच्या दुष्काळासारखा. वेदाध्ययन करणारे हे ब्राह्मण प्रायः नष्ट झाले. तेव्हां जेहेत्ते कोण्या सारस्वत नामें ऋषीनें (आपद्धर्म जाणोन) मत्स्यभक्षण करून वेदरक्षण केलें. असे माशांनीं वेद तारले. पुढें दुष्काळ संपला, पण मासे संपले नाहींत. त्या पुरोगामी ऋषीच्या वंशजांनीं मत्स्याहारानें धार आलेल्या बुद्धीनें वेदांचा कीस पाडण्याचें व्रत निर्धारानें पाळलें. हे खास सारस्वत. पुढें ते परशुरामकाळीं विंध्याद्रि ओलांडून दक्षिणेकडे आले. खुद्द परशुराम हा सारस्वत, असा दावा आहे. असो (बिचारा)! त्यानें समुद्र हटवून कोंकणपट्टी आंखून घेतली आणि तन्निमित्तें दिग्विजय यज्ञ केला. त्यासाठीं गौडदेशांतूनहि त्रिहोत्र सारस्वतांची आयात केली. सागरांतील मत्स्यविशेष नदींतील बांधवांपेक्षां अधिक रुचकर हें या सारस्वतांस उमगतांच ते कोंकणस्थ झाले. विशेषतः गोमंतकांत त्यांनीं ठाण मांडलें. कांहीं शतकांनीं फिरंगी आणि म्लेंछ यांच्या बळजोरीला वैतागून त्यांची थोडी पांगापांग झाली; पण शक्य तों समुद्रकिनारा धरून राहिले. अशी सागरनिष्ठा!

सारस्वतांची बहुतेक धर्मपीठें अर्थात् याच भागांत आहेत. स्मार्तांचीं कवळें आणि चित्रापूर येथें, व वैष्णवांचीं गोकर्ण व काशी येथें. या मठांचें माहात्म्य कालमानानें ओसरलें असलें, तरी त्याबाबतची श्रद्धा अत्याधुनिक बहिरंगाच्या घुंद्यांतूनहि घट्ट मूळ धरून राहिल्याचें अनेकदां आढळतें. पण विशेष प्रसंगींचे पूजा—नैवेद्य—तीर्थादि संस्कार सोडल्यास, नेहमींच्या गृहस्थाश्रमी व्यवहारांत असल्या मठांचा कांहीं जाच नसतो. दक्षिण कोंकणांत ब्राह्मण म्हणजे सारस्वत; चित्पावनादींना तेथें भट म्हणतात. असा नवखा 'भट' तेथील ब्राह्मणाच्या खाणावळींत गाफीलपणें जेवावयास बसल्यावर आमटीच्या वाटींत हात घालतांच त्याच्या अंगावर कसा काटा उभा राहतो याचें रसभरीत वर्णन शेंकडो वेळां होतें. १८७२ सालीं पंडितसभेनें सारस्वत




हे षट्कर्मांचे अधिकारी, म्हणजे संपूर्ण ब्राह्मण, असल्याचा निर्णय दिला होता; पण व्यवहारांत —विशेषतः पेशवाई पराक्रमामुळें—ते जरा घरंगळलेच. एकूण दक्षिणेंत आहारधर्माचा बडेजाव अधिकच! कश्मीर–बंगाल्यांत खाण्यावर ब्राह्मण्य नाहीं; येथेंच हे रसनेचे विधिनिषेध! म्हणून सारस्वत त्रिशंकुवत् लोंबकळत राहिले. ब्राह्मणांत नाहींत, आणि ब्राह्मणेतरांतहि नाहींत. पण कित्येकांना याची (उगाच) खंत वाटून आपण बिलकुल ब्राह्मण आहोंत असा अट्टाहास त्यांनीं धरला; आणि दुष्काळांत तोंडघाईला आलेल्या पूर्वजांचें (दंतकथेंतलें) पाप सोडल्यास सारस्वत ज्ञाति (निदान त्यांतील प्रतिष्ठित भाग) नेहमींच शाकाहारी होता अशी कैफियत त्यांनीं मांडली. हरहर! कोरड्या देशावरील हतभागी सारस्वतांचे आणि जलचरसंपन्न कोंकणपट्टींतु राहूनहि धार्मिक (गैर) समजुतीमुळें आत्मक्लेशाचा अकारण बडीवार करणाऱ्या अनैसर्गिक सारस्वतांचे अपवाद सोडल्यास समस्त सारस्वतवृंद मत्स्याहारीच नव्हे तर मत्स्यप्रेमी होता आणि आहे. गेल्या पन्नासपाऊणशें वर्षांत आहारनिष्ठ ब्राह्मण्याचा दंभ माजल्यामुळें खाल्ल्याशिवाय राहावलें नाहीं तर खाल्ल्याचा वास मारण्याच्या सोंवळ्या कल्पना निघाल्या. मासळी आणि तत्सम प्रामाणिक शब्दहि ओवळे झाले. तसला संभावित सारस्वत 'बाजार' खातो. ताज्या मासळीचा सुवास स्वैपाकघरांत मावतो; पण "सुक्या"चा गंध भिंती भेदून जाण्याइतका उग्र; तेव्हां तें चुलीवर (किंवा चुलींत) चढलें कीं भक्तीचा आवेग येऊन तो उदबत्त्यांची अख्खी जुडी देवापुढें लावतो. हें मासळीचें; मग मटणाचें संकट केवढें असेल! जिवानिशीं गेलेल्या शेळी (बोकडा) ला चमत्कारिक टोपण-नांवें ठेवलीं जातात. कोणी 'डबलटी' म्हणतात, कोणी आणखी कांहीं. हें मात्र खरं कीं जुन्या चालीरीतीच्या बऱ्याच सारस्वतांत (विशेषतः कारवारकडे) मटण निषिद्ध असतें; ती चालरीत सुटली तरी 'रविवारचा बडा बेत' यापुरतेंच तें असतें. तशा अर्ध-ब्राह्मणांना अंडींहि नामंजूर. खाल्लींच तर डॉक्टरचें नांव घेऊन. मग कोंबडीचें नांव कशाला? याशिवाय, सणासुदीला, गुरुवारसारख्या वारीं, श्रावणमासीं खायचें नाहीं अशा पवित्र तडजोडीहि असतात! गेल्या दहापंधरा वर्षांत याबाबतींत झपाट्यानें बदल झाले आहेत.

जात म्हणजे पोटजाती आल्याच; त्यांच्यांत लहानमोठेपणाची दुखणीं खुपणीं असणारच. अथ तरीं सासष्टकर, बारदेशकर, पेडणेकर, लोटलीकर, भालावलीकर आणि कुडाळदेशकर असे भेद नमूद आहेत. त्याशिवाय केवळ प्रादेशिक भेद. (वस्तुतः वरची नांवेंहि प्रदेशांवरून पडलेलीच; पण तीं पूर्वजवस्तीदर्शक.) प्रत्येक पोटजात आपण इतरांहून वरिष्ठ असें मानते. कुडाळदेशकर हें त्यांतल्या त्यांत जरा निराळे पडतात, आणि आपणांस आद्यगौड म्हणवितात. त्यांच्या आणि सारस्वतांच्या एके काळीं लेखी झटापटी झाल्या. त्यांत खूप इतिहास पिंजून काढला गेला. कुडाळच्या जवळपास आणि वसई तालुक्यांत ही पोटजात विशेष आढळते. सामंत ठाकूर, तेंडोलकर ('डू' नव्हे) हीं त्यांचीं खास आडनांवें. त्यांच्या स्वतंत्र संस्थाहि आहेत. हे सहसा शाकाहारी—म्हणून सच्च्या सारस्वतांना ते मागासलेले वाटतात कीं काय नकळे! या व इतर सारस्वतांत रोटीबंदी नसली तरी बेटीबंदी खरीच. म्हणजे जुन्या जमान्यांत. नव्या 'वेड्यां'ना कोण बंदी करणार? असो. गोव्याचे, कारवारचे, मंगळूरचे सारस्वत थोडे भाषाभेदानें अलग पडतात; आणि भूगोलानें थोडा रुचिभेद आणि चालीरीतींचे बारीकसारीक फरकहि येतात. 'मंगळूर' करनी 'कॅनरा सारस्वत' नांवाखालीं संस्थांचा निराळा प्रपंच केला आहे. बेळगांव-शहापूरचा वागहि तसा निराळा. 'मुंबईकर' ही चीज आणखी वेगळी. माळव्यांतले अगदींच दुरावले. पण प्रत्येकानें आपला ताठा मगदुराप्रमाणें राखला. त्यांतहि, सावंतवाडीच्या परिसरांतील सारस्वत स्वतःला अस्सल मानतो. आणि इतरांविषयीं तुच्छतेनें बोलतो. आणि तुच्छतेला त्या भाषेसारखी (म्हणजे, मालवणी कोंकणीसारखी) दुसरी भाषा नाहीं! या सर्व पोटभेदांचें एकीकरण व्हावें यासाठीं अनेक "सुधारकां"नीं प्रयत्न केले. पण या नेमस्त धक्क्यांपेक्षां काळाच्या ओघानेंच भिंती खिळखिळ्या केल्या आहेत. कांहींजण त्या अजूनहि केविलवाणेपणें लिंपू पाहातात.

सारस्वतांचीं मुख्य देवस्थानें गोव्यांत आहेत. मंगेश, शांतादुर्गा, महालक्ष्मी इत्यादि देवता. विशेष उत्सवांना तेथें गर्दी लोटतेच पण उन्हाळ्याच्या दिवसांत विश्रांति आणि धर्माचरण यांचा जोड देऊन शेंकडों परस्थ सारस्वत

मुलांचोंसह येतात. आणि धर्मकृत्यें करून (वा करवून) आणि आंबे–फणस खाऊन तुष्ट शरीरानें आणि मनानें गांवीं परततात. भक्ति क्षीण झाली तरी तिला ओढून आणावें अशीं तीं स्थानें आहेत. निसर्गाचें वरदान आहेच; पण देवस्थान म्हटल्यावर माणसाची जी हीन बाजू महमा दिसते, ती नाहीं. सगळें निर्मळ आणि प्रसन्न; भिक्षुकांचा आणि भिक्षेकऱ्यांचा लाचार कोलाहल नाहीं.

हीं पुराण दैवतें. ऐतिहासिक आणि आधुनिक काळांतील सारस्वत दैवतेंहि आहेत. संतापी परशुरामापासून पंतप्रधान नेहरूंपर्यंत. (असें ऐकलें कीं तीस वर्षांपूर्वीं अखिल भारतीय सारस्वत परिषदेचे कार्यकर्ते पंडित मोतीलाल नेहरूंना अध्यक्षपदाचें विचारण्यासाठीं गेले. तेव्हां पंडितजींचा संयम ढळला होता!) कविकुलगुरु कालिदासहि सारस्वत—सरस्वतीचा लाडका सुपुत्र या कौटुंबिक अर्थानें नव्हे, तर त्या जातींत जन्म घेतलेला म्हणून! संस्कृत विद्येंतील त्याचा थोर ज्ञातिबंधु म्हणजे सिद्धांतकौमुदीकार भट्टोजी दीक्षित. म्हणजे काव्य आणि व्याकरण दोन्ही आलीं. पुढें महेश्वरभट्ट सुखटणकरांच्या संस्कृत टीकाहि गाजल्या. मोडी लिपीचा जनक हेमाडपंत हा सारस्वत हें आठवलें कीं, मराठ्यांच्या वकिलातींपासून आजच्या सचिवालयापर्यंत लहानथोर कारकुनी फडेंपणा करण्याबद्दल नांवाजलेल्या या जातीचें व्यावसायिक रहस्य जणूं सांपडल्यासारखें वाटतें. आपलें प्राचीन कविमंडळ पाहिलें, तर संतांच्या दिंडींत जरा अग्रभागी असलेल्यांत सोहिरोबानाथ आंबये हे एकुलते एक सारस्वत सांपडतील; मागील दाटींत आणखी पांचसात. पण ते बारीक नजरेनें टिपावे लागतील. पंतकवींत कोणी नाहीं. आधुनिकांत—खरें म्हणजे अत्याधुनिकांतच—चारपांचजण तरी ठळक आहेत. अशी 'कालिदासादारभ्य' सारस्वत कवि परंपरा! आधुनिक साहित्याच्या इतर शाखांतहि ठळक सारस्वत नांवें आहेत. पुन्हां भूतकाळाकडे वळावें : पुणें दरबारीं कोणी सारस्वत चढला नाहीं. ग्वाल्हेरला त्याला अवसर मिळाला. जिवबादादा बक्षी हा शिंद्यांचा उजवा हात. मराठी इतिहासांतील एकमेव शेणवी सेनापति! अव्वल इंग्रजींत, नव्या शिक्षणांत आघाडी धरल्यामुळें असेल, या जातीची भरभराट सुरू झाली. विद्येच्या त्या नव्या होमांत डॉ. भाऊ दाजी (लाड) यांनीं मोठें संशोधनकार्य केलें. पुढें डॉ. भांडारकर आणि तेलंग यांनीं दिगंत कीर्ति मिळविली. शंकर पांडुरंग पंडित होतेच. त्या संशोधक मालेंतील अलिकडचा दुवा म्हणजे डॉ. वि. स. सुखटणकर.

एकंदरीनें सारस्वत हा हाडाचा कारकून किंवा पंतोजी. त्यानें इमानेंइतबारें नोकरीपेशा सांभाळला आहे; त्यांत यशहि मिळवलें. कांहीं स्वतंत्र व्यवसायांतहि—वकिली, वैद्यकीसारख्या—थोडीं माणसें पुढें आलीं. पण व्यापारधंद्यांत त्यांची गति नाहीं. फार तर पुस्तकें छापलीं आणि विकलीं; किंवा संसारोपयोगी साहित्याचा चिल्लर कारखाना चालवला! यापलीकडे धांव एखाद्याचीच. अर्थात् ही महाराष्ट्रीयांचीच कथा आहे! पण त्यांतहि शेणव्यांत हा उणेपणा विशेष. कलाक्षेत्रांत (दोन) हातांच्या बोटांवर मोजण्याइतकीं नांवें निघतील. कालपरवांपर्यंत आपल्या आंबट समाजजीवनात संगीत छचोर मानलें गेलें—आणि नृत्य व नाट्यहि! पण दक्षिण कोंकणांतील (विशेषतः कारवारकडील सारस्वतांत स्त्रियांनीं घरांघरांतून संगीत खेळतें ठेवलें—पण घरापुरतेंच. (कीं लग्नमंडईपुरतें?) असो. क्रीडाक्षेत्रांत, मुख्यतः क्रिकेटमध्यें चार मातबर नांवें आहेत.

नोकरी उत्तम. सरकारी नोकरी उत्तमोत्तम. या सारस्वत-बीदांत साहजिकच आय. सी. एस. सारखी वरिष्ठ सरकारी नोकरी म्हणजे परब्रह्मच! तें ज्याला लाधलें त्या पुरुषर्भाचें अपार कौतुक असे. त्यासाठीं मुलीहि 'तयार' करणारीं धनवंतांचीं कुटुंबें असत. अशा मुलीला बोलणें, बसणेंउठणें, खाणेंपिणें, देहशृंगार, गृहशृंगार इत्यादि बाबतींत साहेबी सफाई आणण्याची कोशीस होई. इतक्या घोर तपस्येनंतरहि देव पावला नाहीं (आणि देव एक तर होऊं घातलेल्या किंवा होतकरू देवी दहा तरी असत!) तर नाइलाजानें एखादा दुय्यम देव पाहावयाचा.—बॅरिस्टर, निदान इंग्लंडची यात्रा घडलेला, अशी पुढें उतरती श्रेणी असे. अशा वातावरणांत 'राजनिष्ठा' हा सद्धर्म होता. 'उच्च' सारस्वत कुटुंबांत—म्हणजे मुंबईत गांवदेवीला राहणाऱ्या—कोणी राजकारण बोललेंच तर तें अति नेमस्त असे!

सारस्वतांत भाषाभेद आहेत. 'मराठी' आहेच. मुळापासून देशावर राहिलेल्यांत घरींदारीं तेंच. (अर्थातच स्थानिक लकबींसह, म्हणजे बेळगांवशहापुरी साजुकपणा, कोल्हापुरी मसाला, इंदुरी हिंदी-पणा, पुणेरी ग्रांथिकता आणि मुंबईकरी भेसळ)... 'कोंकणी' (म्हणजे कोंकणांत राहणाऱ्या अथवा तेथें मुळें असलेल्या) अनेकदां घरीं कोंकणी, पण दारीं मराठी—अथवा माज

बरांत कोंकणी पण दिवाणखान्यांत मराठी—असें असतें. कित्येकदां दांपत्यापैकीं एक मराठी, एक कोंकणी—पण असा द्विभाषिक व्यवहार (संसारजन्य आदळआपट सोडल्यास) गुण्यागोविंदानें चालतो. कधीं वयोमानानें फरक पडतो; मोठी पिढी कोंकणी-भाषी, मागची मराठी-भाषी. कोंकणी सुटत चाललें, तें कांहींसें सरमिसळ व्यवहारामुळें; पण बरेचसें त्यांतील कमीपणाच्या भावनेनें, लाजेनें. कोणतीहि बोली 'अशुद्ध' असा पुस्तकासारखें बोलू पाहाणाऱ्यांचा अडाणी अहंकार असतो. त्या वर्गाच्या वरचष्म्यामुळें असें झालें. यानें 'बोली' सुकून जाते आणि 'भाषा'हि दुबळी बनत जाते.

पण 'कोंकणी' ही अनेकांस वाटते तशी एक बोली नाहीं तिच्या तीन प्रमुख तऱ्हा आहेत. प्रदेशाप्रमाणें. रत्नागिरी–जिल्ह्याच्या दक्षिण भागांतील मालवणी कोंकणी, गोमंतकी (कारवारी सारखीच), आणि मंगळूरी. 'मराठी' भाषिकांस या समजायला वरील क्रमानेंच अधिकाधिक कष्ट पडतात. फक्त मालवणी हेल, गोमंतकी मार्दव आणि मंगळूरी हिसका सहज स्मरणांत राहातात. घालूनपाडून बोलायला, आणि मुद्याला हात घालणाऱ्या (आणि म्हणून अश्लील) म्हणींसाठीं मालवणी ही थोर बोली आहे. तें वैभव तोंडातोंडी वायां जातें याचें वाईट वाटतें; गोमांतकी म्हणीहि तशा अळणी नाहींत. असो. या तीन कोंकणी बोलींची कल्पना येण्यासाठीं—

मराठी : द्वारकेचें लग्न मोठ्या थाटांत झालें.

मालवणी कोंकणी : द्वारक्याचें लगीन मोठ्या उबाज्यान झालां.

गोमंतकी (कारवारी) कोंकणी : द्वारक्याले लग्न भारी कडाक्यान जालें.

मंगळूरी कोंकणी : द्वारकेली होरडीक चांग थाटानें जाली.

(एका लेखावरून)

कोंकणी (म्हणजे गोमंतकी–मंगळूरी) ही बोली नसून स्वतंत्र भाषा आहे असाहि पंथ आहे. या भाषाकारणांत राजकारणहि आहेच !

सारस्वतांत दर्शनी वेगळेपणा नाहीं. देहयष्टीचे, वर्णाचे, चेहेरेपट्टीचे विविध प्रकार त्यांच्यांत आहेत. वेषभूषा आतां इतरांसारखीच; पूर्वी विशेष लकबी असत, जसें मुंबईकरांचें बंदरी पागोटें, कोंकणी सारस्वताचा रुमाल, इत्यादि. धोतराची मंगळूरी लपेट ओळखतां येते. सराईत कानाला मात्र त्याचें वेगळेपण अजून जाणवेल, निदान बहुतेकांबाबत. नांव समजलें तर जात उमगण्याचा बराच संभव आहे. अर्थात् देशपांडे, कुळकर्णी असलीं मोघम नांवें सोडून. उदाहरणार्थ, नाडकर्णी, रेगे, कामत, वागळे, तेलंग, संझगिरी, गायतोंडे, कानविंदे, राजाध्यक्ष असलें कांहीं ऐकलें कीं शेणवी समजून चालावा—मग त्याचें बोलणें केसरीच्या अग्रलेखाइतकें 'शुद्ध' का असेना !

इतर कांहीं वैशिष्ट्यें सांपडतील—त्यांतील बरीचशी कोंकणप्रेमांतून आलेलीं. नारळ फोडल्याशिवाय त्याचा स्वैपाक–विधी सुरू होणार नाहीं. आतां शहरांत नारळ महागला तरी तो खरवडून मिळेल तें 'चून' भाजीआमटींत घालील. आमसोलें घातलेली नारळाची कढी हवीच. ज्याच्या स्वैपाकघरांत नारळाची शेंडी नाहीं तो खरा सारस्वत ब्राह्मण नाहीं ! त्याची बरीचशीं पक्वान्नेंहि नारळांत सामावलेलीं. त्याला इतर मोठीं व्यसनें नाहींत; फार तर विडी–तपकिरीचा नेमस्त रंगेलपणा. पण खऱ्या कोंकण्याला जेवणावर मुखशुद्धि म्हणून 'कातळी' हवी...गरीबांच्याहि पैशाचें असें खोबरें होतें.

इतर जातींप्रमाणें सारस्वतांत नव्याजुन्याचें मिश्रण आहे. कदाचित् थोड्या अधिक प्रमाणांत असेल; कारण शहरवासी समाज आणि शिक्षणाचा प्रसार फार (स्त्रियांतहि). उलट, आधुनिक महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासांत जो परंपरेचा दाब आहे तोहि सुटला नाहीं. त्यांतच वर सुचविलेला ब्राह्मण्याचा सोंवळा सोस ! पण गेल्या दहा पंधरा वर्षांत दिशा बदलल्याचीं चिन्हें आहेत. हें नवें वळण जातपोटजातींचें जाळें ओलांडून वा तोडून जाईल असाहि रंग आहे. कोणाला हाहि अनाचार वाटेल; 'संस्कृती'चें कसें होणार याची चिंता लागेल. ती संस्कृति-जाती पोटजातींची. शेवाळ माजल्यामुळें मनोरम दिसणारी ! "सारस्वत संस्कृति" असा शब्द-प्रयोग गंभीरपणें करणारे आहेतच ! !

• • •



# 'आधीं लगीन कऱ्हाड्याचें' पण जांवयाचें काय?

—वसंत सबनीस

गोविंदपंत बुंदेल्यापासून गोविंदराव टेंब्यांपर्यंत अनेक थोर लोकांनीं ज्या जातींत जन्म घेतला, ती कऱ्हाडे ब्राह्मणांची जात दोन गोष्टींबद्दल फार प्रसिद्ध आहे. एक म्हणजे झांशीची राणी लक्ष्मीबाई आणि दुसरी म्हणजे जांवई मारणारी जात म्हणून! कऱ्हाडा ब्राह्मण आपल्या जातीच्या शूरपणाच्या गोष्टी सांगूं लागला कीं, झांशीच्या राणीच्या तलवारीची धार त्याच्या जिभेला येते. तसं पाहिलं तर पूर्वीच्या रणधुमाळीच्या काळ त इतरांप्रमाणें अनेक कऱ्हाडे ब्राह्मणांनाही तरवार हातीं घ्यावी लागली होती आणि राजकारणांतही पडावें लागलें होतें. एका इतिहास संशोधकानें असेंही म्हटलें आहे कीं, शिवाजी महाराजांनीं जे अष्टप्रधान नेमले, त्यांत पेशवा म्हणून पहिल्यानें मोरे नांवाच्या कऱ्हाडे ब्राह्मणाची नेमणूक केली होती. पण पुढें पेशव्यांचीं वस्त्रें कऱ्हाड्यांच्या अंगाला आलीं नाहींत. इतिहासांत अशीं अनेक उदाहरणें असतीलही. पण झांशीच्या राणीनें कऱ्हाडे ब्राह्मणांच्या जातींत जन्म घेऊन त्या जातीवर झांशीच्या किल्ल्याएवढे उपकार करून ठेवले आहेत. म्हणून कऱ्हाडा ब्राह्मण विनदिक्कतपणें राणी लक्ष्मीबाईचा शूरपणा आपल्यालाही चिकटवून घेतो. राणी लक्ष्मीबाईचें नांव काढलें कीं, त्याला घोड्यावर बसल्यासारखें वाटतें पण तेवढ्यांत कुणी जांवई मारण्याचा उल्लेख केला कीं, त्याच घोड्यावरून खालीं पडल्यासारखा त्याचा चेहरा होतो!

कऱ्हाडा ब्राह्मण इतर ब्राह्मणापेक्षां दिसायला मुळींच वेगळा नाहीं. आता ब्राह्मणसुद्धां ओळखणें कठीण. पूर्वी निदान गळ्यांतल्या जानव्याचा अंदाज घेऊन ब्राह्मण्य चाचपता येत असे. आतां तीही सोय नाहीं. मग ब्राह्मणांतला कऱ्हाडा ब्राह्मण ओळखणें केवळ अशक्य आहे. कोकणस्थ शरीराच्या विशिष्ट ठेवणीवरून व देशस्थ कपड्यावरून ओळखतां येता असा कांहीं जाणत्यांचा अभिप्राय असला, तरी कऱ्हाडे ब्राह्मणाचें असें लक्षण सांगतां येणार नाहीं कऱ्हाडा ब्राह्मण कुठल्याही माणसासारखा असूं शकेल आणि कुठलाही माणूस कऱ्हाड्यासारखा दिसूं शकेल (अर्थात् जागतिक भूमिकेवरून नव्हे.) तेव्हां आडनांवाचा आधार घेतल्याशिवाय कऱ्हाडा ब्राह्मण ओळखतां येणें कठीण.

कऱ्हाडे म्हटल्यानें कुणालाही कऱ्हाड या गांवाची आठवण व्हावी हें रास्त आहे. पण लहानपणीं मी कऱ्हाडे या शब्दावर अडखळलों होतों. त्यावेळीं माझ्या मतें हुशार असलेल्या एका इसमानें कऱ्हाडे या शब्दाचा कुऱ्हाडीशीं संबंध असल्याचें सांगितलें होतें. 'गळ्यांत जानवं ब्राह्मण नव्हे' या सारख्या मति गुंग करून टाकणाऱ्या उखाण्यांनीं चकित होण्याचें तें वय होतें. त्यामुळें साहजिकच त्या इसमानें जेव्हां व्युत्पत्तिशास्त्रांतील कांहीं शब्दांच्या सहाय्यानें 'कऱ्हाडे' शब्द 'कुऱ्हाडी'त बसवला आणि कुऱ्हाडींतील 'उ' कसा तुटला हें सांगितलें, तेव्हां मी थक्क झालों होतों. इतकेंच नव्हे तर जांवई मारण्याचा कुळाचार आणि 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' ही म्हण यांचा कसा घनिष्ठ संबंध आहे हेंहि त्यानें मला दाखवून दिलें होतें. पण नंतर, कऱ्हाड्यांचा कुऱ्हाडीशीं लाकडें फोडण्याखेरीज दुसरा कसलाही संबंध नाहीं हें समजल्यावर मानेवरची कुऱ्हाड उचलली गेल्यासारखें वाटलें.

एन्थोवेन सारख्या साहेबानें सुद्धां गुर्जर या आडनांवावरून कऱ्हाड्यांचा संबंध अगदीं ता न हूण आणि शक यांच्याशीं नेऊन भिडवला आहे. पण खरें पाहिलें तर आणि संशोधकाचा आव आणून सांगायचें तर कऱ्हाडे ही जात इतर कांहीं ब्राह्मण जातींप्रमाणेंच प्रादेशिक आहे. करहाटक प्रांतांतील ब्राह्मण ते करहाटक ब्राह्मण. करहाटक प्रांत सध्याच्या नकाशांत नाहीं. एके काळीं तुंगभद्रेपासून नर्मदा गोदावरीपर्यंत करहाटक प्रांत पसरलेला होता आणि त्याची राजधानी करहाटक क्षेत्र म्हणजे सध्याचें कऱ्हाड ही होती. या करहाटक प्रांतांत दहाव्या शतकापासून शिलाहार राजे राज्य करीत होते. शिलाहार राजांची कुलदेवता महालक्ष्मी ही होती आणि कऱ्हाडांत तिचें पूर्वी भव्य मंदिर होतें असें सांगतात. कोल्हापूर येथेंही श्रीमहालक्ष्मीचें प्रसिद्ध देवालय आहे आणि पन्हाळगडावरील शिलाहार राजे या देवीचे उपासक होते. बहुतेक कऱ्हाडे ब्राह्मणांचें कुलदैवत महालक्ष्मी हेंच आहे.

तथापि कऱ्हाडे हें नांव स्थलांतर नंतर चिकटलें. सोलापूरचा इसम सोलापुरांत असतो तोपर्यंत तो सोलापुऱ्या नसतो. तो पुण्यांत येऊन राहिला कीं सोलापुऱ्या होतो. याच न्यायानें करहाटक प्रांतांतील ब्राह्मण कोकणांत उतरला, तेव्हां तेथील ब्राह्मणांनीं या उपऱ्या ब्राह्मणास करहाटकी किंवा कऱ्हाडे म्हणायला सुरवात केली असली पाहिजे. आणि त्यांतूनच कऱ्हाडे ब्राह्मण ही नवी जात निर्माण झाली. नरसिंहभट्टाचें कऱ्हाडे घराणें दक्षिण कोकणांत पहिलें होय तेथून पुढें अनेक घराणीं करहाटकांतून कोकणांत गेलीं. तर बेळगांवच्या आजुबाजूच्या गांवांतून कदंब राजांनीं आपल्या कारकीर्दीत अनेक कऱ्हाडे कुटुंबें गोमांतकांत नेलीं. पण पुढें मुसलमान व पोर्तुगीज राज्यकर्त्यांच्या धर्मच्छलामुळें ह्यांतील बरींच कुटुंबें सावंतवाडी व रत्नागिरीस निघून आलीं. तथापि आजही अनेक कऱ्हाडे कुटुंबें गोमंतकांत आहेत केवळ गोमंतकांतच नव्हे तर सबंध हिंदुस्तानभर नंतर कऱ्हाडे या ना त्या निमित्तानें पसरले. अगदीं आसेतुहिमाचल जरी नसले, तरी काशीपासून रामेश्वरापर्यंत कऱ्हाड्यांनीं आपले तंबू ठोकले आहेत. काशी व नाशिक येथील क्षेत्रोपाध्याय कऱ्हाडे आहेत. नेपाळांत फक्त गुरखेच असतात अशी कुणाची समजूत असेल तर ती कऱ्हाडे ब्राह्मणांनीं खोटी ठरविली आहे! तेथील पशुपतेश्वराच्या पूजेसाठीं कऱ्हाडे ब्राह्मणाची नेमणूक केली जाते. रामेश्वराचा पुजारी हासुद्धां कऱ्हाडा

आहे प्रादेशिक भिन्नत्वामुळें नव्यानें निर्माण झालेल्या या जातीसंबंधींचा विनोद असा कीं, जीं ब्राह्मण घराणीं कऱ्हाड सोडून गेलीं नाहींत तीं कऱ्हाडे झालीं नाहींत! जे कांहीं ब्राह्मण वंशपरंपरागत कऱ्हाडांतच राहिले, त्यांना देशस्थांचें लेबल लागलें आणि कित्येक दिवस कोकणांतून कऱ्हाडे होऊन आलेल्या घराण्यांशीं त्यांच्या बेटीव्यवहार होत नसे. वास्तविक त्यावेळीं देशस्थ कऱ्हाडे व कोकणस्थ कऱ्हाडे अशा पोटजाती कशा निघाल्या नाहींत हें कळत नाहीं!

कऱ्हाडे ब्राह्मणांचें अयोध्यापति श्रीरामचंद्राशीं इतर कोणत्या बाबतींत नसलें, तरी एका बाबतींत साम्य आहे. श्रीरामचंद्र एकवचनी, एकपत्नी व एकबाणी होता. कऱ्हाडे ब्राह्मणही एकवेदी, एकसूत्री व एकशाखी आहेत. एकजात सर्व कऱ्हाडे ब्राह्मण ऋग्वेदी, अश्वलायन सूत्राचे व शाकलशाखी आहेत. गोत्रें मात्र २४ आहेत. बहुतेक कऱ्हाडे स्मार्त अद्वैत मतानुयायी आहेत. वैष्णवही आहेत; पण ते फारच थोडे. बहुतेकांची कुलदेवता कोल्हापूरची महालक्ष्मी हीच आहे. तथापि गोमांतकांतील कऱ्हाड्यांच्या कुलदेवता शांतादुर्गा, म्हाळसा, महालक्ष्मी, आर्यादुर्गा इत्यादि आहेत. अनंत पूजेचें व्रत कऱ्हाड्यांत फार. तसेंच ललितापंचमी व दुर्गाष्टमी यांचे महोत्सव व नवरात्रांत सप्तशतीचे पाठ कऱ्हाड्यांत विशेषत्वानें आढळतात.

एवढ्याच गोष्टींच्या बाबतींत कऱ्हाडे इतरांहून वेगळे असल्यास असतील. अर्थात् आडनांवावरून थोड्याफार प्रमाणांत जातीचा बोध होतो, नाहीं असें नाहीं. पण कऱ्हाड्यांचीं वैशिष्ट्यपूर्ण अशीं आडनांवें थोडीं. बरींच आडनांवें देशस्थ व कोकणस्थांतही आढळतात. फक्त कांहीं आडनांवांत अक्षरशः काना, मात्रा किंवा वेलांटीचा फेरफार केला कीं तें आडनांव कऱ्हाड्यांत बसतें. 'कानिटकरां'त 'नेट' घातला कीं तो 'कानेटकर' होऊन कऱ्हाड्यांत जाऊन पडतो. 'वरेरकरां'तला 'र' काढला कीं उरलेल्या वरेकराला कऱ्हाड्यांचें लेबल लागतें. 'आपट्यां'तील 'प' चा 'ग' होतो आणि 'आगटे' कऱ्हाड्यांत येतो. 'गद्रे' मधील अर्धा र रफाराचें रूप घेऊन 'गर्दे' झाला कीं कऱ्हाडा बनतो. तर कधीं एकादी मात्रा मागें सरकते व 'खरे' चे 'खेर' होतात. कऱ्हाड्यांत नाहीं म्हटलें तरी ५४५ आडनांवें आहेत. आणि आडनांव म्हटलें कीं त्याला धरबंद नाहीं. कऱ्हाड्यांत 'किरकिरे' आहेत आणि 'घरघरे' व 'करकरे' ही आहेत. 'कोले' आहेत व 'कोळे' आहेत. 'सांडू' आहेत आणि 'सांडवे' ही आहेत. 'शहाणे' फक्त कऱ्हाड्यांतच आढळतात! 'धाकरस' आहेत व 'लोकरस' आहेत. 'प्रभूदेसायां'च्या बरोबर 'सरदेसाई' पण आहेत. 'हळवे' आहेत (मनानेंही!) व 'हळबे' ही आहेत. 'कडू' नसले तरी 'गोडे' कऱ्हाड्यांत आहेत. 'कर्पे' आहेत व 'ओर्पे' ही आहेत. 'तांबे' आणि 'टेंबे' तर आहेतच, पण 'टिंबे' ही आहेत. 'वळवलकरां' बरोबर 'तळवलकर' आहेत. 'कात्रे' आहेत नि 'पित्रे' आहेत. 'चणेकर' आहेत व 'चिरमुले' ही आहेत. 'पडशे' आहेत आणि त्यावर उतारा म्हणून थोडे 'वैद्य' ही आहेत. 'पळसुल्यां' च्या जोडीला 'तळसुले' आहेत आणि 'पाथरकरां' च्या बरोबरीनें 'पाथरफोडकर' आहेत. आतां सांगूं नये, पण 'शेंबडे' आहेत आणि त्याहीं पलिकडे जायचें म्हणजे 'घाणे' सुद्धां आहेत!

अशा रीतीनें ना देशस्थ, ना कोकणस्थ






अनुक्रमणिका





तरीही दोन्ही ठिकाणीं वास्तव्य करणाऱ्या कऱ्हाडे जातीनें देशस्थ व कोकणस्थ यांच्यांतील कांहीं चांगले गुण आत्मसात् केले आहेत. देशस्थांचा उदारपणा व कोकणस्थांची स्वच्छता कऱ्हाड्यांनीं टिपली. 'कऱ्हाडे टापटिपीचे व व्यवहारदक्ष असतात' असा कै. तात्यासाहेब केळकरांनींही अभिप्राय दिला आहे. अर्थात् प्रत्येक कऱ्हाडे कुटुंब या कसोटीस उतरेल असें समजूं नये. दोषांच्या बाबतींतही सर्व मानवी दोष आढळतात. परंतु त्यांतल्या त्यांत आढ्यताखोर, आग्रही, खार्चिक, भांडखोर व मानी हे दोष सबंध जमातीच्या नांवानें सांगितले जातात. त्यांतही तथ्यांश आहे. कांहीं वर्षांपूर्वी एकादा कऱ्हाडा वरच्या हुद्द्यावर गेला कीं, गांवांतली सर्व कऱ्हाडे मंडळी आपल्यालाच प्रमोशन मिळाल्याच्या थाटांत चालत असत. आतां ही भावना थोडी गेली आहे. तथापि अजूनही "तो कमिशनर झाला तो कऱ्हाडा आहे म्हटलं. कऱ्हाडा कधीं मागं राह्यचा नाहीं," असे उद्गार ऐकूं येतात. पण पुढें जाणारा कऱ्हाडा म्हणून पुढें जात नसतो किंवा मागें राहणारा कऱ्हाडा म्हणून मागें रहात नसतो.

पण पेशवाईत मात्र कऱ्हाडे मागें पडले असें कांहीं लोकांचें मत आहे. कारण पेशव्यांचा कऱ्हाड्यांवर दांत होता म्हणे. त्याचें कारण कऱ्हाड्यांचा जांवई मारण्याचा कुळाचार! ह्या तथाकथित कुळाचारानें कऱ्हाड्यांना जेवढें बदनाम केलें आहे, तितकें दुसऱ्या कुठल्याही गोष्टीनें केलेलें नाहीं. ही कथा अशी कीं, कऱ्हाड्यांची मातृका म्हणून कोणी देवी होती आणि वंशवृद्धीसाठीं तिला नरबली देण्याची चाल होती. तो नरबलीसुद्धां जांवई किंवा भाचा लागत असे आणि यांपैकीं कोणी मिळाला नाहीं तर अन्य कोणताही सुलक्षणी ब्राह्मण चालत असे. दरवर्षी कार्तिक शुद्ध पौर्णिमेस हा कुलधर्म करावयाचा व विष घालून नरबली द्यावयाचा असा हा प्रवाद आहे.

हा प्रवाद खोटा असला तरी ज्यानें हा हुडकून काढला, त्यानें कऱ्हाड्यांचा कांटा काढण्याचा नाविन्यपूर्ण उपाय योजला यांत मुळींच शंका नाहीं! या प्रवादाचें मूळ स्कंद पुराणांतील सह्याद्रि खंडांत आहे. या सह्याद्रि खंडांतील पहिला अध्याय चित्पावन ब्राह्मणांच्या निंदेनें भरलेला आहे आणि दुसरा अध्याय कऱ्हाड्यांच्या नालस्तीचा आहे. या अध्यायांत काराष्ट्र या काल्पनिक देशाचें व तेथील दुष्ट देवीचें वर्णन लिहिलें आहे व त्यांतच कऱ्हाड्यांच्या या कुळाचाराचा उल्लेख केला आहे. कऱ्हाड्यास हव्य-कव्यास बोलावूं नये व त्यांच्या देशावरून आलेला वारासुद्धां बारा कोसपर्यंत घेऊं नये असाही हितोपदेश त्यांत केलेला आहे. परंतु अलिकडील संशोधनावरून असें सिद्ध झालें आहे कीं, सह्याद्रि खंडाच्या सुमारें ३०० वर्षांपूर्वीच्या प्रतींत वर उल्लेखिलेले अध्याय नाहींत!

तेव्हां पेशव्यांचा कऱ्हाड्यांवर या कारणासाठीं दांत असता, तर त्यांनीं मनुष्यवधाच्या आरोपावरून सर्व कऱ्हाडे सासऱ्यांना जांवयांची वाट दाखविली असती. पण तसा कुठेंच उल्लेख आढळत नाहीं. नाहीं म्हणायला एन्थोवेन साहेबानें म्हटलें आहे कीं, नानासाहेब पेशव्यानें कडक शासन करून कऱ्हाड्यांमधील ही प्रथा बंद केली!! पण ही प्रथाच निराधार असल्यानें आतां कोणी या प्रवादावर विश्वासही ठेवीत नाहीं.

भाषेच्या बाबतींतही कऱ्हाड्यांचें वेगळें असें वशिष्ट्य सांगतां येणार नाहीं. तथापि ढोबळ मानानें कोल्हापुरी थाटाची भाषा कऱ्हाड्यांच्या तोंडीं आढळून येते. एकादा इसम 'वाटेंत मास्तराकडे जाऊन आलों' असें म्हणेल; तर कऱ्हाडा माणूस 'वाटेंत मास्तरांच्यांत जाऊन आलों' असें सांगेल. अठ्याहत्तर हा शब्द कोल्हापूर साताऱ्याकडचा कऱ्हाडा 'अष्ट्याहत्तर' असा उच्चारतो. परंतु वेगळा असा भाषेचा थाट नाहीं. भाषेंत फरक असलाच तर तो प्रादेशिक असेल. विठोबाअण्णा दप्तरदार या कवीनें कऱ्हाडे हे बोलतांना अधिक विसर्गयुक्त बोलतात व 'नि' शब्द फार वापरतात असें म्हटलें आहे. पण हें विधान कितपत सत्य आहे याची शंका आहे. त्यांनीं ज्या श्लोकांत कऱ्हाड्यांचीं वैशिष्ट्यें नमूद केलीं आहेत त्याचा आशय असा:—अनंताचा दोर भूषण म्हणून दंडाला बांधणारे, कशेळीच्या आजुबाजूला राहणारे, कुबेराशीं आपलें सख्य आहे असे भासविणारे, शरीरानें भव्य, आपल्या भाषणांत विसर्ग आणि 'नि' या शब्दांचा भरपूर वापर करणारे आणि दुर्गा देवीचे उपासक असे कऱ्हाडे ब्राह्मण!

असा हा कऱ्हाडे जातीचा पसारा आहे. तसा आटोपशीरच आहे. कारण एका कऱ्हाड्याला दुसरा कऱ्हाडा भेटला कीं वळणें, वळसे घेऊन कां होईना त्यांचें नातें लागायचेंच असें जें म्हणतात त्याचा अर्थ हाच!

● ● ●




**उसनवारी**

ओठ, गाल रंगित हे रूप तुझें उसनें गे
बोल तुझा लाडिक पण ऐटीसम उसना गे
भाव, प्रेम तेंहि असे चाले मज उसनें गे,
उसन्यावर जगणारा मीहि तसा ॠणको गे!

—वसंत सबनीस




—शां. शं. रेगे

मुंबईच्या अठरापगड जातींपैकीं एका विशिष्ट पगडीचे मानकरी पाठारे प्रभु हे मुंबईचे फार पुरातनचे रहिवासी आहेत. राजा बिंब-देवानें जेव्हां इ. स. १२९३ मध्यें माहिम बेट वसवलें, त्यावेळीं त्याच्याबरोबर ही जमात इकडे आली. पाठारे प्रभु जातीची कुलस्वामिनी देवी-परभादेवी हिची स्थापना माहीम बेटांत शके १२१७ मध्यें हेमाद्रीपंत यानें केली असा उल्लेख सांपडतो. पुढें इ.स. १५१९ त पोर्तुगी-जांच्या हल्ल्याच्या भयानें ही मूर्ति रातोरात एका विहिरींत दडवून ठेवण्यांत आली. व इ. स. १७३७ त वसईच्या पाडावानंतर ती मूर्ति व देऊळ ज्ञातीच्या मुख्य उपाध्यायांकडून देवळाच्या हल्लींच्या जागीं वसविलें गेलें. देवळाच्या दक्षिण भागीं असलेल्या शिलालेखांत हा उल्लेख सांपडतो.

ही जाती तत्पूर्वी पाटणहून आली, म्हणून त्यांचा पाताणे असाही उल्लेख केला जातो. पाटण हें गुजरातेंत असल्यामुळें प्रभु जातीच्या बोली-भाषेंत बरेचसे गुजराती शब्द व वाक्प्रचार आढ-ळतात. तसेंच काठेवाडी, मारवाडी शब्द व रीतीभाती परभांच्या दैनिक जीवनांत पुष्कळ आढ-ळतात. प्रभु लोकांची वसाहत पोर्तुगीज सत्तेच्या आरंभापर्यंत मुंबईत स्थिर होती. त्या वेळपर्यंत प्रभु लोक सरकार दरबारीं इतमामाचे हुद्देदार होते. पोर्तुगीजांनीं मुंबई बेटांत बाटवाबाटवी सुरू केल्यावर ही ज्ञाती इतस्ततः पांगली. कांहीं कुटुंबें साष्टी बेटांत गेलीं. कांहींनीं इतर मराठी संस्थानांत आश्रय घेतला. जे इथें राहिले, त्यांच्याकडून पोर्तुगीजांनीं वेठीचें काम करवून घेतलें! इंग्रज लोकांना मुंबई बेट मिळाल्यावर ही पांगलेली वस्ती पुन्हां हळूहळू मुंबईस येऊं लागली. प्रभु लोक कारकुनी पेशांत इतके रुळलेले असत कीं, ईस्ट इंडिया कंपनीच्या दप्तरांत purvoes हा प्रभु या शब्दाचा अपभ्रंश कारकून ह्या अर्थी वापरलेला आढळतो! आजहि जवळ जवळ तीच स्थिति आहे. मुंबईतल्या बहुतेक बँकांत, इन्शुरन्स कंपन्यांत हायकोर्टात, सॉलिसिटर कंपन्यांत, जास्त टक्के भरणा परभांचाच. ही जात फार पूर्वी अतिशय श्रीमंत होती. मुंबईत ह्यांच्या मालकीच्या अनेक वाड्या व इमारती होत्या. पण आज काप जाऊन भोकें उरलीं, तीं रस्ते आणि गल्ल्यांच्या नांवांत! पाठारे प्रभु ही जातच उत्सवप्रिय आणि षोकीन आणि ह्या त्यांच्या 'खा, पी, मजा कर' प्रवृत्तीनें त्यांनीं आपलें मुंबईवरचें प्रभुत्व घालवून आज ते पर-भू ठरले आहेत. सोकाजीराव हें खडाष्टक नाटकांतील पात्र व संशयकल्लोळ मधील फाल्गु-नराव ही प्रभूंच्या रंगेलपणाचीं अक्षर स्मारकें मराठी वाङ्मयांत प्रसिद्ध आहेत.

१९२४ सालीं केलेल्या ज्ञातीच्या खानेसुमारी-वरून मुंबईत एकंदर ८२९ कुटुंबें स्थायिक होतीं. त्यांपैकीं खुद्द मुंबई शहरांत ६५४ कुटुंबें, परळपासून बोरिवलीपर्यंत १५० कुटुंबें व मुंबई-बाहेर इंदूर, कराची, सुरत, बडोदें वगैरे ठिकाणीं २५ कुटुंबें होतीं असें कळतें. नवीवाडी हे ज्ञातीचें हेड ऑफिस. इथूनच ज्ञातीचा 'वरघोडा' प्रतिवर्षी होळीला निघत असे. पाठारे प्रभु कुटुंब त्यावेळीं सधन असे. प्रत्येक कुटुंबाच्या मालकीचा निदान एक बंगला तरी मुंबई बेटांत असायचा.

पाठारे प्रभु हा अतिशय षोकीन. त्याचा खाबदार पोशाख पाहण्यासारखा असे. जुना परभु जामापिछोडी, बागबंदी, नागपुरी धोतर-जोडा, परभी टांकीचा जोडा व बंदरी पगडी घालून उत्सवांत मिरवत असे. स्त्रीवर्ग नऊ-वारी बुट्टयाचा भरजरी शालू अगर पितांब, मखमली भरजरी चोळी, अंगावर शेला, पायांत गादीचा जोड व अंगभर सोन्या-मोत्याचे जड दागिने घालून वर्गीतून मिरवतांना दिसत असे. जेवणाच्या बाबांत तर पाठारे प्रभूंचा हात कोणी धरूं शकणार नाहीं. लक्ष्मी-बाई धुरंधरांच्या 'हजार पाकक्रिया' हें परभांच्या भोजनकौशल्याचें चिरंतन स्मारक राहील. परभांना दररोज मासांचें कालवण व आठवड्यां-तून एकदोनदां तरी मटण लागतें. ह्या असल्या पदार्थांच्या सतत माऱ्यानें परभांचे देह अवा-स्तव न सुटले तरच नवल! पुष्कळ परभांचीं नांवें ह्यांच्या देहाच्या अपवादात्मक आकारा-वरून पडलेलीं दिसतात.

पारशांप्रमाणें परभु हा इंग्रजी सार्वभौमसत्तेचा अभिमानी. राणी सरकारबद्दल त्यांना इतका जिव्हाळा कीं घरोघरीं मढवलेले राणीचे फोटो व वेळोवेळीं त्याना हार घातलेले असत. १८५७ च्या बंडाच्या वेळीं पारशी जमाती प्रमा-णेंच परभु ज्ञातीनेंही सरकारला नैतिक व सक्रिय पाठिंबा दिला होता. बंड मोडलें त्या दिवशीं परभांनीं आनंदोत्सव साजरा केला व देवळांतहि ईश्वरप्रार्थना केली. त्यांपैकीं पुढील प्रार्थना उल्लेखनीय आहे!—

"प्रभुसाठीं प्रभूला प्रभू विनविती ॥
संकट निरसुनियां होवो सर्व शांती ॥
रस्ता दावुनियां येथें त्वां आणिलें ॥
कांहीं दिवसांनीं राज्यीं कीं चढविलें ॥
सर्व जनाला सुख तें बहु झालें ॥
करीतें ऐसें सदोदित चालें ॥१॥...
संकट समयीं नाहीं कोणी त्राता ॥
तुजवीण आम्हां दयाळा भगवंता ॥
अनुभव पूर्वी आलासे पुरता ॥
धावें धावें बा शिगव्रू नको आतां ॥२॥

परभू लोकांनीं इंग्रजांशीं कृतज्ञता व्यक्त कर-ण्याची एकही संधी सोडली नाहीं. इंग्रज सरकार उलथून टाकण्याच्या कोणत्याहि प्रयत्नांत त्यांनीं भाग घेतला नाहीं. नामदार जयकरांसारख्या मुरब्बी राजकारणी पुरुषाला हें इतकें जाणवलें कीं त्यांनीं १९२२ सालीं ज्ञातीला दिलेल्या एका संदेशांत ही दुर्दैवी कबुली दिली आहे!

अनुक्रमणिका

पारशांप्रमाणें प्रभु जमात ही देवभोळी व जुन्या मताची आहे. नुसत्या मुंबई शहरांत ह्या ज्ञातीचीं बावीस देवळें, दोन धर्मशाळा, व दोन ज्ञातिगृहें आहेत. त्यांत काळा राम, गोरा राम, अनंतवाडींतला राम, धसवाडींतला राम, तसेंच परभादेवी, महालक्ष्मी; नवीवाडींत महेश्वरी देवी वगैरे मंदिरें प्रमुख आहेत. तसेंच बापदेव, अक्कलकोट स्वामी, माणिक प्रभु दादामहाराज, केडगांवचे महाराज, सिद्धारूढ स्वामी व हल्लींचे साईबाबा यांच्यावर भक्तीचा व धनाचा अक्षरशः पाऊस ह्या ज्ञातीनें पाडला आहे.

पाठारे प्रभु स्त्री ही कपड्यांनीं सजवलेली व दागिन्यानें मढविलेली बाहुली ह्या पलिकडे स्त्री जातीला महत्त्व नसे. कुटुंबाबाहेर फक्त लग्नांत व उत्सवांत मिरवतांना परभु स्त्री दिसत असे. पण ती फक्त स्त्रियांच्या कळपांतच! परभु स्त्री पुरुषवर्गांत मिसळतांना दिसणें हें १९३० पर्यंत असंभाव्य होतें. पाठारे प्रभु सोशल समाज ही परभूंची सामाजिक संस्था १८८८ सालीं स्थापन झाली. १८९३ पर्यंत स्त्रियांना समाजांत कधींही पाऊल टाकतां येत नसे. १८९३ सालीं एका खास ठरावान्वयें समाजाच्या बक्षिससमारंभाला राखीव जागीं बसून फक्त पाहण्यास संधी दिली गेली. त्यानंतर १९१३–१४ सालीं ज्युबिलीलाही स्त्रियांना ठराव करूनच आमंत्रण मिळालें. स्त्रियांना समाजाचे सभासद करून घेण्यांत यावें म्हणून कांहीं नवमतवादी तरुणांनीं १९१९ सालापासून १९२२ सालापर्यंत ठराव मांडण्याचा प्रयत्न केला. पण स्त्रिया समाजांत आल्यास 'कोर्टिंग' सुरूं होईल व त्यामुळें नीतिमत्तेला बाध येईल म्हणून बहुमतानें हे ठराव फेटाळण्यांत आले. सहविचाराप्रमाणेंच सहशिक्षणाच्या बाबतींत हीच दृष्टि होती. ज्ञातींतल्या बहुतेक स्त्रिया केमळाबायच्या शाळेंत शिकून गेल्या आहेत. दुपारच्या सुट्टींत शाळेंतल्या मुलींना दरवाजाबाहेर जाण्याची बंदी होती व सकाळीं संध्याकाळीं रामाच्या पहाऱ्यांत शाळेंत अगर घरीं पोंचविण्यांत येत असे. प्रभु ज्ञातींत मिश्रविवाह घडण्याचे प्रसंग अपवादात्मक. लग्न मातापितरांच्या विशेषतः आईच्या इच्छेप्रमाणें जुळविलें जात असे. ही जमात छोटीशी असल्यामुळें प्रत्येक कुटुंबाची आवकजावक प्रत्येक माजघरांत माहित असे. हुंडा देण्याची ऐपत, दागिने, भातकं, मेणमुरूत, रुखवत साडेसोहळा, पांचपाटणी, समजावणी, गौरव वगैरेंची योग्य संभावना ज्या कुटुंबांत होत असेल, त्यांच्या घरच्या मुलीचें याद्वन (जन्मपत्रिका) टेवून घेण्यांत येई. ह्या सर्व चालींपायीं उडालेली प्रभुकुटुंबांची धूळधाण गणपत सोकरजींच्या 'हुंडा' नाटकांत चिरंतन झालेली आहे.

पाठारे प्रभूंचा नाटकाचा षोक हा विख्यात आहे. जुन्या कंपन्यांच्या बहुतेक खेळांना पहिल्या रांगांत परभी पगडी व बुट्टयाचा शालू बहुसंख्येनें उपस्थित असे. प्रभु ज्ञातींत नाटककार व नट बरेच होऊन गेले. पण त्यांचे बहुतेक सर्व कौशल्य ज्ञातीपुरतेंच मर्यादित राहिलें. 'कालिदास एल्फिन्स्टन सोसायटी' ही नाट्यसंस्था सोकर बापूजी त्रिलोकेकरांनीं १८६७ सालीं स्थापन केली; पहिलें संगीत नाटक 'शाकुंतल' रंगभूमीवर आणून अण्णा किर्लोस्करांचें ज्येष्ठत्व मिळविलें. त्यानंतर ... गणपतराव सोकरजींच्या 'हुंडा' नाटकाचा. हा प्रयोग प्रथमप्रथम फक्त प्रभुज्ञातीसाठींच खास खुला असे! पुढें ह्या नाटकांत वर्णिलेल्या प्र...

ज्ञातीच्या चालीरीती व बोली भाषा कालांतरानें लुप्त झाल्यानंतर ह्या नाटकाचे झालेले प्रयोग सर्व लोकांच्या मनरंजनासाठीं मुक्त करण्यात आले. त्यानंतरचा मान खंडेराव सदाशिव नाना मोरोजी त्रिलोकेकर यांचा. ह्यांचें 'चंद्रराव मोऱ्यांची तारा' हें नाटक त्यांच्याच शिवनाट्य समाजानें रंगभूमीवर आणलें. श्री. विनायक आत्माराम जयकर ह्यांचा 'मावशीचा मोरू' पाठारे प्रभु लिटररी अमेच्युअर्स यांनीं बसविला. श्री. खंडेराव देसाई यांनींही आपल्या 'स्टार ड्रॅमेटिक अमेच्युअर्स' द्वारें बराच काळ रंगभूमीची संगीत सेवा केली. त्यानंतर आणखी कांहीं उत्साही तरुणांनीं 'चित्तरंजन नाट्य समाज' स्थापन केला. ह्या सर्व प्रमुख प्रयत्नांत पाठारे प्रभु स्त्रियांना आपलें नाट्यकौशल्य दाखविण्यास बंदी होती. फक्त १९३० सालीं सं. चरखानाद ह्या नाटकांत छोट्या मुलींनीं कामें केल्याची अफवा आहे! हल्लीं तुरळक होणाऱ्या नाट्यप्रयोगांत मात्र स्त्रियांचीं कामें स्त्रियाच करतात.

महाराष्ट्रशारदेच्या दरबारीं इतर कांहीं परभू साहित्यिकांनीं आपापले अल्पस्वल्प प्रयत्न रुजूं केलेले आढळतात. इंग्रजी काव्याचे जनक वीरप्रभु लेफ्टनंट कर्नल कान्होबा रणछोडदास कीर्तिकर, 'रामकवी' रामराव बाळकृष्ण कीर्तिकर, स्वागतगीतप्रवीण सुमन्तलाल व्ही. डी. वगैरे नांवें प्रभु ज्ञातींत सुपरिचित आहेत. श्री. सुंदरराव वैद्य ह्यांनीं तर आपल्या अष्टपैलुत्वानें आपलें नांव ज्ञातीबाहेरही अमर केलें आहे. त्यांची हिंदु मिशनरी सोसायटी, नागरी लिपीचें शुद्धीकरण, वैदिक विवाह पद्धती, सुलभ साक्षरता प्रचार, सूक्ष्मौषधी, तांदळाच्या दाण्यावरील भगवान कृष्ण व वैद्य ब्रदर्स प्रेस ह्या संस्था व कार्ये प्रसिद्ध आहेत. ज्ञातीचीं दोन मासिकें प्रभु-प्रभात व प्रभु-तरुण १९२३ सालापासून तों आजतागायत ज्ञातीचा मासिक परामर्ष बिनधोकपणें घेत असतात.

प्रभु ज्ञातीच्या गौरवास हातभार लावणारे चित्रकला-धुरंधर महादेवराव व त्यांची कन्या अंबिका, तसेंच गोरक्षकर व आगासकर ह्यांच्यासारखे कलावंत, तसेंच जुने छायाचित्रकार कीर्तिकर व नवीन खारचे जयकर ह्यांचींही नांवें व कृति आंतरराष्ट्रीय जगतांत झळकलीं आहेत. एक हजार पाकक्रियांची जननी लक्ष्मीबाई धुरंधर व चित्रकला-प्रधान लक्ष्मीबाई ह्यांनीही त्या कलांत आपलें ध्रुवस्थान निश्चित केलेलें आहे.

पाठारे प्रभु ज्ञातीला शरीरकष्टांचें फार वावडें. ज्ञाती बांधवांनीं व्यायाम करून आरोग्य सुधारावें म्हणून समाजामध्यें अशा संस्था स्थापन करण्याबाबतचे ठराव बहुमतानें फेटाळण्यांत आले. ज्या एक-दोन व्यायामशाळा खाजगी प्रयत्नांनीं स्थापन झाल्या, त्या सभासदांच्या अभावीं लवकरच बंद पडल्या. क्रिकेट हॉकी वगैरे मैदानी खेळांत प्रभु यंग क्रिकेटर्स व प्रभु जॉली क्लब वगैरे संस्थांनीं वारंवार प्रयत्न केले. पण योग्य उत्तेजनाच्या अभावीं त्यांना नेहमीं पहिल्याच डावांत मार खावा लागे. सर्व प्रकारच्या बैठ्या खेळांत व कलांत मात्र त्यांनीं उच्च प्रावीण्य मिळविलें आहे. स्त्रियांनीं पाकशास्त्रांत व रांगोळींत तसेंच भरत व विणकामांत; तर पुरुषांनीं पत्त्यांच्या डावांत व कॅरमच्या खेळांत आंतरज्ञातीय श्रेष्ठत्व टिकविलें आहे.

प्रभु ज्ञातीचा इतिहास अनेक छोट्या मोठ्या लोकांनीं लिहिला असला, तरी पूर्वीच्या लोकांच्या आडनांव न लावण्याच्या घातुक संवयीमुळें भाऊ रसूल, नारायण दिनानाथजी, लक्ष्मण हरिश्चंद्रजी, पांडुरंग बळिभद्र, धाकजी दादाजी वगैरे मुंबईच्या कोनाकोपऱ्यांशीं संबंधित असलेले थोर पुरुष कोणत्या प्रभू-कुलांचे श्रेष्ठी आहेत ह्याबद्दल ज्ञातींतही अजून संशयकल्लोळ आहे! ह्यापासून धडा घ्यावा म्हणून गेल्या व चालू पिढींत अनंत सेन रामदत्त मोठाभाई धाकलजी नवलकर सारखीं पंचरंगीं नांवें ज्ञातिवृत्तांत झळकतात. त्यामुळें प्रभुज्ञातीच्या भावी इतिहासकाराचा व कुलवृत्तांतकाराचाच मार्ग सोपा झाला आहे!

• • •





**खूण!**

"कुठें राहतां आपण?
सांगा ठळकशी खूण"
"अन्यविक्री सामानाचें
आहे खालतीं दुकान
आणि वरतीं प्रसिद्ध
आहे 'प्रसूती सदन'!"

— शान्ताराम आठवले




—अनंत काणेकर

मुंबईच्या आसपास समुद्रकाठीं वरळी, दांडा, वेसावें वगैरे जीं कोळ्यांचीं खेडीं आहेत त्यांत रहाणारे बहुतेक कोळी स्वतःला 'सोन-कोळी' म्हणवतात. मुंबईजवळच ठाण्याकडे किंवा थळ, करंजें वगैरे कुलाबा जिल्ह्यांतल्या गांवीं मासेमारी करणारे कोळीहि सोनकोळीच आहेत. सोनकोळी म्हणजे सोन्यासारखे उत्तम कोळी! कुणी म्हणतात, सोनकोळी हे खरोखर सोमकोळी. दर पौर्णिमेला चंद्राला दिवटी दाखवण्याची चाल सोनकोळ्यांत आहे. महादेव-कोळी, डोंगरकोळी वगैरे डोंगरांत किंवा जंगलांत रहाणाऱ्या ज्या कोळी जमाती आहेत, त्यांच्या मानानें मासेमारीचा व्यवसाय करणारे मुंबईच्या आसपासचे कोळी स्त्रीपुरुष रंगानेंहि अधिक उजळ दिसतात, म्हणूनहि कदाचित् त्यांना सोनकोळी हें नांव पडलें असावें.

तुम्ही मूळचे कुठले म्हणून विचारलें, तेव्हां एक वृद्ध मला म्हणाले, आमचा मूळ पुरुष काश्यप! दुसरे एक म्हणाले, अचिन्त्य. जेजुरीचा खंडोबा आणि कार्ल्याची एकवीरा देवी हीं सोनकोळ्यांचीं मुख्य दैवतें आहेत, आणि वर्षांतून एकदोनदां तरी शेंकडों कोळी कुटुंबें एकवीरेच्या किंवा खंडोबाच्या दर्शनाला जातात. तेव्हां हे मूळचे डोंगर कोळीच असावेत.

मुंबईतले एक वृद्ध कोळी गृहस्थ मला म्हणाले, शिवाजी महाराजांचा शत्रू जावळीचा चंद्रराव मोरे यानें महाबळेश्वरच्या आसपासच्या डोंगरांतल्या कोळ्यांची एकदां अमानुष कत्तल केली; तेव्हां बरींच कोळी कुटुंबें समुद्रकिनाऱ्याकडे पळालीं. दुसऱ्या एका जाणत्या कोळी गृहस्थांच्या मतें, दोन अडीच हजार वर्षांपूर्वी ग्रीकांनाहि माहीत असलेलें कुलाबा जिल्ह्यांतलें त्या काळांतलें प्रख्यात बंदर चेऊल–चंपावती हें सोनकोळ्यांचें मूलस्थान. तिथून ते ठाणें, मुंबई, दांडा, वेसावें किंवा थळ, वर्सोली, करंजें वगैरे ठिकाणीं चारपांचशें वर्षांपूर्वी दुष्काळ पडला तेव्हां पोटापाण्यासाठीं गेले. सोनकोळी जमातीचा मुख्य भगत चेऊलजवळच वर्सोली येथें असतो आणि दांडा, वेसावें वगैरे गांवांतले बरेच सोनकोळी स्वतःला थळकर म्हणवतात. प्रत्येक गांवांत गांवकर आणि थळकर असे दोन प्रकारचे सोनकोळी आढळतात.

दांडा किंवा वेसाव्यासारख्या कोळ्यांच्या गांवांत पहिल्यांदाच जाणाऱ्याला तिथले वास, तिथलीं दृश्यें, तिथले आवाज, सर्वच कांहीं वैशिष्ट्यपूर्ण वाटेल. अनेक प्रकारच्या माशांच्या हिंवस वासांनीं त्याचें डोकें गरगरूं लागेल. घरांच्या मागें किंवा पुढें किंवा गांवांतल्या मोकळ्या जागीं लांब लांब जाळीं सुकत पडलेलीं त्याला दिसतील. समुद्रकाठीं किंवा घरामागल्या खुल्या अंगणांत उभ्या आडव्या बांबूंच्या लांबच लांब रांगा आणि त्यांच्यावर सुकत घातलेल्या बोंबलांचे किंवा वाघटांचे शेंकडों हात लांबीचे हारच हार दिसतील. माशांच्या ढीगाकडे तृप्त झालेलीं मांजरें नुसतीं पहात बसलेलीं आढळतील! रात्रीं समुद्रावर जाळीं ओढायला गेलेल्या होड्या परत आलेल्या असतात, त्यावेळचें किनाऱ्यावरचें दृश्य पहाण्यासारखें असतें. डोलकाठीला उतरवलेली शिडें बांधलीं आहेत, अशा शेंपन्नास होड्या बंदरांत आलेल्या असतात. सबंध किनारा बायका, मुलें, पुरुषांनीं गजबजलेला असतो. लाल 'सुर्का' किंवा लंगोट्या लावलेले होडीवरले तगडे कोळी पुरुष जाळ्यांतले मासे किनाऱ्यावरल्या वाळूवर ओतीत असतात. रुपेरी, तांबड्या, पिवळ्या माशांचे ढीगच्या ढीग किनाराभर पडलेले असतात. कोळी बायका त्या ढिगाजवळ बसून लहान मोठे, निरनिराळ्या प्रकारचे मासे वेगळे करीत असतात. दोरखंड लावलेलीं माशांनीं जड झालेलीं 'पाणकी' बांबूला बांधून दोघे दोघे कोळी खांद्यावरून नेत असतात.

कोळी स्त्रियांच्या उजव्या मनगटावरला 'वाळा' म्हटल्यास दागिना आहे, म्हटल्यास शस्त्रहि आहे. अक्षरांचीं कुलुपें असतात तसा चांदीच्या लांबट वजनदार गोळ्याला चांदीचें कडें लावावें तसा हा वाळा दिसतो. एखाद्याच्या कपाळांत कोळणीनें हा हाणला तर त्याचा कपाळमोक्षच व्हायचा. विवाहित कोळी स्त्री उजव्या हातांत फक्त हा वाळा वापरते; डाव्या हातांत तिच्या बांगड्या असतात. उजव्या हातांतल्या बांगड्या समुद्रावर गेलेल्या पतीच्या रक्षणासाठीं म्हणून तिनें समुद्रदेवाला अर्पण केलेल्या असतात. ताणून घट्ट मारलेला कांसोटा आणि खांद्यावर घेतलेला 'फडका' हें कोळी स्त्रीच्या वेषभूषेचें एक वैशिष्ट्य आहे. प्राचीन आर्यांच्या वेषभूषेंतल्या 'उत्तरीय'चाच कोळणींचा हा फडका अवशेष असावा म्हणतात. कोळी समाजांत स्त्रीचें स्थान पुरुषाच्या बरोबरीचेंच काय, पण कांकणभर वरचेंच आहे असे म्हटलें पाहिजे. कोळी पुरुष एकएक दोनदोन दिवस किंवा रात्रीं समुद्रावर खपून मासे घेऊन किनाऱ्याशीं आला कीं त्याचें काम संपलें. निरनिराळे मासे वेगळे करणें, टोपली डोक्यावर घेऊन बाजारांत जाणें, विकून पैसे करणें, परत येतांना घरांत काय हवें नको तें विकत आणणें हा सगळा कारभार त्याची बायकोच करीत असते. चार चार होड्यांचे मालक असलेल्या, प्रत्येक होडीवर नऊ नऊ माणसें कामाला ठेवणाऱ्या आणि हजारों रुपयांचा व्यवहार करणाऱ्या लाखव्याची बायकोदेखील सोन्यामोत्यांचे दागिने अंगावर घालून डोक्यावर माशांची टोपली घेऊन बाजारांत ते नेऊन विकायला बसण्यांत कमीपणा समजत नाहीं.

कोळी जातींत आतां शिक्षणाचा प्रसार होत आहे, शहरांशीं संबंध ज्यास्त येतो आहे तसंतसा स्त्रीपुरुषांच्या वेषभूषेंत, केशरचनेंत आणि चालीरीतींतहि फरक पडतो आहे. कोंगट्याच्या 'गांठ्या'च्या जागीं, सोन्याच्या मासोळी ऐवजीं बायका मोत्याचीं कुडीं वापरूं लागल्या आहेत. हातांत 'वाळ्या' ऐवजीं सोन्या-मोत्याच्या






बांगड्या दिसूं लागल्या आहेत. केशरचनाहि आधुनिक होऊं लागली आहे. डोक्यावर माशाच्या टोपल्या वाहूनहि बहुतेक कोळी स्त्रियांना विपुल केस कसे असतात याचें पांढरपेशा स्त्रियांना आश्चर्य वाटतें. पण बंगाली आणि केरळ'तल्या स्त्रियांचेहि केस भरदार आणि विपुल असतात; आणि त्यांच्या आहारांतहि माशांना महत्त्वाचें स्थान असतें. या गोष्टींचा उल्लेख करावासा वाटतो. कोळी पुरुषाच्याहि कपड्यालत्त्यांत फरक पडत आहे. कोळी पुरुषाचा पोशाख म्हणजे त्याचा लाल 'सुर्का' किंवा लंगोटी. ढुंगण उघडेंच असतें आणि सुर्क्याचें एक टोंक पुढें रुंद पसरून सोडलेलें असतें. थंडी वाऱ्यांत कोपरीसारखें कुडतें घालायचें, आणि वेळप्रसंगीं कानटोपीसारखी नाखव्याची लाल टोपी. जुन्या पिढींतले म्हातारे सोडले तर आतां ही टोपी फारशी कुणी वापरीत नाहीं. सोन्याच्या बटनांचा रेशमी शर्ट, शॉर्ट कोट आणि बनातीची काळी टोपी दिसूं लागली आहे. पण वरती उलन कोट, रेशमी शर्ट असला, तरी खालीं ढुंगण उघडें ठेवून आपला तांबडा 'सुर्का' बरेच कोळी पुरुष अजूनहि अभिमानानें वापरतात.

जुन्या काळीं कोळी गांवांत दोन पुढारी असत. एक पाटील आणि दुसरा भगत. पाटलाला पूर्वी न्यायनिवाड्याचे बरेच अधिकार असत. आतां अर्थात् फारसे उरलेले नाहींत. धार्मिक बाबतींचा कारभार भगत पहात असतो. नारळीपोर्णिमा हा कोळ्यांचा मोठा सण. त्यादिवशीं गांवाच्या नारळाची पूजा भगत आपल्या घरीं करतो. पाटील, गांवपंच वगैरे भगताच्या घरीं त्या दिवशीं जातात आणि संध्याकाळीं तिथूनच मिरवणूक निघते. होडी पाण्यांत सोडायचा मुहूर्त भगताला विचारायचा. सुपारी लावून देवाचा कौल मागायचें काम भगतच करतो. देवाला 'अरज' तोच करतो. देव त्याच्या अंगांतहि येतो. कांहीं गांवांत भगतांच्या घरून मात्र पौर्णिमेला खंडोबाची पालखी बाहेर पडते. तर कांहीं गांवांत पौष पौर्णिमेला पडते. देवीच्या देवळांत ती वाजतगाजत जाते आणि भगताच्या घरीं परत येते.

नेहमींचें कोळी जेवण म्हणजे पटणीची भाकरी आणि माशांचं 'आंबाट'. दोन्ही—धान् सारख्याच पातळ असलेली दोन दोन विती रुंदीची खरपूस भाकरी कोळी बायका नुसत्या हातावर करतात. सणानुदींच्या दिवशीं घोळीचें आंबाट होतें आणि भाकरीखेरीज घारगेहि करतात. कोळ्यांच्या दृष्टीनें माशांत मामा घोळ. होळीचा सण म्हणजे कोळ्यांचा मोठा सण. होळीच्या दिवशीं रंगीबेरंगी निशाणें होडीला लावून ते सकाळींच समुद्रावर जातात. त्या दिवशीं घोळ मासा मिळाला म्हणजे चांगला शकून झाला. होडीच्या डाडीला घोळ टांगतात आणि नाचत, गाणीं म्हणत होडी बंदरांत आणतात.

देवदेवतांप्रमाणेंच भुतंखेतं, 'जळांच्या बाया' वगैरेंनाहि कोळी लोकांना शांत करावें लागतें. 'जळांच्या बायां'चा फेरा समुद्रकिनारीं केव्हां केव्हां कुणाला दिसतो. त्यांचीं पावलें कुंकवाचीं दिसतात. हिलाल पेटवून वाजत गाजत त्या फिरत असतात. त्यांच्यासमोर जाऊं नये. कुणी गेला तर त्याला त्या बरोबर घेऊन जातात.

कांहीं बुडून मेलेले 'गिरे' होतात. समुद्राच्या

विशेष जागीं ते असतात. त्यांना जातांयेतां खाणेंपिणें टाकलें पाहिजे. नाहींतर होडीचें ते नुकसान करतात. कांहीं बंदराचे रखवालदार असतात. टांडाबंदराचे भोन्याकाका आणि सोमाकाका असे दोन रखवालदार आहेत. गांवकरी वर्गणी काढून दोघांनाहि एक एक बकरा देतात. कुणाला ताप भरला तर तो उतरण्या-करतां भोन्याकाकाला केव्हां केव्हां विड्या आणि दारूहि नेऊन द्यावी लागते. होडी रंगवल्यावर हरबादेवीला नारळ द्यायचा असतो. नवीन जाळें टाकण्यापूर्वीं त्याची पूजा करावयाची आणि भगतानें दिलेलें तीर्थ त्याच्यावर टाकायचें. जाळ्यावर बोरांच्या झाडाची फांदी ठेवून दूध, अबीर, गुलाल वगैरेंनीं त्याची पूजा करायची.

किनाऱ्याकडल्या गुढगाभर पाण्यापासून तों दूर पंधरावीस मैलांवरल्या खोल समुद्रापर्यंत निरनिराळ्या प्रकारचे मासे पकडायचीं निरनिराळ्या प्रकारचीं जाळीं आहेत आणि निरनिराळ्या प्रकारचीं होडकींहि आहेत. सगळ्यांत मोठी होडी 'होरं' आणि सगळ्यांत मोठें जाळें 'डोल'. हें 'डोल' जाळें तोंडाकडे चांगलें तीन चार वांव लांबरुंद आणि टोंकाकडे अगदीं चिंचोळें असतें. त्याची लांबी चांगली वीस पंचवीस वांव म्हणजे सव्वाशें दीडशें फूट असते.

लहान मोठे सर्व प्रकारचे मासे या डोलींत पकडले जातात. किनाऱ्यापासून दहा पंधरा मैल अंतरावर माडासारखे उंच खांब किंवा 'मेढे' समुद्रांत रांगेनें गाडलेले असतात. पावसाळा सुरू झाल्यावर हे मेढे काढून आणतात. चार महिन्यांनीं मुहूर्त करून ते पुन्हा गाडतात. दोन होड्यांवरून हे प्रचंड मेढे नेऊन उसळत्या समुद्रांत गाडायचे कोळ्याचें मोटें शास्त्र आहे. एका 'होऱ्या'वर नऊ माणसें असतात. त्यांतला एक जेवण करणारा असतो तो 'मध्या'. 'होऱ्या'ला तिखट, मीठ, तेल, पाणी पुरवणारा 'पाणेरा' होडी साफसूफ ठेवणारा 'होरसारी'. मिळालेल्या माशांचे ठराविक प्रमाणांत वांटे करायचे असतात. दसरा दिवाळीच्या सुमारास खूप मासे मरतात. 'धोपाणें'च्या 'धोपाणें' (टोपल्या) मासे मिळतात. तेव्हां वांटे करतांना कुणाला ज्यास्त गेल्यास कुणी पर्वा करीत नाहीं.

'धरण' नांवाचें जाळें क्रिकेट प्रॅक्टिसच्या वेळीं मैदानांत लावतात तसें समुद्रांत लावलेलें असतें. किनाऱ्यावरून एका बाजूनें दहा बारा आणि दुसऱ्या बाजूनें दहा बारा लोकांनीं ओढावयाच्या खूप मोठ्या घेराच्या अर्धवर्तुळाकार जाळ्याला 'पेरा' किंवा 'रांपण' म्हणतात. फर्रकन् परकरा-सारखें पसरणारें जाळें लहानशा होडींतून टाकतात त्याला 'पाग' म्हणतात. लांबलचक तरंगणारें जाळें एका टोंकाला तरंगता दिवा लावून, रात्रीच्या वेळीं समुद्रांत सोडीत सोडीत जाण्याचा प्रकार म्हणजे 'दालीद.' 'शिंपले' 'बल्यांव', 'फलेरी' असे लहान मोठ्या होड्यांचेहि प्रकार पुष्कळ आहेत. होडी शिवाय कंबरेपर्यंत पाण्यांत जाऊन मासे पकडण्याचेहि 'हात घोलव', 'दिवे' वगैरे प्रकार आहेत.

हीं नाना प्रकारचीं जाळीं लोक स्वतः विणतात. पावसाळ्यांत समुद्रावर जायचें नसतें तेव्हां जाळीं विणायचीं, तुटलेलीं दुरुस्त करायचीं, पाण्यांत कुजूं नयेत म्हणून 'चिलरीं'च्या किंवा 'ऐना'च्या सालीच्या 'ओगळां'त सुकवायची वगैरे उद्योग चालतात. हीं यंत्रावर विणतांच येणार नाहींत किंवा पाण्यांत टाकून यंत्रानें ओढतांच येणार ; त्यामुळें यंत्रयुगाचा उपसर्ग लागून विणक किंवा तेलीतांबोळ्यांचा धंदा गेला तसें क होण्याचा संभव दिसत नाहीं. पांच वर्षांपूर्वीं त्यांचे पूर्वज करीत होते, त्याच तशाच जाळ्यांनीं आजचेहि कोळी मा करीत आहेत. मोठे मोठे यंत्रसज्ज 'ट्रॉलर्स' समुद्रावर फिरवून मोटमोठ्या जाळ्यांत म दीग पकडण्याचा धंदा यूरोपमध्यें चालतो, इथेंहि तसे प्रयत्न चालू आहेत. पण म जितकी लहान, उथळ पाण्यांतली किंवा लांतली तितकी अधिक ती चवदार; 'ट्रॉलर्स'ना तर फार खोल पाणी लागतें.

अवर्षणानें किंवा अतिवर्षणानें दाणा पि नाहीं आणि गांवेंच्या गांवें उपासम खाईत तडफडत पडलीं असें केव्हां शेतकऱ्यांचें होतें. तसें कोळ्यांचें कधींच हं संभव नाहीं. सागर अनंत हस्तांनीं काळ देणारा आहे. अगदींच आळशी अ शिवाय कोळी सहसा उपाशी मरणार नाह

औद्योगिक मंदी, जागतिक स्पर्धा व चक्रांत सांपडणाऱ्या पांढरपेशा मध्यमव किंवा दुष्काळाच्या संकटांत पडणाऱ्या शेत वर अनेक वेळां हवालदिल होऊन लांब करून बसण्याचे प्रसंग येतात. त्या म कोळी बराच सुखी आहे. म्हणूनच गांवांत आनंदी, दिलखुलास चेहेरे पु दिसतात. होळीच्या दिवशीं किंवा गौ सणांतच कोळी स्त्री पुरुष नाचतात, गातात नाहीं; माशांनीं जड झालेलें जाळें ओढ कोळी जवान तालावर आणि एक सुरानें नेहे नाना प्रकारच्या 'आंबवण्या' गात असता

'पावलाय् रे देव मल्हारि हैं...












# देशस्थ दांडगा, भाकरीवर सांडगा!

—व्यंकटेश माडगूळकर

दुष्काळांतहि तग धरून राहणाऱ्या कवार-फोडीप्रमाणें, देशस्थ ब्राह्मणांचीं घरें अद्यापहि खेड्याखेड्यांतून जळून न जातां राहिलीं आहेत. खेड्यात शिरलें कीं अनेक घरांतून हें घर वेगळें दिसेल. बांधणीनें, आकारानें. वाड्याचा दरवाजा ओलांडून आंत गेलांत कीं, दारांतली गाय कान वर करून तुमच्याकडे पाहील. जोत्याशीं बांधलेलें तट्टू फुरफुरेल. सोप्यांतच तुम्हांला वाड्याच्या मालकाची बैठक दिसेल. तरट व जेन अंथरून ही बैठक घातलेली असेल. भिंतीला लागून पोटाला वळ्या पडलेला तक्क्या असेल. बाजूला पानाचा सरंजाम असेल. थुंकायचें तस्त असेल.

दर्शनींच, सोप्याच्या हलकड्यांना अडकवून ठेवलेलीं ज्वारीचीं कणसें तुम्ही पाहाल. पाणी घालून अडकवलेला परळ त्या शेजारींच टांगलेला असेल. या कणसांना चिमण्या झोंबत असतील. सोप्याच्या भिंतीवर नाना तस्विरी असतील. पंढरीचा पांडुरंग, प्रपंच-विज्ञान सांगणारा तो चाफळचा बैरागी, रामपंचायतन. हें सगळें तिथें असेल. कपाळावर ठळक कुंकू लावलेली बाई आणि हातांत छत्री घेऊन बसलेला म्हातारा यांच्या मागें पुढें उभी राहिलेलीं पांच सात वेगवेगळ्या वयाचीं मुलेंहि दिसतील.

सोपा ओलांडून माजघरांत जाल, तर तिथल्या अंधारात धान्याचीं पोतीं, कणग्या आढळतील. घडवंचीवर रचलेला अंथरुण-पांघरुणांचा ढीग दिसेल. इथेंच कुठें कोपऱ्यांत देव्हारा असेल. शेपाचलनिवासी व्यंकटेश, विठ्ठल-रखुमाई, जगदंबा, या मूर्तींबरोबरच चांदी-तांब्यांचे टाकहि तिथें असतील.

स्वयंपाकघरांत जाण्यापूर्वी ज्वारी बाजरीच्या भाकरीचा, दुधदुभत्याचा, लसूणकांद्याचा वास तुम्हांला येईल. आंत जाऊन पाहूं म्हणाल, तर लाकडाच्या धुरांत कांहीं काळ तुम्हांला नीट दिसणार नाहीं. या घराची मालकीण सदैव या धुरांत असते आणि पाणरल्या डोळ्यांनीं संसार पहात असते.

अशा या घरांत अनेक माणसें रहातात. पांच पांच, सहा सहा भाऊ, त्यांच्या बायका, पोरें, म्हातारी वडिलधारी माणसें, तालुक्याच्या शाळेंत शिकण्यासाठीं राहिलेलें दूरच्या नातलगाचें एकादें मूल. असा हा प्रचंड धबडगा असतो. सगळीं कर्तुकीला आलीं, मिळवूं लागलीं, तरी एकमेकांपासून दूर रहावें, हा विचार त्यांच्या मनांत येत नाहीं. कधींकधीं एकच कोणी मोठा भाऊ मिळवता असतो आणि त्याच्या पंखाखालीं इतर भावंडें राहिलेलीं असतात. भावजय पाटच्या भावासारखी दिराला सांभाळीत असते. पुष्कळ वेळां या सहा भावांतला एखादा मोकळाच असतो. त्याला स्वतःचीं बायकामुलें नसतात. हा चुपता न बोलतां या घरांत राबत असतो. धबडगा चाललेला असतो. पाहुणे रावळे येत जात असतात. वहिणी, आतेबहिणी, मामेबहिणी यांची वर्दळ सुरूच असते. सहा भावांच्या सहा बायकांपैकीं कुणीतरी एक सदैव बाजल्यावर असते. चौकटीवरच्या कडींत शिंक्याचा डहाळा वरचेवर खोवला जातो. बाजलें विणतां विणतां मांगाचें भुस्कट पडतें!

देशस्थाच्या घरांत शिरतांच कांहीं वस्तू दिसतात. शीख जमातीचे जसे पांच 'क' कार आहेत, तसे तक्क्या, तस्त, तरट, तट्टू, आणि तगादा! हे देशस्थांचे पांच 'त' कार आहेत. या वस्तूंचे, या जमातीच्या जीवनांतील महत्त्व वर्णन करण्यापूर्वी एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. देशस्थ ब्राह्मण, या महाराष्ट्रीय ब्राह्मणाच्या पोटजातीमध्यें आणखीहि कांहीं पोट-पोटजाती आहेत. ढोबळ मानानें देशस्थाचे दोन भाग आहेत. एक दे. ऋ. ब्रा. आणि देशस्थ यजुर्वेदी ब्राह्मण. शहरांतून दिसून येणारा देशस्थ-कोकणस्थ हा वाद, खेड्यांत ऋग्वेदी आणि यजुर्वेदी असें रूप घेतो. म्हणजे यजुर्वेदी हा देशस्थांतला कोकणस्थ मानला जातो. रंगानें तो ऋग्वेद्यापेक्षां उजळ असतो, थोडासा धनिकहि असतो. 'ऋग्वेद्याची पालखी आणि यजुर्वेद्याची घोडकी बरोबर' अशी म्हण ऐकूं येते. अर्थ असा कीं, पालखीपदस्थ ऋग्वेद्यापाशीं जेवढें धन असतें, तेवढें धन यजुर्वेद्याच्या एखाद्या घोडकीपाशीं असतें. थोडक्यांत असें कीं देशस्थ ब्राह्मण म्हणतांच नुसत्यें करून ऋग्वेदी ब्राह्मणच डोळ्यांसमोर उभा राहतो. दक्षिण महाराष्ट्र हा तर देशस्थ ऋग्वेदीप्रधान आहे, असें मानलें जातें.

तक्क्या हा नाहीं म्हटलें तरी देशस्थाच्या आळशी स्वभावाला धरून आहे. सर्वसाधारण देशस्थ हा आळशी किंवा आरामप्रिय आहे. दोन्ही वेळां जेवणें आणि निवांत रहाणें या आवडीमुळें त्याला फारशी महत्त्वाकांक्षा नसते. पंचक्रोशींत नांव मिळविलें कीं तो कृतकृत्य होतो. पंचक्रोशीच्या बाहेर पडणें, म्हणजे परदेशगमनाला जाणें अशी त्याची समजूत. हा धोका घ्यायला तो तयार नसतो. नोकरी करणें ही गोष्ट त्याला कमीपणाची वाटते. कनिष्ठ नोकरी. मध्यम व्यापार आणि उत्तम शेती (कुळानें पिकवलेली!) या सूत्रावर त्याची ठाम श्रद्धा असते! बापजाद्यांनीं मिळवलेली हरळीची मुळी खुडून खुडून खावी, जुन्या वाड्याचा खण पडला कीं त्रिकाड अल्लिकडच्या खणांत अडगून पडलेल्या खाणाचे वासे सर्पणाला उपयोगीं आणावेत आणि स्वस्थ चित्तानें कालक्रमणा करावी, यांतच त्याला सुख नांवाची वस्तु मिळते!

तस्ताविषयीं अधिक कांहीं सांगण्याची जरूर नाहीं. तपकीर, विडी, तंबाखू हीं देशस्थाचीं किरकोळ व्यसनें आहेत, पण पान खाणें हा त्याचा स्थायीभाव आहे. आणि पिंक टाकण्यासाठीं उंबऱ्याबाहेर जाण्याची तसदी नको, म्हणून हें तस्त हाताशीं! देशस्थाचा गालिचा म्हणजे तरट. (लोकर लावून केलेलें 'जेन' हा पाठभेदहि आहे) पासोडी इतक्याच महत्त्वाचें






हें वस्त्र देशस्थाच्या घरांत अवश्य दिसेल. बाळंतिणीच्या खोलीला आडपडदा घालण्यापासून तों छत घालण्यापर्यंत आणि मालकाच्या बैठकीपासून चिरंजीवांच्या शाळेंतील बस्करापर्यंत, गोगर्ती उसवून बनवलेली ही वस्तु सर्वत्र दिसेल तागाचें हें वल्कल नेसून देशस्थाचा उदारपणा वावरत असतो !

तट्टू म्हणजे देशस्थाच्या तरवारबहादुरीची जुनीपुराणी कहाणी. स्वारीशिकारीऐवजीं त्याचा उपयोग आतां रानांतली वैरण घरीं आणण्यासाठीं केला जातो. मुली सासरी धाडणें आणि मुली माहेरीं आणणें हीं कामेंहि (येष्टी सुरू होण्यापूर्वी) या जनावराला करावी लागत ! कोर्टाच्या तारखा या गुणी जनावराच्या पाठीवरूनच केल्या जातात. अलिअलिकडे मोटारी फिरूं लागल्यापासून, हा एक तकार गळतो कीं काय असें वाटूं लागलें आहे.

राहतां राहिला तगादा. ती तर देशस्थाची खास मिराशी सावकाराचा, सरकाराचा, किरकोळ देणेकऱ्याचा, कुणा ना कुणाचा तगादा दारांत असल्याशिवाय देशस्थाला अन्न गोड लागत नाहीं. सांपत्तिक स्थिति पुष्कळशी शेतीवर अवलंबून. त्यामुळें रोख पैशाची चणचण त्याला नित्य. वेहिशेबी कारभार, प्रचंड कुटुंब, मोठेपणाची हौस, खर्चिक स्वभाव, याची भर. त्यामुळें ब्रह्मस्व नाहीं असा देशस्थ विरळा !

हे पांच तकार कोणा आधुनिक धर्मसंस्थापकानें घालून दिले याचा पत्ता नाहीं. पण ते कडवेपणानें पाळले जातात. एकूण देशस्थ हा तसा धार्मिक जास्तच. धर्मभीरूहि म्हणतां येईल. महाराष्ट्रांत दे. ऋग्वेदी ब्राह्मणांची वसाहत भारतीय युद्धापूर्वीच झालेली आहे. दाशरथी रामाच्यापूर्वी अगस्तीनें ती केली. तेव्हांपासून ही जात वैदिक संस्कृतीशीं चिकटून राहिली आहे. पांडित्य हा एक ह्या जातीचा विशेष गुण मानला जातो. छत्तिसाव्या वर्षी 'सिद्धांत शिरोमणी' ग्रंथ लिहिणारा भास्कराचार्य दे. ऋ. ब्राह्मणच होता. ग्रंथलाघवकर्ता गणेश दैवज्ञ, 'सिद्धांत सम्राट' कर्ता जगन्नाथ जोशी या प्रकांड पंडितांचीं नांवें म्हणजे या समाजाचें भूषण आहे. काशीसारख्या दूरच्या देशीं जाऊन स्थायिक झालेली भट्ट, मौनि आणि शेष हीं घराणींहि प्रखर पांडित्याबद्दल प्रख्यात होतीं. धर्मशास्त्र, गणित, ज्योतिष, इत्यादि अनेक शास्त्रांवर ग्रंथनिर्मिती करण्याचें जड काम या मंडळींनीं केलें. निर्णयसिंधुकार कमलाकर भट्ट, 'व्यवहारमयूख' कर्ता नीलकंटभट्ट, विद्यानिधि कविंद्र, नागोजीभट्ट, शिवरायांना राज्याभिषेक करणारे गागाभट्ट हे देशस्थ ब्राह्मणच होते.

इतिहासाचीं पानें चाळलीं तर या जमातींत कांहीं मुत्सद्दी आणि तल्वारबहाद्दरहि दिसतात. मुसलमानी अंमलांतील आकण्णा मादण्णा ही जोडी प्रसिद्ध आहे. दादोजी कोंडदेवांनीं शिवरायांना मर्दुमकीबरोबरच जमीनमहसुलाचें शिक्षणहि दिलें. हा पापभीरु पण निश्चयी ब्राह्मण देशस्थ ऋग्वेदीच होता. शिवशाहींत या जातींतील अनेक मंडळी अनेक जागीं होती. कृष्णाजी भास्कर, राघो बल्लाळ अत्रे, शिवाजीचा चरित्रकार अनंत सभासद, गोपिनाथ बोकील ही मंडळी या [illegible] गाजत होती.

शिवरायाच्या अष्टप्रधानांतील एक वगळला तर बाकी सगळे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होते. वीस वीस हजार मोगली फौजेला खडे चारणारा मोरोपंत पिंगळे, शिवाजी दिल्ली दरबारीं गेला असतां, त्याच्यामागें राज्यकारभार हिमतीनें सांभाळणारा आण्णाजी दत्तो, न्यायनीतिकुशल ज्ञाते असे रघुनाथपंत हणमंते, राजारामाचा सल्लागार प्रल्हाद निराजी, संभाजीराजाच्या वधानंतर औरंगजेबाची डुकरमुसंडी अडविणारा रामचंद्र नीळकंठ आमात्य, माधवरावच्या वेळीं कर्नाटकच्या युद्धांत बहुत पराक्रम करून, चौघडा, जरीपटका व साहेब नौबत संपादणारा विठ्ठल शिवदेव, पेशवाईतील थोर

राजकारणी सखारामबापू बोकील, रामशास्त्री प्रभुणे, सेनापति तात्या टोपे अशीं मातब्बर माणसें पुढें होणें नाहींत!

या जातींतील संत-कवींची परंपरा ही तर अजोड आहे. भारुडें लिहिणारा एकनाथ, रोज दबूची शाई खर्चून ग्रंथनिर्मिती करणारा प्रचंड कवि दासोपंत, रसाळ वाणीचा मुक्तेश्वर, समर्थ रामदास, संतचरित्रें गाणारे महिपतिबोवा ताहराबादकर, ही संतमंडळी सुखी असोत!

देशस्थ ब्राह्मण हा सर्वसामान्यपणें रंगानें काळा आहे. त्याचें कल्चर ज्या अग्रीकल्चरशीं संबंधित आहे, त्यांतील जमिनीनें हा रंग त्याला दिला आहे. पिंडानें तो थोराड आहे. या जातींतील स्त्रियांत शंभरांत देखणी स्त्री दहा हजारांत एखादी! लग्नाच्या मुली पहायला जा, एखादी दर्शनी हुंडी. नाहीं तर एरवीं सगळे क्रॉस्ड चेक्स्. ते वठवण्यापायीं बाप वठून जातो.

रुमाल, अंगरखा, धोतर हा देशस्थाचा वेष आहे. बंडी आतां दिसत नाहीं, परवांपरवांपर्यंत ती होती. तिची जागा गोल अंगरख्यानें घेतली आहे. रंग, अंग आणि भाषा यामुळें देशस्थ हा इतरांपासून वेगळा काढणें जेव्हां मुष्किल होतें, तेव्हां त्याच्या धोतराच्या नेसणपद्धती-वरूनच त्याला ओळखतां येतें वयानुसार तांबुस रंग आलेलें धोतर, त्याचा पुढचा सोगा, मागचा रुंद कासोटा हें पहातांच, कुणब्याप्रमाणें दिस-णारा हा ब्राह्मण ब्राह्मणच आहे याची खात्री पटते. वेषांतील या फरकामुळेंच त्यांच्या बायकाहि चटकन् ओळखूं येतात. नऊवारी नेसण, कानांतील मोत्याच्या कुड्या, पायांतल्या बोटांतील जोडवीं, थोडेसें वेगळें बोलणें या खुणा. मात्र पुष्कळ वेळां, अर्थात् खेड्यांत, सोनार आणि ब्राह्मण हे चटकन् एकमेकापासून वेगळे काढणें कठीण जातें.

सातारा सोलापूर भागांतील देशस्थ तिखट खाणारा प्राणी आहे. नाकातोंडांतून पाणी यावें इतकें तिखट रोजच्या जेवणांत असल्याशिवाय त्यांच्या तोंडाचा पिकटा जात नाहीं. या संदर्भात एक सांगोवांगीची कथा सांगण्यासारखी आहे. देशस्थाच्या कुटुंबांत पाहुणे आलेले गृहस्थ जेवीत होते. जेवणांतील तिखटामुळें ते घामा-घूम झाले होते. आमटीच्या भुरक्यासरशीं त्यांच्या शेंडीचे केस तरारत होते. अशांत यजमानांनीं विचारलें,

"आपण किती भाऊ म्हणालांत?"

डोळ्याला आलेलें पाणी धोतराच्या सोग्यानें पुशीत पाहुणे म्हणाले,

"यांतून जगलों तर चार, नाहींतर तीनच!"

देशस्थासंबंधीं Thay are great eaters but not skilful cooks असें म्हटलें जातें. देशस्थ माणूस हा चांगला खवय्या असतो हें अमान्य करतां येणार नाहीं. तोंडभर बोलणें आणि तोंडभर खाणें यांत त्याला कमीपणा वाटत नाहीं. पण या जातींत पाककौशल्य नाहीं हा मुद्दा स्त्रीवर्ग मान्य करणार नाहीं. हजार पाक-क्रियांची ग्रंथकर्ती ही देशस्थाच्या जातींत जन्माला आलेली नाहीं हें खरें. तथापि पुरणपोळ्या, कटाची आमटी, रव्याचे लाडू हे पदार्थ दे. स्त्रियांकडून इतर लोकांनीं शिकावेत!

देशस्थ हा दिलेर माणूस आहे. त्याच्या थोराड अंगलटीप्रमाणेंच त्याचें अंतःकरणहि थोराड आहे. कुठल्याहि गोष्टीचा अर्थ लावतांना तो डोक्याऐवजीं अंतःकरणानें त्याचा अर्थ लावतो. ती भाषा त्याला लवकर समजते. जिवाला जीव देण्याची नुसती भाषा बोलून तो गप्प रहात नाहीं, तर तसें करतो. अंथरूण पाहून पाय पसरण्याची हिशेबी बुद्धि त्याच्यापाशीं नाहीं. भास्कराचार्यांच्या या जातभाईनीं त्यांच्या गणितांतून व्यवहारी अपूर्णांकच तेवढा उचलला आहे. त्याचा भाग कधींच तुटत नाहीं!

आतां काळ बदलला आहे. ब्राह्मणाची खेड्यां-तील शेतीभाती नाहींशी होत आहे. वतनें केव्हांच जप्त झालीं आहेत. दोन पिढ्यांपासूनच खेडीं सोडून मंडळी शहरांत येऊं लागलीं आहेत.

एकत्र राहणारे सहा भाऊ आतां शहरांत आले आहेत. त्यांचा वेष बदललेला आहे. एकत्र रहाणें त्यांना नोकरीधंद्यामुळें शक्य नाहीं; आणि या काळांत तें परवडतहि नाहीं. ही जात आतां सर्वत्र विखुरलेली दिसेल. धंदा कुठला करावा आणि कुठला नाहीं, याची निवड आतां त्यानें सोडलेली दिसेल. खानावळींत जा, मेणचटलें जानवें घालणारा एखादा कुळकर्णी वाढपी तिथें तुम्हांला आढळेल. दारांत रोज खाकी कपडे घालून येणाऱ्या पोस्टमनला कधीं नांव विचार-लेत, तर तो कुळकर्णी निघेल! एवढेंच काय पण ट्रकड्रायव्हर, बस कंडक्टर अशा अनेक जागीं हीं मंडळी काम करतांना आढळतील.




—बाळ मेढेकर

प्रभु रामचंद्र, भगवान् श्रीकृष्ण, सहस्रार्जुन, पंडुपुत्र सहदेव या साक्षात देवांशीं दिवाणबहादुर हसबनीस, लेखणीबहादुर टिपणीस, मेजर खळे आणि नाझर सुळे या मंडळींचें अगदीं जवळचें म्हणजे रक्ताचें नातें आहे हें न पटणारें सत्य आहे! या समस्त चांद्रसेनीय कायस्थ प्रभु समाजाच्या प्राचीन इतिहासाचें पान असें हें हुकुमाचें आहे. त्याचें असें झालें–

युगें लोटलीं त्या गोष्टीला आतां. हैहय कुलोत्पन्न चंद्रसेन राजा हा आपल्या सुस्वरूप राणी, गंगा हिच्या समवेत अयोध्या नगरींत सुखानें राज्य करीत होता. दिवसामागून दिवस कसे निघून गेले हें त्यांना कळलें देखील नाहीं हें ठीक. पण राणीला दिवस गेल्याचें त्या सर्व पृथ्वी निःक्षत्रिय करण्याची राक्षसी महत्त्वाकांक्षा धरणाऱ्या परशुरामाला कसें समजलें हें समजत नाहीं! "धर क्षत्रिय कीं चीर" असा सपाटा चालवत मजल दरमजल गांठीत परशुराम अयोध्येला केव्हां आला हें चंद्रसेनाच्या ध्यानांत मोक्षपदीं गेल्यानंतर आलें. कार्यसिद्धी होण्याला फक्त राणी हातीं येण्याचा अवकाश, अशा आनंदांत परशुराम गाफील आहे, ही संधी साधून भयभीत झालेल्या त्या राणीनें गर्भरक्षणार्थ आपल्या बापाचा गुरु महामुनी दाल्भ्य याच्या आश्रमाचा आश्रय घेण्यासाठीं कूच केलें. पण राणीच्या या गनिमी काव्याचें परशुरामापुढें काय होय? परशु पाजवत अयोध्येंतून त्यानें जो आगे फलांग टाकला, तो ऋषींच्या आश्रमांत. आणि मुनिवर्यांजवळ गंगेची मागणी केली.

मुनिवर्य हुशार खरेच! त्यांनीं एकीकडे पाद्यपूजा वगैरे करून परशुरामाचें मागणें एकदमांत कबूल केलें. मात्र प्रसंगावधान साधून राणीचा गर्भ रामापासून मागून घेतला. परशुरामानें संतुष्ट होऊन त्या गर्भाचें छेदन न करतां आशीर्वाद दिला, "हा कायस्थ (कायेंत गर्भांस असणारा) पुत्र सद्गुण-संपन्न धर्मशील होईल व त्याचे वंशजही त्याप्रमाणेंच होतील." इथपर्यंत ठीक. पण जिथें सर्व राज्यच नाहींसें झालें, तिथें या राजपुत्राचा (नांवाच्या. जसें बाबाराजे!) चरितार्थ कसा चालावा असा प्रश्न त्या योगीश्रेष्ठाला पडला व त्यानें तसें परशुरामाला भीत भीत कां होईना, पण बोलूनही दाखविलें. परशुरामानें प्रसन्न होऊन वराला पुरवणी जोडली—"असि जीवि मसी जीवि!" अर्थ हा कीं, युद्धप्रसंगीं तलवारीच्या जोरावर आणि अन्य प्रसंगीं (मसी=शाई) लेखन-विद्येच्या आधारें उपजीविका करावी! राजा चंद्रसेनाच्या वंशजावर श्री परशुरामाचा हा पूर्ण प्रसादच होय.

राणी गंगेला न चुकतां मुलगा झाला. त्याचें नांव सोम. योग्य कालीं चि. सोमाचें श्रीचे कृपेकरून चित्रगुप्ताच्या सौ. कां. कन्येशीं विवाह झाला आणि होतां होतां त्या दांपत्याला एकामागून एक असे चार मुलगे झाले. पैकीं विश्वनाथ नामें मुलगा सकलगुणसंपन्न निघाला म्हणून त्यास त्याची प्रजा महासमर्थ महाप्रभु म्हणूं लागली आणि त्याचे वंशज प्रभु म्हणून ओळखले जाऊं लागले.

परशुरामानें केलेल्या उपकाराची फेड म्हणून त्याची आई, अयोनिसंभवा श्री आदिमायावतार रेणुका (एकवीरा) हीस ही चांद्रसेनीय प्रभु जमात आपलें कुलदैवत म्हणून मानूं लागली. (माहिती:—सध्यां देवीचें स्थान कार्ल्याजवळ एका सह्याद्रीच्या शिखरावर आहे. सर्वांनीं प्रसादाला जावें!)

महापद्मानंद राजा राज्यावर असेपर्यंत चांद्रसेनीयांची भरभराट झाली. मात्र पुढें पद्मानंद गादीवर बसला आणि इतर प्रजाजनाबरोबर या प्रभु जमातीचें उत्तर हिंदुस्थानांतील आसनही ढळलें. राजाच्या जुलमांना कंटाळून ही मंडळी परशुरामाच्या वराच्या जोरावर मिळविलेलीं आपलीं वतनें व जहागिऱ्या सोडून यःपलायन करती झाली व खालीं माळव्यांतील (मेवाडांतील) समर्थ राजांच्या आश्रयास राहिली. तिथेंही "तलवार आणि लेखणी" या मुद्दलावर पुनरपि जहागिऱ्या, वतनें, अधिकार इ. संपादून सुखानें कालक्रमणा करूं लागलीं.

पुढें मुसलमान राजांनीं प्रजेचा छळ करण्यांत राजा पद्मानंदाला चीत केलें व इतर हिंदूंप्रमाणें प्रभु लोकांचाही अक्षरशः "हायदोस हुल्ला" केला. मंडळी आणखी खालीं दक्षिणेकडे पळत सुटली. पैकीं अधिकाधिक तांडे सह्याद्रीच्या आसपासच्या मावळच्या डोंगराळ प्रदेशांत वस्ती करून राहिले. काहींनीं विजापूरच्या आदिलशहाकडे आणि जंजिऱ्याच्या हबशाकडे चाकरीसाठीं अर्ज केले व जे "सिलेक्ट' झाले, ते तिथें संसार मांडून कायमचे राहिले. मराठेशाहींत हे प्रभु संयुक्त महाराष्ट्रभर पसरले व लढाई-लिखाणाच्या मानाच्या नोकऱ्या करून आणि वतनें संपादून स्थायिक झाले, ते कायमचे.

हा प्रभु जातीचा अर्वाचीन इतिहास देखील उज्ज्वल आहे. छत्रपति शिवरायाच्या काळीं त्रिकट गड आणि जंजिरे लढवून आणि प्रमुख भुरंवशाचीं कामें करून "असि जीवि मसि जीवि"चा वर खुद्द परशुरामाच्या अपेक्षेबाहेर खरा केला. बाजीप्रभु आणि मुरारबाजी या योध्यांनीं केलेले अतुल पराक्रम आणि बाळाजी आवजींनीं गाजविलेली चिटणिसी वर्णायाला केशव सितारामांचीच लेखणी हवी. तें येऱ्या (म्हणजे या) गबाळ्याचें काम नव्हे.

गोविंदाग्रजांच्या वाणीचें ज्याला पाणी मिळालें, प्रो. माणिकरावांच्या मर्दानी तेजानें ज्याला अंकुर फुटला, तो या जमातीचा आधुनिक वृक्ष चिंतामणराव देशमुखांच्या प्रखर व्यक्तिमत्त्वामुळें फोफावत आहे. आणि गुप्ते-फडकरादि खेळाडूंच्या नैपुण्यानें बहरत आहे. या प्रभु लोकांच्या शूरपणाची आणि लेखनकलेची खात्री त्या धूर्त इंग्रजाला सुद्धां पूर्ण



अनुक्रमणिका

झाली होती. राज्याचीं महसूल आणि न्याय खातीं कायस्थांच्या मदतीशिवाय चालविणें त्याला अशक्य होऊन बसलें होतें. (असें सांगतात कीं एकदां ठाणें सेशन कोर्टातील एका दाव्यांत न्याय देणारा, न्याय घेणारे, अलिकडले पलिकडले हशील, हशीलांचे वकील आणि समन्सें-वॉरंटें फिरवणारा बेलिफ—सर्वत्र कायस्थ!) तेव्हां त्याच्या आमदानींत कायस्थप्रभु नांवारूपाला चढावा हें उचितच होय.

पन्नास वर्षांपूर्वी कीट्स (Keats) नांवाच्या इंग्रजानें केलेल्या मोजणींत कायस्थ परभांचीं डोकीं हजारांनीं भरलीं. सांप्रत संख्या लाखांनीं असावी असा अंदाज आहे. "अष्टपुत्रा सौभाग्यवती भव" हा ब्राह्मणाचा नवोढेला शिष्टाचारार्थ बहाल होणारा आशीर्वाद हमखास फलद्रूप करण्याचें वरदान कायस्थालाच मिळा-ल्याचें दिसतें! तो जात्या परिस्थितीचा गुलाम! परिस्थितीच्या फटकाऱ्यांना गुलामाच्या (अरे गुलामा!) या कामीं आळा घालतां येऊं नये असा अनुभव आहे. उलट जो जो परिस्थिति बिकट व्हावी तो तो "जो जो रे बाळा" जोरांत हा नियम!

माळव्यांत असतांना अधिकार, कृति व स्थितीवरून यांना जीं उपनांवें पडलीं, तींच आतां चालू आहेत. जे संस्थानिक होते त्यांना ठाकूर म्हणत. त्यांचे आतां ठाकरे झाले. दळपतींना नांवाची लाज वाटूं लागली आणि ते स्वतःला दळवी म्हणवूं लागले. "क्षत्रिय राणे" म्हणून हांक मारण्यास अवघड वाटूं लागलें म्हणून त्यांनीं कृपावंत होऊन "ए राणे" हांकेस "ओ" साथ दिली. चौबळ, रणदिवे, प्रधान, गडकरी, हीं उपनांवें मंडळींना त्या त्या पेशावरून पडलीं. मात्र तुंगरे, नागले, दिघे, शृंगारपुरे इ. भारदस्त नांवें कशीं प्रचारांत आलीं याचा शोध अजून लागला नाहीं.

कायस्थांचें व्यक्तित्व (Personality) झाकलें जाऊं नये. कायस्थी तोंडाची ठेवण आणि अंगयष्टि अनादिकालापासून विशिष्ट अशी आहे. अयोध्या नगरींत वाढलेला कौसल्येचा राम वनवासी कुठेंही भटकला, तरी 'तोच तो" म्हणून ओळखण्याची त्या अडाण्या शबरीला देखील अडचण पडली नाहीं. तसाच A. G. च्या ऑफिसांतला मधुकर बाबा दिवे प्रभु म्हणून लीलेनें डोळ्यांत भरावा. ते त्याचे कुरळे कुरळे केस, डोक्यावर बनातीची काळी टोपी आणि चांफेकळी नाकावर सोनेरी चष्म्याची फ्रेम, बंद कॉलरचा परटाकडला खमीस, त्यावर पिवळ्या पपलीनचा अमेरिकन कटचा कोट, खालीं बकिंगहॅम मिल्चें बरीं धुतलेलें पंखी काठाचें धोतर आणि पायांत 'ग्राम सुंदर!' कायस्थी स्त्रीवर्गाविषयीं या बाबतींत पौराणिक व ऐतिहासिक पुरावे तितकेसे उपलब्ध नाहींत ही खेदाची गोष्ट होय!-मात्र खात्री अशी कीं सध्याची "कायस्थाची पोर" अनादिकाला-पासून तशाच कांहींतरी चटकदार टोपण नांवानें ओळखली जात आली असावी. कायस्थांच्या मुली चुणचुणीतपणा आणि रेखीव बांध्यामुळें डोळ्यांत भराव्या हा सिद्धांत आहे. आज इतके आंतरजातीय विवाह झाले, आणि होत आहेत (फार समाधानाची गोष्ट आहे ही!) त्यांत मुलीकडील बाजू मोठ्या प्रमाणांत (सरासरीनें) "कायस्थाच्या पोरींनेंच" सांभा-ळली हा तिच्या गुणांचा दाखला आहे!

कायस्थ हा परंपरेचा उपासक आहे. एकच धंदा पिढ्यान् पिढ्या चालवावा कायस्थांनींच. पणजोबा वकील म्हणून पणतु वकील! मात्र










वकिलीचा धंदा करावा कायस्थांनींच. म्हणूनच सातान्याच्या छत्रपतींनीं "आम्हांला पदभ्रष्ट कां केलें?" याचा जाब विचारण्यासाठीं रंगो बापूजींनाच लंडनला पाठविलें व त्या निष्णात वकिलानें परदेशीं चौदा वर्षे राहून आपल्या इशिलाचें हातीं घेतलेलें कार्य सिद्धीस नेलें.

आपल्या स्वतःच्या अगर कुटुंबियांच्या प्रकृतीच्या काळजीपेक्षां तो वडिलार्जित मोडक्या बंदुकींची आणि गंजलेल्या तलवारींची जोपासना अधिक कोशिषीनें करील आणि लग्नसमारंभाच्या वेळीं "कन्याहरण न व्हावें" म्हणून त्या तलवारी वधूवरांवर कांपत्या हातानें धरील; भेदरल्या नजरेनें अंतराळीं नेम धरून बंदुकीचे बार काढील.

कदाचित् या "परंपरेच्या" पिशाच्यामुळेंच तो परिस्थितीचा गुलाम रहात आला. आतां लढाऊंना स्कोप राहिला नाहीं, तेव्हां परशुरामाच्या वरदानांतील तो संबंधित भाग दुसरीकडे कुठें आणावा का नाहीं? पण ही गोष्ट उमगली तर तो कायस्थ कसला! ती "लढवय्यी" वृत्ति त्यानें बाजारहाट करण्यांत, "दोन कोनब्या पुरव" म्हणून कोळणींना हटकण्यांत खर्च करावी ना!

कायस्थीं उत्सव–उत्साह इतरत्र नाहीं! अठराविश्वें दारिद्र्यानें भरलेल्या चंद्रमौळी घराला दिवाळसणांत उजाळा द्यावा कायस्थानेंच! दिवाळी महिन्याकाठीं आली तरी खाजा-खिम्याचे कानवले (करंज्या) आणि कोनवी-मटणाचे पुलावे हे झालेच पाहिजेत हा दंडक! आणि जांवई दिवाळसणास आला म्हणजे सासरा, जावयाच्या तोंडाला पाणी यावें म्हणून स्वतःच्या तोंडचें पाणी पळेपर्यंत धडपडेल! मग हुंड्याची जखम वाहूं लागली अगर मुलीच्या पहिल्या वहिल्या (म्हणजे पुढील ८।९ पैकीं एक) बाळंतपणाची आठवण बोचूं लागली तरी बेहेत्तर! उत्साह इतका कीं घरांत वडिलांच्या श्राद्धाची गडबड आहे का, नातवाचें बारसें साजरें होत आहे हें शेजाऱ्याला देखील समजूं नये! ब्राह्मणानें गडगंज शिधा मिळवावा कायस्थाकडेच! लग्न मुंजीचा थाट साधावा त्यांनींच! कल्याणला राम मारुती उत्सव असो, शिरडीला गुरुपौर्णिमा उगवो, किंवा पालीच्या पिराचा उरूस भरो–निघाला हा सुनालेकींच्या लटांबरासह उत्सवाची शोभा वाढवावयाला!

काय कायस्थाचें नशीब पहा! परशुरामाचा वर त्याच्या कक्षेबाहेरील गोष्टींबाबत प्रखर शाप ठरला. ह्या कलियुगांत ह्या चंद्रसेनाच्या वंशजांनीं कशी उपजिविका करावी याचा त्या अंतर्ज्ञानी महामुनीला सुद्धां त्या वेळीं विचार सुचूं नये हें न सुटणारें गणित आहे. चमकणें राहूं दे, पण किती कायस्थांनीं व्यापारी क्षेत्रांत साधासुधा प्रकाश पाडला? "इंडो" बामवाले कर्णिक अगर अमृत फार्मसीवाले प्रधान हेच यांचे टाटा–बिर्ला! एकदां आमच्या दूरच्या मामांनीं जबर धमक दाखवून अनंत शिवाजींचें अनुकरण करण्याचें डोक्यांत घेतलें आणि टोप्यांचा व्यापार सुरू केला—आणि शेवटीं व्हायचें तें झालें! गिऱ्हाइकानेंच दुकानदाराला टोपी घालावी असा उलटा फांसा पडला! मिठागराचा धंदा करणारा कायस्थ आगरांतील मिठाच्या वाढीविषयीं गाफिल राहील. पण खारींतील बोय मासा अधिकाधिक बाळसें करें धरील ही काळजी रात्रंदिवस वाहील!—अशी कायस्थाची वृत्ती!

अशा रितीनें परिस्थितीनें गांजलेल्या कायस्थाकडे शक्यतों सहानुभूतिपूर्वक पहावें, त्याच्याशीं दोन गोड शब्द बोलावे, त्याला तेलाच्या कंपनींत चांगली नोकरी पाहून द्यावी–ही बात नाहीं! त्याचें पवित्र क्षेत्र जें "ठाणें गांव" यांच्या चेष्टेचा विषय! आतां कुणातरी माथेफिरू इंग्रजानें दुसऱ्याच्या डोक्याची फाजील काळजी वाहून ठाण्याला दवाखाना काढावा यांत कायस्थाचें कुठें चुकलें?

पुणें महाराष्ट्राचें नाक आहे, कबूल. मग ठाण्याला कानाचा मान द्यायला यांचें तोंड उघडूं नये हा जगावेगळा न्याय. पुनः त्या नाकाला नकटें म्हणण्यापूर्वी कान लांब करावेत ही बुद्धि! जसें कायस्थाच्या "ठाण्याचें" तसें त्याच्या "खाण्या"चें आणि "वाणी"चें! कायस्थांनीं वाल खाल्ले कीं यांच्या पोटांत दुखावें. मात्र वेलणकराचें दुकानांत यांची पहिली ऑर्डर वालाच्या उसळीची. कायस्थाच्या सुक्या मासळीकडे असलेल्या ओढीला अर्थ आहे. "शिकार करून मांस भक्ष करण्याचं" त्याच्या रक्तांत आहे! प्राप्त परिस्थितींत त्या रक्तानें शिकारीची तहान सुका बोंबिल अगर सोड्यावर काढावी हें उचित. 'पवरी'ला कायस्थानें 'बांसरी' म्हटलें कीं हास्यास्पद. बांसरींत काय कमी गोंडसपणा आहे?

पण या क्षुल्लक टीकास्त्रावर कायस्थ दुर्लक्ष करील. कारण त्याचीं वैशिष्ट्यें, त्यांच्या पसरलेल्या जमातीला एकत्र आणणारे लागेबांधे आहेत असा त्याचा दृढ समज आहे.

• • •




—रणजित देसाई

स्थूलमानानें मराठी भाषा बोलणारे ते सर्वच जरी मराठे म्हणून महाराष्ट्राबाहेर ओळखले जात असले, तरी महाराष्ट्रांत क्षत्रिय जमातीलाच हें नामाभिधान प्रामुख्यानें लावण्यांत येतें. ही जात महाराष्ट्रांत बहुसंख्य आहे. मराठा जातीच्या उत्पत्तीबद्दल अनेक कथा सांगितल्या जातात. श्री विष्णूच्या बाहूपासून क्षत्रिय वर्ग निर्माण झाला असें पुराणें सांगतात. नळ राजा व त्याची पत्नी दमयंती यांनाच मराठे आपले मूळपुरुष समजतात. मराठ्यांच्या शहाण्णव कुळी. प्रत्येक कुळीची स्वतंत्र उत्पत्ति. जाधव श्रीकृष्णाचे वंशज समजले जातात; तर शिंदे आपणांस श्रीशंकराचा पुत्र जो शेष त्याचे वंशज समजतात. उज्जैनचा राजा विक्रम, पैठणचा शालिवाहन आणि माळव्याचा राजा भोज ह्या तीन राजघराण्यांतून मराठ्यांच्या शहाण्णव कुळी विस्तार पावल्या. ज्या घराण्यांत शिवछत्रपती जन्मले, तें भोसले घराणें हें ह्याच भोजराजाचे वंशज. सोमवंश सूर्यवंश, शेषवंश, यदुवंश ह्या चार वंशांमध्यें ह्या साऱ्या कुळी सामावलेल्या आहेत.

मराठा जातीमध्यें मराठा व कुणबी अशा दोन मुख्य पोटजाती समजल्या जातात. आज कुणबी व मराठा ह्यांतील भेद करणें जवळ जवळ अशक्य आहे. फरक करावयाचाच झाला तर 'फेटा बांधतो तो मराठा व मुंडासें बांधतो तो कुणबी' एवढाच करतां येईल. पण त्यापेक्षांही समाजरचनेंतून झालेला भेद फार मोठा आहे. जहागीर, इनाम, पाटीलकीसारखीं वतनें भोगणारा एक वर्ग व शेतीवर अवलंबून असणारा दुसरा शेतकरी वर्ग असे दोन मोठे भेद मराठा समाजांत दिसून येतात.

गांवामध्यें मराठा मानानें जगतो, पाटिलकीपासून ते गांवच्या बारा बलुतेदारांपर्यंत तो सत्ता गाजवतो. गांवच्या देवस्थानाचा सरपंच बहुधा हाच असतो देवधर्मावर ह्याची श्रद्धा आहे. मोठ्या भाविकतेनें तो साऱ्या जत्रा करतो. भजन करतो. आयुष्यांत एकदां तरी काशीची नसली तरी पंढरपूरची यात्रा करतो. भाद्रपदाच्या वद्य पक्षांत पितरांना पिंड देऊन संतुष्ट करतो आणि त्यांचा आशीर्वाद घेतो. देवीची पालखी निघाली कीं पालखीखालीं आपलीं मुलें झोपवतो. मंगळवार शुक्रवार जोगवा घालतो. तो जरी सारेच देव पुजत असला, तरी तो शैवच म्हणावा लागेल. भवानी, जतीबा, खंडोबा, मारुती, राम, भैरव, महादेव, मकाई, जानाई, तुकाई हीं त्याचीं प्रमुख दैवतें आहेत. तो तीं मनोभावानें पुजतो.

मराठा सारेच सण साजरे करतो. पण दसरा आणि होळी हे त्याचे मोठे सण. सण कुठलाहि असो. मराठा आपल्या जनावरांना विसरत नाहीं. बैलांना गव्हाचा खिचडा चारला जातो. शिंग्या चढवल्या जातात. बैलावर ह्याचें पोराइतकें प्रेम आहे. बैल–शेतकऱ्यांचा राजा आहे.

खंडेनवमीच्या शस्त्रपूजेनंतर दसरा उजाडतो. मराठ्याचा हा सर्वांत मोठा सण. दसरा जवळ आला कीं गावच्या शिंप्याला उसंत नसते. दसऱ्याला अंगावर नवीन कपडा नसला तर मराठ्याला तें फार लागतें. दसऱ्याच्या दिवशीं तो मोठ्या खुशींत असतो. डोईला फेटा, अंगांत रंगीबेरंगी सदरा आणि तलम धोतर नेसून करकरणाऱ्या पायताणा घालून तो गांवांत मिरवतो. इनामदाराचें घोडें असलें तर तें मखरलें जातें. वाजत गाजत वाड्याच्या दारांत येतांच दारांतच बकरें मारलें जातें; आणि त्याच्या रक्ताचा टिळा घोड्याच्या कपाळीं लावून त्याचा प्रवेश वाड्यांत होतो. दोनप्रहरीं शस्त्रें बाहेर काढलीं जातात आणि सारें गांव सीमोल्लंघनाला बाहेर पडतें. गावाबाहेर आपट्याच्या झाडाची पूजा करून पाटील अथवा इनामदार आपल्या तलवारीनें पान उतरतो. नंतर सारें गांव आपट्याचीं पानें घेऊन माघारीं फिरतें. जगदंबेला सोनें ठेवून साऱ्या गांवाला तो सोनें वाटतो आणि प्रत्येकाचें कल्याण, भरभराट इच्छितो. दसऱ्याच्या दिवशीं गाड्यांच्या शर्यती होतात, कुस्त्यांचे फड होतात. जंगल जवळ असलें तर सारें गांव शिकारीला बाहेर पडतें.

मराठ्यांचा पिढीजात धंदा लढण्याचा. भारतीय सैन्यामध्यें ही परंपरा आजही मराठ्यांनीं राखली आहे. व्हिक्टोरिया क्रॉस, आणि भारतीय मानचिन्हें ह्यानें भूषवलीं आहेत. संस्थानें असतांना कांहीं मराठे सरकारदरबारीं नोकरीला राहिले. पण आज बहुसंख्य मराठ्यांचा प्रमुख धंदा शेती आहे. शेतींत तो जेवढा रमतो, तेवढा तो नोकरींत अथवा अन्य व्यवसायांत तो रमत नाहीं.

छत्रपती शिवजीमहाराजांनीं महाराष्ट्रांत मराठ्यांचें राज्य स्थापलें. पण शेंकडों वर्षें राज्यसत्ता हातीं असूनही मराठा अडाणीच राहिला. 'लिवनं वाचनं काम बामनाचं' ही कल्पनाही याला कारणीभूत असेल. बहुसंख्य असूनही शिक्षणाच्या बाबतींत अल्पसंख्य असलेल्या ह्या मराठ्याकडे महात्मा जोतीबा फुल्यांसारख्या समाजसुधारकाचें लक्ष गेलें आणि त्यांनीं ह्या बहुजनसमाजासाठीं सत्यशोधक समाज स्थापला. त्या सत्यशोधक समाजाचा पुरस्कार कोल्हापूरच्या छत्रपती शाहूमहाराजांनीं केला. आणि मराठा समाजाला चालना मिळाली. बडोदा, ग्वाल्हेर, कोल्हापूर ह्या तीन संस्थानांतून मराठा समाजासाठीं भरपूर प्रयत्न करण्यांत आला. पण चांगल्याबरोबर कांहीं वाईटही गोष्टी त्यांतून निघाल्या. कोल्हापूरच्या छत्रपतींच्या चळवळीचा पाया ब्राह्मणद्वेषावर उभारला गेला. आज साऱ्या मराठा समाजांत हा द्वेष पसरला आहे. पण अद्याप तो खोलवर रुजलेला नाहीं. पण पन्नास वर्षांच्या ह्या प्रचारांतून मराठ्याच्या मनानें "बामनी कावा"ची दहशत घेतली आहे.

रंगानें सांवळा, बांध्यानें मजबूत, गोल चेहऱ्याचा सरळ नाकाचा हा मराठा संसारामध्यें






परंपरा आहे. एकत्र कुटुंबाचा भोक्ता आहे. बायको मिळाली कीं वेगळें व्हायचें त्याला जमत नाहीं. घरांत आईची व बाहेर बापाची सत्ता असते. घर मोठें आणि अपुरी शेती असली तर वांटण्यांपेक्षां तो मुंबईची वाट धरतो. गिरणींत वर्षानुवर्षें राबतो. मिळेल तो पैसा घरीं पाठवतो आणि भरपूर पैसा जमला कीं, एखादें शेत खरीदतो. शेत मिळालें कीं त्याचें मन मुंबईला रमत नाहीं. उजळ माथ्यानें घरीं येऊन तो शेतांत राबूं लागतो.

मराठा स्वभावानें मानी, तोंडानें फटकळ आणि मनानें मोकळा आहे. आपणहून तो दुसऱ्यांत मिसळत नाहीं. सणवार, लग्नप्रसंगांत हा सढळ हातानें पैसा खर्च करतो. त्यामुळें पैशाची चणचण सदैव त्याला भासते. पण आपलें दारिद्र्य तो उघडें करूं शकत नाहीं. त्यासाठीं त्याला कित्येक वेळीं कर्जबाजारी व्हावें लागतें. त्या कर्जफेडीसाठीं व शेत वांचवण्यासाठीं त्याला अफाट कष्ट उठवावे लागतात. पण कष्टांना हार जाणारी ही जात नाहीं. पैशाचा लोभ नसणें हा ह्या जातीचा मोठा दुर्गुण आहे. पैसा बाळगून रहाणारा मराठा क्वचितच. पण औदार्याला कमतरता नाहीं. घरीं कांहीं असो नसो, पाहुण्याचें स्वागत करण्यांत तो नेहमीं पुढें असतो. फटकळ स्वभावामुळें मराठा मित्र मिळणें कठीण!

बाई आणि बाटलीबद्दल ह्याची झालेली अपकीर्ति फार मोठी आहे. स्वभावानें हा थोडा रंगेल आहे हें खरें. ह्या स्वभावामुळें तो नसत्या फंदांत पडतो. एखादी बाई ठेवतो. त्यांत त्याला वावगें वाटत नाहीं. मराठ्याची रखेली ही अखेरपर्यंत रखेलीच रहावे. तो तिला पत्नीचा मान देत नाहीं. द्विभार्याप्रतिबंधक कायदा होण्याच्या आधींदेखील दोन लग्नें केल्याचीं उदाहरणें थोडीं सांपडलींच तर त्यांचीं कारणें बहुधा वंशवृद्धी हेंच आहे. लेकावळ्याची एक स्वतंत्र जात निर्माण होण्याएवढा हा मराठ्याचा बाहेरख्यालीपणा गाजलेला आहे! हें जरी खरें असलें तरी त्याचें आपल्या बायकोमुलांवर फार प्रेम आहे. त्याच्या मनांत पत्नीबद्दल जिव्हाळा आहे. आपल्याबरोबर खांद्याला खांदा लावून शेतांत ती राबते ह्याची जाणीव त्याला आहे. वर्षाकाठीं तिच्या अंगावर गुंजभर तरी सोनें चढावें ही त्याची इच्छा आहे.

सुगी झाली, मळण्या संपल्या कीं हा मराठा राजा असतो. त्याला 'राव' चढतो. बैलांच्या टकरा, बैलगाड्यांच्या शर्यती, कुस्त्यांचे फड सुरू होतात. त्याचें भान हरपतें. त्याचीं सारीं स्वप्नें जागीं होतात आणि एक दिवस चावडींत तो पाटलाला म्हणतो,

"पाटील, आवंदा घर बांधावं म्हणतो"

"बांधकी मग"

"पन सिमीट मिळतया कुठ!"

"सिमीट!"

"घर बांधायच ते एकदाच नव्हं? मग बांधू की भक्कम"

अशा अनेक हवाया गांवांत उठतात. गांवांत त्यांची गल्लत होते. कपडे, देव, जत्रा करण्यांत तो घामाघूम होतो. आणि त्याचें घर पुढच्या वर्षांवर ढकललें जातें! पैसा गेलेल्याचें त्याला दुःख नाहीं. दोन वेळेला सुखासमाधानानें जेवायला मिळालें तरी तो त्यांत समाधानी आहे. परिस्थिति बिकट आली तरी त्याचा धीर सुटत नाहीं. डोईवर असलेल्या कर्जाची त्याला दिक्कत नाहीं. मनगटांतल्या जोरावर त्याचा पुरा विश्वास आहे. सुखांत ढिला पडणारा हा मराठा संकटांत तावून उठतो. आत्महत्त्या ह्याला ठाऊक नाहीं.

मराठा जसा रंगेल आहे, तसाच रंगेलही आहे. साऱ्या जत्रा हा मोठ्या थाटानें करतो. सजवलेल्या गाड्या कासऱ्यानें हात कांचेपर्यंत पळवतो. कुस्तीच्या फडांत उसळलेल्या दंगलीला घरचें भांडण समजून हिरीरीनें तो त्यांत पडतो. तमाशाच्या फडांत लावणी मनाला आली तर कमरेचा कसा आणि डोईचा फेटा दौलतजादा करून तो कनातीच्या बाहेर पडतो. जोतीबाची आसनकाठी नाचवत तो जोतीबाला फेर धरतो. घरांत लग्नकार्य झालें कीं भवानीला किंवा भैरोला बकरें बळी देऊन तो गोंधळ घालतो. खोटें बोलायचें ह्याला जमत नाहीं. खंडोबाचा वचक त्याच्या मनावर आहे. केवढाही निधड्या छातीचा मराठा असो, खंडोबाचा भंडारा शिवून खोटी शपथ करण्याला तो धजणार नाहीं.

हा मराठा निधड्या छातीचा म्हणून इतिहासांत गाजलेला आहे. तो गुण आजही टिकून आहे. ह्याच्या दृष्टीनें मृत्यूला फार थोडी किंमत आहे. पुरांत सांपडलेल्या माणसाला वांचवण्यासाठीं हा भरपुरांत बिनदिक्कतपणें उडी घेतो. नुसती काठी घेऊन बैलाच्या टकरेंत वावरतो. भररात्रीं पडलेला दरोडा परतवण्यासाठीं गांवकऱ्यांच्या खांद्याला खांदा लावून तो उभा रहातो. देशभक्तींतही हा मागें नाहीं. बेचाळीस सालीं सातारा जिल्ह्यानें गाजवलेली चळवळ बरींच वर्षें विसरली जाणार नाहीं. जात्याच भावनाविवश असलेला हा मराठा 'हरहर महादेव' आणि 'शिवाजी महाराज की जय' ह्या घोषणांनीं सहज चेतवला जातो. देवाखालोखाल शिवाजी राजाला तो मानतो. तें त्याचें आराध्यदैवत आहे.

जसा हा मराठा स्वभावानें अडदांड आहे, तशीच त्याची भाषा आहे. चार वाक्याला शिवी घातल्याखेरीज त्याला बरें वाटत नाहीं. च्यायला

ातल्याखेरीज मापेला नेटं येत नाहीं. ाठीच; पण त्यांत देखील अनेक पदर. वारकाव्यानें पद्दाणाऱ्यालाच जाणवतो. वर कायवी, नायवी तर घाटामाथ्याखालीं : 'देऊस,' 'जाऊला,' 'करुला' हे ारानावरचा मराठा 'इच मन' म्हणेल, ाज्ञरचा 'च्यायला' म्हणेल, तर 'यायली' म्हणून मोकळा होईल. ाळा पण आशय तोच. ग्वाल्हेरच्या ा तब्येत विचारली तर 'काय सांगूं ाशीच्या मारे आफत मचली' म्हणतो. ा मराठ्याला एखादा पत्ता विचारला ो, 'सूधे चालले जा आणि नुक्कडावर ा.'

ाषेंत सूक्ष्म फरक आहे, तसाच स्वभा- ाहे. देशावरचा मराठा जरा अधिक चार शिव्यांवर जर भागलें नाहीं तर ावी देण्याच्या भरीस न पडतां अस्तन्या !! देशरानापेक्षां कोकणचा मराठा अधिक भक्कम आहे! एकदां दिलेली हां न उच्चारतां तो तोंडाचा पट्टा ल्वूं शकतो! पण हातघाईवर सहसा ां. तो कोर्टांत जातो. न्यायदानावर त्याचा अधिक विश्वास आहे! कुस्त्या, शर्यती-पेक्षां ह्याला शिकार अधिक प्रिय आहे. नेम-बाजींत, शिकारींत हा मराठा कुशल आहे.

ह्याच्या जेवणांत तिखटाचें प्रमाण अधिक आहे. जितक्या आवडीनें हा पुलाव झोडतो तितक्याच आवडीनें हा ज्वारीची भाकरी, कांदा आणि हिरव्या मिरच्यांचा खरडा खातो. मटणाची आवड फार. मळणी असो नाहीं तर जत्रा असो, बकरें पडल्याखेरीज ह्याचें मन थंड होत नाहीं! सणासुदीला छटाक घेतली तर कुणाला त्यांत वावगें दिसत नाहीं. पानाची चंची ही त्याची सोबतीण आहे. पानतंबाखूचा बार भरल्याखेरीज ह्याला चैन पडत नाहीं.

मराठा अडाणी आहे, पण मानी आहे. मनानें मोकळा आहे, पण तोंडानें फटकळ आहे. निधड्या छातीचा आहे, पण भावना-विवश आहे, कष्टाळू आहे पण अल्पसंतुष्ट आहे. संतापाच्या भरांत केलेल्या चुका, तोडलेलीं माणसें मनांत असूनही तो मानी स्वभावामुळें जोडूं शकत नाहीं. ह्याचमुळें मराठ्याची चालत आलेली फुटीर वृत्ती आजही अबाधित आहे. तीव्र जातिभेद असतांही हा बहुसंख्य मराठा समाज एकमनानें उभा राहूं शकत नाहीं. नव्या पिढींत शिक्षणाचा प्रसार चालू आहे. मराठे आपल्या इतिहासाचा अभिमान कधींही विसरूं शकत नाहींत. पण नवीन परिस्थिति न ओळखण्या-इतके ते मूढही बनणार नाहींत. जातीनें शूर, मनानें मोकळा आणि वृत्तीनें मानी असलेल्या ह्या मराठ्याला आज गरज आहे ती त्याला समजून घेऊन हाताशीं धरुन नेणाऱ्या कणखर नेत्याची. मराठ्याचा भूतकाळ उज्ज्वल आहे, भविष्यकाळाची त्याला आशा आहे.

• • •



रम्भपरा आहे. एकत्र कुटुंबाचा भोक्ता आहे. बायको मिळाली कीं वेगळें व्हायचें त्याला जमत नाहीं. घरांत आईची व बाहेर बापाची सत्ता असते. घर मोठें आणि अपुरी शेती असली तर वांटण्यांपेक्षां तो मुंबईची वाट धरतो. गिरणींत वर्षानुवर्षें राबतो. मिळेल तो पैसा घरीं पाठवतो आणि भरपूर पैसा जमला कीं, एखादें शेत खरीदतो. शेत मिळालें कीं त्याचें मन मुंबईला रमत नाहीं. उजळ माथ्यानें घरीं येऊन तो शेतांत राबूं लागतो.

मराठा स्वभावानें मानी, तोंडानें फटकळ आणि मनानें मोकळा आहे. आपणहून तो दुसऱ्यांत मिसळत नाहीं. सणवार, लग्नप्रसंगांत हा सढळ हातानें पैसा खर्च करतो. त्यामुळें पैशाची चणचण सदैव त्याला भासते. पण आपलें दारिद्र्य तो उघडें करूं शकत नाहीं. त्यासाठीं त्याला कित्येक वेळीं कर्जबाजारी व्हावें लागतें. त्या कर्जफेडीसाठीं व शेत वांचवण्यासाठीं त्याला अफाट कष्ट उठवावे लागतात. पण कष्टांना हार जाणारी ही जात नाहीं. पैशाचा लोभ नसणें हा ह्या जातीचा मोठा दुर्गुण आहे. पैसा बाळगून रहाणारा मराठा क्वचितच. पण औदार्याला कमतरता नाहीं. घरीं कांहीं असो नसो, पाहुण्याचें स्वागत करण्यांत तो नेहमीं पुढें असतो. फटकळ स्वभावामुळें मराठा मित्र मिळणें कठीण!

बाई आणि बाटलीबद्दल ह्याची झालेली अपकीर्ति फार मोठी आहे. स्वभावानें हा थोडा रंगेल आहे हें खरें. ह्या स्वभावामुळें तो नसत्या फंदांत पडतो. एखादी बाई ठेवतो. त्यांत त्याला वावगें वाटत नाहीं. मराठ्याची रखेली ही अखेरपर्यंत रखेलीच रहते. तो तिला पत्नीचा मान देत नाहीं. द्विभार्याप्रतिबंधक कायदा होण्याच्या आधींदेखील दोन लग्नें केल्याचीं उदाहरणें थोडीं सांपडतीलच तर त्यांचीं कारणें बहुधा वंशवृद्धी हेंच आहे. लेकावळ्याची एक स्वतंत्र जात निर्माण होण्याएवढा हा मराठ्याचा बाहेरख्यालीपणा गाजलेला आहे! हें जरी खरें असलें तरी त्याचें आपल्या बायकोमुलांवर फार प्रेम आहे. त्याच्या मनांत पत्नीबद्दल जिव्हाळा आहे. आपल्याबरोबर खांद्याला खांदा लावून शेतांत ती राबते ह्याची जाणीव त्याला आहे. वर्षाकाठीं तिच्या अंगावर गुंजभर तरी सोनें चढावें ही त्याची इच्छा आहे.

सुगी झाली, मळण्या संपल्या कीं हा मराठा राजा असतो. त्याला 'राव' चढतो. बैलांच्या टकरा, बैलगाड्यांच्या शर्यती, कुस्त्यांचे फड सुरू होतात. त्याचें भान हरपतें. त्याचीं सारीं स्वप्नें जागीं होतात आणि एक दिवस चावडींत तो पाटलाला म्हणतो,

"पाटील, आवंदा घर बांधावं म्हणतो"

"बांधकी मग"

"पन सिमीट मिळतया कुठ?"

"सिमीट!"

"घर बांधायच ते एकदाच नव्हं? मग बांधू की भक्कम"

अशा अनेक हवाया गांवांत उठतात. गांवांत त्यांची गल्लत होते. कपडे, देव, जत्रा करण्यांत तो घामाघूम होतो. आणि त्याचें घर पुढच्या वर्षांवर ढकललें जातें! पैसा गेलेल्याचें त्याला दुःख नाहीं. दोन वेळेला सुखासमाधानानें जेवायला मिळालें तरी तो त्यांत समाधानी आहे. परिस्थिति विकट आली तरी त्याचा धीर सुटत नाहीं. डोईवर असलेल्या कर्जाची त्याला दिक्कत नाहीं. मनगटांतल्या जोरावर त्याचा पुरा विश्वास आहे. सुखांत ढिला पडणारा हा मराठा संकटांत तावून उठतो. आत्महत्त्या ह्याला ठाऊक नाहीं.

मराठा जसा रगेल आहे, तसाच रंगेलही आहे. साऱ्या जत्रा हा मोठ्या थाटानें करतो. सजवलेल्या गाड्या कासऱ्यानें हात कांचेपर्यंत पळवतो. कुस्तीच्या फडांत उसळलेल्या दंगलीला घरचें भांडण समजून हिरीरीनें तो त्यांत पडतो. तमाशाच्या फडांत लावणी मनाला आली तर कमरेचा कसा आणि डोईचा फेटा दौलतजादा करून तो कनातीच्या बाहेर पडतो. जोतीबाची आसनकाठी नाचवत तो जोतीबाला फेर धरतो. घरांत लग्नकार्य झालें कीं भवानीला किंवा भैरोला बकरें बळी देऊन तो गोंधळ घालतो. खोटें बोलायचें ह्याला जमत नाहीं. खडोबाचा वचक त्याच्या मनावर आहे. केवढाही निधड्या छातीचा मराठा असो, खंडोबाचा भंडारा शिवून खोटी शपथ करण्याला तो धजणार नाहीं.

हा मराठा निधड्या छातीचा म्हणून इतिहासांत गाजलेला आहे. तो गुण आजही टिकून आहे. ह्याच्या दृष्टीनें मृत्यूला फार थोडी किंमत आहे. पुरांत सांपडलेल्या माणसाला वांचवण्यासाठीं हा भरपुरांत बिनदिक्कतपणें उडी घेतो. नुसती काठी घेऊन बैलाच्या टकरेंत वावरतो. भररात्रीं पडलेला दरोडा परतवण्यासाठीं गांवकऱ्यांच्या खांद्याला खांदा लावून तो उभा रहातो. देशभक्तींतही हा मागें नाहीं. बेचाळीस सालीं सातारा जिल्ह्यानें गाजवलेली चळवळ बरींच वर्षें विसरली जाणार नाहीं. जात्याच भावनाविवश असलेला हा मराठा 'हरहर महादेव' आणि 'शिवाजी महाराज की जय' ह्या घोषणांनीं सहज चेतवला जातो. देवाखालोखाल शिवाजी राजाला तो मानतो. तें त्याचें आराध्यदैवत आहे.

जसा हा मराठा स्वभावानें अडदांड आहे, तशीच त्याची भाषा आहे. चार वाक्याला शिवी घातल्याखेरीज त्याला बरें वाटत नाहीं. च्यायला

वयला घातल्याखेरीज मापेला नेटे येत नाहीं. भाषा मराठीच; पण त्यांत देखील अनेक पदर. तो बदल वारकाव्यानें पहाणाऱ्यालाच जाणवतो. देशरानावर कावश्री, नायवी तर घाटामाथ्याखालीं 'कळूस,' 'देऊस,' 'जाऊला,' 'करला' हे फार. देशरानावरचा मराठा 'इच मन' म्हणेल, घाटमाथ्यावरचा 'च्यायला' म्हणेल, तर कोकणचा 'वायली' म्हणून मोकळा होईल. डौल, वेगळा पण आशय तोच. ग्वाल्हेरच्या मराठ्याला तब्येत विचारली तर 'काय सांगूं जनाब, खाशीच्या मारे आफत मचली' म्हणतो. नागपूरच्या मराठ्याला एखादा पत्ता विचारला तर सांगतो, 'सूधे चालले जा आणि नुक्कडावर मुरकुन जा.'

जसा भाषेंत सूक्ष्म फरक आहे, तसाच स्वभावांतही आहे. देशावरचा मराठा जरा अधिक संतापी. चार शिव्यांवर जर भागलें नाहीं तर पांचवी शिवी देण्याच्या भरीस न पडतां अस्तन्या सावडतो! देशरानापेक्षां कोकणचा मराठा शब्दांमध्यें अधिक भक्कम आहे! एकदां दिलेली शिवी पुन्हां न उचारतां तो तोंडाचा पट्टा अखंड चालवूं शकतो! पण हातघाईवर सहसा येत नाहीं. तो कोर्टांत जातो. न्यायदानावर त्याचा अधिक विश्वास आहे! कुस्त्या, शर्यती-पेक्षां ह्याला शिकार अधिक प्रिय आहे. नेमबाजींत, शिकारींत हा मराठा कुशल आहे.

ह्याच्या जेवणांत तिखटाचें प्रमाण अधिक आहे. जितक्या आवडीनें हा पुलावा झोडतो तितक्याच आवडीनें हा ज्वारीची भाकरी, कांदा आणि हिरव्या मिरच्यांचा खरडा खातो. मटणाची आवड फार. मळणी असो नाहीं तर जत्रा असो, बकरें पडल्याखेरीज ह्याचें मन थंड होत नाहीं! सणासुदीला छटाक घेतली तर कुणाला त्यांत वावगें दिसत नाहीं. पानाची चंची ही त्याची सोबतीण आहे. पानतंबाखूचा बार भरल्याखेरीज ह्याला चैन पडत नाहीं.

मराठा अडाणी आहे, पण मानी आहे. मनानें मोकळा आहे, पण तोंडानें फटकळ आहे. निधड्या छातीचा आहे, पण भावनाविवश आहे, कष्टाळू आहे पण अल्पसंतुष्ट आहे. संतापाच्या भरांत केलेल्या चुका, तोडलेलीं माणसें मनांत असूनही तो मानी स्वभावामुळें जोडूं शकत नाहीं. ह्याचमुळें मराठ्याची चालत आलेली फुटीर वृत्ती आजही अबाधित आहे. तीव्र जातिभेद नसतांही हा बहुसंख्य मराठा समाज एकमनानें उभा राहूं शकत नाहीं. नव्या पिढींत शिक्षणाचा प्रसार चालू आहे. मराठे आपल्या इतिहासाचा अभिमान कधींही विसरूं शकत नाहींत. पण नवीन परिस्थिति न ओळखण्या-इतके ते मूढही बनणार नाहींत. जातीनें शूर, मनानें मोकळा आणि वृत्तीनें मानी असलेल्या ह्या मराठ्याला आज गरज आहे ती त्याला समजून घेऊन हाताशीं धरून नेणाऱ्या कणखर नेत्याची. मराठ्याचा भूतकाळ उज्ज्वल आहे, भविष्यकाळाची त्याला आशा आहे.

• • •






—वा. दा. पडवळ

प्रेमयाचना करतांना कसलीं कसलीं आमिषें पुरुष स्त्रीला दाखवीत असतो. पण ताड-गोळ्यांची जगावेगळी लालूच दाखवण्याचा मक्ता एकट्या भंडाऱ्याकडेच आला आहे! अर्थात् भंडाऱ्याचें हें उणें काढल्याबद्दल त्या बापड्या अज्ञात कवीला दोष देण्यांत हंशील नाहीं; कारण भंडाऱ्याचें ताड–माडाशीं अविभाज्य साहचर्य जोडून देण्याचा खटाटोप प्रत्यक्ष परमेश्वरानें केलेला आहे. परमेश्वराच्या कृपेमुळें इरभऱ्याच्या झाडावर चढणारे पुष्कळ. ताडावर चढलेला फक्त भंडारी!

म्हणजे त्याचें असें झालें—

एकदां शंकरानें तिल्कासुर दैत्याचें कांडात काढलें. त्याला घाण्यांत घालून नंदीकरवीं तुडवला. या उद्योगांत तांडवनृत्यासारखाच व्यायाम घडल्यामुळें सहाजिकच शंकराला थकवा अला. तहान लागली. तेवढ्यांत त्याच्या कपाळींचा एक घर्मबिंदू पृथ्वीतलावर पडून त्यांतून एक पुरुष निर्माण झाला होता आणि उपजतांच तो शिवस्तुति करूं लागला होता. (भूतगण हाताशीं नव्हता म्हणून कीं काय ?—) शंकरानें या नवजात पुरुषाला वेठीला धरलें; आणि आपली तृषा शांत करण्याची कामगिरी त्याच्यावर सोंपवली. अर्थात् शंकराची तहान ती! नुसत्या शीतोदकानें ती शांत होण्याची शक्यता कमीच. म्हणून इच्छामात्रेंकरून त्यानें एक सुरा-तरू निर्माण केला आणि त्यावर या पुरुषाला चढवलें. त्या दिवसापासून सुरातरूवर चढून बसलेला हा माणूस कॉंग्रेस सरकारनें पाय ओढीपर्यंत कांहीं खालीं आला नाहीं!

वर देण्यांत शंकर हें दैवत कुणाला हार जाणारें नाहीं! 'भले तरी देऊं...' हा अभंग एका विष्णुदासानें लिहिलेला; तरी त्यांतला अभिप्रेत आदर्श शंकरच असावा! तहान भागल्यामुळें शंकर प्रसन्न झाले आणि त्यांनीं 'क्वालिफिकेशन्स' न पहातांच या नवजात पुरुषाला अलकावतीचा 'भांडारी' नेमलें. या भांडाऱ्याचे आधुनिक वंशज ते भंडारी!

ईश्वराच्या उत्तमांगापासून उत्पत्ति झाली एवढ्या आधारावर भंडाऱ्याला ब्राह्मणांच्या पंक्तीला बसणें फारसें अवघड नव्हतें. पण त्यालाच हा सोस नव्हता. वेदपठणापेक्षां वेद-मुद्रण त्याच्या प्रकृतीला अधिक मानवलें. अध्ययन-अध्यापनाच्या भानगडींत न पडतां, त्यांची सोय उपलब्ध करून देण्यास त्यानें हातभार लावला. हरदासी कथेवर विश्वास ठेवून ब्राह्मण्याशीं बादरायण संबंध जोडण्याच्या भरीस न पडतां त्यानें क्षात्रवृत्ति पत्करली. शिवकालांत भंडारी क्षात्रतेजानें तळपला आहे. तालतरूवर वानराप्रमाणें सरसर चढण्याची विद्या ज्याला प्रत्यक्ष परमेश्वरानें शिकवली, तो भंडारी डोलकाठीवर चढण्यांत कच खाईल हें शक्यच नव्हतें! शिवाजीच्या आरमारांत भंडाऱ्यांचा भरणा मोठा होता. मायनाक, कीर, तांडेल, सारंग, पांजरी, नामनाईक प्रभृति भंडाऱ्यांतलीं वैशिष्ट्यपूर्ण आडनांवें त्यांच्या दर्यावर्दीपणाची साक्ष देतात. शिवकालांत शूर सैनिकांना 'हेटकरी' म्हणत असत. क्षत्रियांच्या शहाण्णव कुळींतील नांवांत भंडारी जातीचीं सर्व आडनांवें मोडतात. मराठे आणि भंडारी यांना विभक्त करणारी रेषा अत्यंत अस्पष्ट आहे. एकाच घराण्याची एक शाखा स्वतःला मराठा म्हणवते आणि दुसरी भंडारी म्हणवते. अशा कांहीं उदाहरणें अजूनहि आढळतात. कांहीं ठिकाणीं भंडारी आणि मराठे यांची सोयरीक सर्रास चालू आहे. भंडारी आणि मराठे यांच्यामधील वितुष्टाची एक हकीकत एन्थोवेनसाहेबानें दिलेली आहे. सुमारें ४०० वर्षांपूर्वी होळीवरून या दोन जमातींत बरीच हाणामारी झाली आणि तिचें पर्यवसान पुष्कळांच्या मृत्यूंत झालें. या वेळे-पासून मराठे भंडाऱ्यांकडे पाणी घेतनासे झाले. यावेळीं एक भंडारी स्त्री सती गेलेली आहे; तिची समाधि राजापूर तालुक्यांतील वरवडें गांवीं अद्याप आहे.

मराठी राज्याबरोबर भंडाऱ्यांची क्षात्रवृत्ति लोपली. फिरंगी-हबश्यांना तरवारीचें पाणी पाजणारे भंडारी तृषार्त गिऱ्हाइकाला छटाक-नवटाक पाजण्यांत धन्यता मानूं लागले. समरांगणांत शत्रूंचीं डोकीं सपासप उडवणारा हात माडाची पोय कापण्यांत शनिसर्वस्व वेंचूं लागला. मात्र नियतीनें जोडून दिलेली समुद्राची सोबत त्यानें सोडली नाहीं. त्याची सागरनिष्ठा कोळ्या इतकीच अव्यभिचारी! कराचीपासून मालवणपर्यंत ही जमात पसरलेली आहे; पण तिचें वास्तव्य समुद्रकिनाऱ्यावरच. आणि तिनें पत्करलेले व्यवसायहि प्रामुख्यानें समुद्राशीं संबद्ध!

भंडाऱ्याचें नांव दारू-माडीच्या धंद्याशीं कायमचें चिकटलें आहे. एके काळीं मुंबईत तर या धंद्याची मक्तेदारीच (मुख्यत्वें किंत्ते) भंडाऱ्यांकडे होती. दारू विकायला फारशा विद्वत्तेची गरज नसे. 'कांक' कसा पिळावा, १॥ ड्रामी ग्लासाऐवजीं १। ड्रामचें ग्लास कसें वापरावें, खूप खालून झटकन् वर उचललें म्हणजे तें कसें फेंसाळतें, प्रतिष्ठित गिऱ्हाइकाला मागल्या दारानें आंत कसें घ्यावें आणि क्वचित मागचें ग्लास जास्त झाल्यावर त्याला घरीं कसें पोंचवावें आणि १५ ऐवजीं २१ चा भाव मालकाला भरून वरतीं आणखी ५–१० रु. स्वतःच्या खिशांत कसे पाडावेत एवढें ज्ञान झालें कीं दारूच्या धंद्यांत तो मुरला! थोड्या श्रमांत मुबलक पैसा हातीं येत असल्यामुळें सहाजिकच त्याचें शालेय शिक्षणाकडे दुर्लक्ष झालें; तो चैनी, उत्सवप्रिय आणि उदार बनला. एक गोष्ट मात्र मुद्दाम सांगायला हवी. इतरांना बसल्या जागींच अंतरिक्षभ्रमणाचा किंवा समुद्रपर्यटनाचा आनंद उपलब्ध करून देणारा भंडारी गद्दीवर असतांना स्वतः पीत नसे! अर्थात् भंडारी या व्यसनापासून अलिप्त होता असें्यांतला भाग नाहीं. उलट, एके काळीं मर्तिकाच्या वेळीं मद्यप्राशन करण्याची तऱ्हेवाईक

पद्धत भंडाऱ्यांमध्यें होती! तेराव्या दिवशीं 'खांदा उतरविण्या'साठीं दारू देण्याचा प्रघात तर अगदीं कालपरवांपर्यंत होता. पण इंग्रज सरकारनें कायदा करून सतीची चाल मोडली; आणि कॉंग्रेस सरकारनें दारूला आळा घातला!

अपेयपानाला अभक्ष्यभक्षणाखेरीज रंगत चढत नाहीं. तेव्हां दारूच्या गुत्याशेजारीं मटणाचें दुकान खोलणें भंडाऱ्यांना क्रमप्राप्तच होतें. पाव-बिस्कुटांच्या धंद्यांतहि एके काळीं त्यांची मिरास होती. पुढें पारशी आणि इराण्यांनीं या धंद्यांत त्यांच्याशीं टक्कर दिली आणि त्यांतून त्यांना हुसकून काढलें. मात्र मालवणी मसाल्याच्या झणझणीतपणाला तोंड देणें पारशी-इराण्यांना जमलें नाहीं; त्यामुळें त्या धंद्यांत मात्र अजून भंडारी टिकून आहे आणि श्री. मामा वरेरकरांसारख्या वयोवृद्ध साहित्िकाला हाजीकासम वाडींतून लालबागपर्यंत पायपीट करायला लावीत आहे!

कस्टम दलाली आणि क्लिअरिंग हा भंडाऱ्यांचा आणखी एक वंशपरंपरागत धंदा आहे. मूर्तिकला आणि चित्रकला या त्यांच्या पिढीजात कला आहेत. ज्यांत भंडारी नाहीं असा मूर्ती करण्याचा कारखाना सांपडणें कठीण! लिलांव घेणें हाहि एके काळीं भंडाऱ्यांचा धंदा होता. उंच दिवाळ्याची काळी मखमली टोपी, सन्-प्रूफचा कोट, आंत मलमलची पैरण, खालीं मँचेस्टरचें तलम दहावारी धोतर, दोन बाजूस दोन पदर सोडलेले आणि उरलेला सोगा तीन चार फेऱ्यांनीं कमरेभोंवतीं गुंडाळलेला, कानांत भिकबाळी आणि पैरणीखालीं रंगीत रुमालांत बांधलेली पैशाची गटळी अशा थाटांत 'कित्ते' भंडारी सर कावसजी जहांगिर हॉलमध्यें लिलांव बोलायला येत असत! मुंबईतला छापखान्यांचा धंदा मुख्यत्वें भंडाऱ्यांनींच सुरू केला. ऋग्वेद छापण्याचें श्रेय त्यांच्याकडेच आहे.

मुंबईत भंडाऱ्यांची वस्ती मोठी. एके काळीं अत्यंत संपन्न. उत्तर मुंबईतला केवढा तरी भाग त्यांच्या मालकीचा. पण काळाचा ओघ न ओळखणारांची जी अवस्था कालांतरानें होते, तीच याहि जमातीची झाली.

जाती, उपजाती, पोटजाती यांनीं सारा हिंदुसमाजच जिथें गजबजलेला आहे, तिथें भंडारी त्याला अपवाद कसा असेल? भंडाऱ्यांतसुद्धां अनेक पोटभेद किंवा 'तट' आहेत. स्वतःला कित्ते भंडारी म्हणवणारेच मुळीं ७ तट आहेत. गेल्या शतकांत या तटांचें आपापसांत कमालीचें वैमनस्य होतें. परस्परांचीं डोकीं फोडण्यापर्यंत मजल गेली होती. पण अखेर वाईटांतून चांगलें निघालें आणि या तटांचें एकीकरण झालें. आज भंडाऱ्यांचे महत्त्वाचे पोटभेद दोन. हेटकरी आणि कित्ते. रत्नागिरी जिल्हा ही भंडाऱ्यांची मूळभूमि. विजयदुर्ग हा मध्य मानला तर खालीं वेंगुर्ल्यापर्यंतचे भंडारी हे हेटकरी आणि वरचे ते कित्ते किंवा उपरकरी. हेट आणि उपर हे नाविक परिभाषेंतले शब्द असून त्यांचा अर्थ अनुक्रमें दक्षिण आणि उत्तर असा होतो. शेषवंशी थळे आणि गावंड भंडारी हे ठाणें आणि कुलाबा जिल्ह्यांतले आणखी दोन पोटभेद. कराचीला स्थायिक झालेले भंडारी मूळचे मालवणचे. यामुळें त्यांचा रोटीबेटीव्यवहार हेटकरी समाजाशीं आहे.

रत्नागिरी जिल्हा हा नापीक. शेतीवर पोट भरण्याची शक्यता कमी. त्यामुळेंच हेटकरी आणि कित्ते भंडाऱ्यांचें पाऊल मुंबईत पडलें. शिक्षण, पोशाख आणि वागणूक यांत हेटकरी समाज आघाडीवर आहे. त्यांची ओढ नोकरी-पेशाकडे अधिक. सुधारणेच्या मार्गावर त्यांचें पाऊल चटकन वळलें. याउलट कित्ते. शिक्षणांत मागें; धंदा व्यापारांत अति धाडसी. मुंबईतलें यांचें वास्तव्य फार पुरातनकाळापासूनचें. पाठारे, पांचकळशी, कोळी यांच्याशीं त्यांचें संघटन अधिक. त्यामुळें खर्चिकपणा, नटवेपणा यांचा पगडा त्यांच्यावर जास्त. सप्तपदी, लाजाहोमासारखे विधि या समाजांत कालपरवांपर्यंत होत नसत. पुनर्विवाह (किंवा 'पाट') सर्रास चालू होता. गौरीगणपतींचें माहात्म्य अधिक. उलटपक्षीं हेटकरी समाजांत गौरींना मुळींच महत्त्व नाहीं. त्यांच्या विवाहांत ब्राह्म पद्धति वापरली जाते आणि पुनर्विवाह ते आजसुद्धां निषिद्ध मानतात. आज शिक्षणाच्या प्रसारामुळें आणि शहरीं वास्तव्यामुळें या दोन्ही तटांतील भेदभाव नाहींसा होत चालला आहे; आणि गेलीं १५-२० वर्षें तर रोटीबेटीव्यवहारहि निःसंकोचपणें चालू झाला आहे.

सामान्यतः भंडारी माणूस हा शरीरानें धडधाकट, धिप्पाड, मेहनती, पापभीरू आणि अंधश्रद्ध आहे. 'भवानी' हें त्यांचें आराध्य दैवत आहे आणि त्यांचीं देवस्थानें हीं मुख्यत्वें सतीचीं स्थानें आहेत! मानाला तो अत्यंत जागरूक असतो. 'भंडारी मान (मुंडकें) देईल, पण मान (इज्जत) देणार नाहीं' असें म्हणतात. सर्वसामान्य कोंकणी माणसाप्रमाणें भंडारी हा सुद्धां 'अच्छेर भात बोकणी'च आहे. समुद्र-सान्निध्यामुळें माशांची आवड त्याच्या हाडींमासीं खिळली आहे. 'ल्हिंगळांचा सार', 'मुळ्यांचा कांट' नाहीं तर 'कुर्ल्यांचो फेंटा नि डेंगे' असल्याखेरीज त्याला जेवण गोड लागत नाहीं. कोंबडी हें 'पावणेरां'चें पक्वान्न! घरांत तो कोंकणी भाषाच वापरतो. फक्त दक्षिणेकडून उत्तरेकडे येऊं लागले कीं 'तुका माका' ऐवजीं 'तूल मल' असे फरक होऊं लागतात इतकेंच!

एक काळ असा होता कीं, कौटुंबिक जीवनांत स्त्रियांचें स्थान 'चूल आणि मूल' याच बाबीपुरतें होतें. 'पुढलं दार' त्यांना वर्ज्य होतें. पण काळाच्या ओघानें भंडाऱ्यांना फरपटत ओढीत नेलें आहे. आज त्यांच्या मुली 'हपीसांत' कामाला जातांना दिसतात. आणि 'नोकरी करणारी सून नको बाबा माका' असें म्हणून नाकें मुरडणाऱ्या म्हाताऱ्या आतां इष्टापत्ति (किंवा आपद्धर्म) म्हणून मुलींना नोकरी करायलाहि परवानगी देऊं लागल्या आहेत!

• • •





# कुणीकडून कुणीकडे पुळ्याकडून पुण्याकडे!

— शांताराम जोग

ऋषीचें कुळ शोधूं नये म्हणतात. कदाचित् तें सांपडणें कठिण असेल म्हणा, अथवा ऋषीची थोरवी त्याच्या कुळावर अवलंबून नसते म्हणूनहि तसें म्हणत असावेत. आजच्या मराठी संस्कृतींत वैशिष्ट्यपूर्ण स्थान प्रात झालेल्या चित्पावनांचेंहि (कोंकणस्थ हें त्यांचेंच दुसरें नांव) कुळ ऋषीं प्रमाणेंच दुष्प्राप्य आहे. चित्पावन पंचद्राविड ब्राह्मणांमध्यें मोडतात. आजवर अनेक प्रयत्न करूनहि त्यांचें मूळ संशोधकांना सांपडलेलें नाहीं. जें कांहीं या प्रयत्नांनीं हातीं येतें तें धुक्यासारखें अस्पष्ट कल्पनांचें जाळें. कुणी त्यांना इराणी लोकांचे, नाहीं तर इजितमधल्या प्रवाशांचे वंशज म्हणतो; तर कांहींच्या मतें परशुरामाच्या कृपेमुळें ब्राह्मण झालेले कोंकणांतले कोळी म्हणजेच चित्पावन होत. चित्पावन हें नांवहि त्यांची चिताशुद्धि झाली असावी हें दर्शवीत असल्याचें कांहींचें म्हणणें. चित्पावनांच्या उत्पत्तीविषयीं असा भेद असला आणि ऐतिहासिक गुंतागुंत असली तरी एक गोष्ट मात्र सर्वच जण मान्य करतात. ती ही कीं, चित्पावनांचा रत्नागिरी प्रदेशाशीं—त्यांतहि चिपळूणच्या आसमंताशीं—निकटचा संबंध आहे आणि परशुरामानें त्यांना समाजांत उच्च स्थितीला आणलें असावें.

समाजांतलीं वेगवेगळ्या जातींचीं माणसें ओळखणें ही गोष्ट आज अत्यंत कठिण होऊन बसली आहे. गेल्या कित्येक शतकांतील वेगवेगळ्या वंशांच्या भेसळीमुळें, अमुक एक वैशिष्ट्य अमुक एका जातीचें आहे असें सांगणें कठिणच आहे. परंतु अजूनहि चित्पावन आपल्या हिरवट, घाऱ्या डोळ्यांनीं आणि गौरवर्णामुळें इतरांपासून वेगळा म्हणून ओळखतां येईल. आणि फिक्कट गोरेंपण, मिचमिचे घारे डोळे असलेली एखादी लहानसर अंगाची व किरकोळ शरीरयष्टीची स्त्री रत्नागिरीकडची चित्पावन स्त्री आहे असें खुशाल सांगावें!

चित्पावनांच्याबद्दल असेंहि सांगतात कीं ते फार काटकसरीनें वागणारे आहेत, हरहुन्नरी आहेत, सततोद्योगी आहेत. परंतु कोंकणच्या राहणीचा हा अपरिहार्य भाग आहे हें ध्यानांत घ्यायला हवें. कोंकणांत राहणाऱ्या इतरहि लोकांमध्यें हे गुण आढळतातच. आणि देशावर येऊन राहिलेल्या आजच्या चित्पावनांत आणि देशावरील इतर जनसमूहांत आपण कोणता फरक दाखवूं शकूं!

चित्पावनांचें असें एकच खास वैशिष्ट्य आहे. त्यांचें अफाट कर्तृत्व! बाळाजी विश्वनाथ भटाबरोबर उदयाला आलेल्या चित्पावनांच्या आजवरच्या कर्तृत्वाची मोजणी करायची म्हटलें तर तें केवळ अशक्य आहे. अगदीं मारुतीच्या शेपटांत त्यांच्या कर्तृत्वाची माळ गोंवायचें म्हटलें तरीहि तें शक्य नाहीं. चित्पावनांनीं पेशवाई गाजवली ती 'शापादपि शरादपि' या शक्तीनें. बुद्धिमत्ता आणि शरीरसामर्थ्य या दोनहि गोष्टी चित्पावनांनीं प्रकट केल्या आहेत. बाजी–चिमाजींनीं केलेली चौफेर घोडदौड, सदाशिवराव भाऊची रणांतली शर्थ, पटवर्धनादि सरदारांचा पराक्रम आणि मर्द बापू गोखले अशीं कितीतरी नांवें देतां येतील. थोरल्या माधवरावांची तीक्ष्ण बुद्धिमत्ता आणि कर्तबगारी हीहि ध्यानांत यावी. याबरोबरच समाजधुरीण म्हणून वेगवेगळ्या ब्राह्मणांतील उच्चनीचपणा नाहींसा करण्याचा बाळाजी विश्वनाथाचा प्रयत्न, समशेरची मुंज करण्याची इच्छा (केवळ लोकांनीं विरोध केल्यामुळें अपुरी राहिलेली!) करणारा पहिला बाजीराव हिंदु-अहिंदु संबंधांतून हिंदूंची औरस संतति हिंदूंतच राहावी यासाठीं झटला याची नोंद घेणें अवश्य आहे. पण या गुणांबरोबरच अवगुणहि त्यांच्यांत होतेच. शेवटच्या पेशव्याचें नाकर्तेपण, घरभेदेपणाचा शाप आणि पेशवाईच्या उत्तरकालांतील ब्राह्मणेतरांना लाभलेली वाईट वागणूक धोक्याचे कंदील म्हणून डोळ्यांसमोर येतात. पेशवाईनंतर नव्या जाणीवेनें समाजांत काम करणाऱ्या चित्पावनांचीं नांवें किती म्हणून सांगावीं? न्या. रानडे, गोखले, चिपळूणकर, लोकमान्य, आगरकर, शिवरामपंत परांजपे, हरिभाऊ आपटे, केशवसुत, साने गुरुजी इत्यादि लेखक, राजकीय व सामाजिक कार्यकर्ते, कवि सहजच आठवावेत. कोणतेंहि क्षेत्र पहा. त्यांत चित्पावन आढळणारच. आज साहित्य, समाजकारण, राजकारण आदि क्षेत्रांत चित्पावन आढळायचेच. भूदानाचे प्रणेते विनोबा, गोव्याच्या तुरुंगांत खितपत पडलेले गोरे—लिमये, साहित्यक्षेत्रांतले फाटक, पोतदार, भावे, गाडगीळ, करंदीकर, कुणालाहि आठवतील. सावरकरांसारखा ज्वलंत साहसी क्रांतिकारक अद्वितीय ठरेल. महर्षि कर्वे व सेनापती बापटांचें कर्तृत्व, वृद्धकाळींहि असलेला तरुणाचा उत्साह, विसरणें कठिण आहे सारांश इतकाच कीं चित्पावन म्हणजे मराठी संस्कृतीला लाभलेली एक देणगी आहे.

चित्पावनांच्या कांहीं गुणांविषयीं वर केलेल्या उल्लेखामुळें त्यांचीं कांहीं गुणदर्शक आडनांवें सहजच आठवतात; खरे, सहस्रबुद्धे, विद्वांस, गोडबोले, मनोहर, रसाळ, गोडसे, बरवे (बर्वे), पण इतरहि कांहीं कांहीं आडनांवें आपल्याला आढळतात व आर्थींच्या गुणांवर बोळा फिरविणारे चित्पावनी अवगुण स्मरतात. खुळे, आगलावे, ढबू, बाळ, पाउलबुद्धे (सहस्रबुद्धे यांच्या विरुद्ध किंवा गतानुगतिक!), गोळे इ. चित्पावनांत गोरे आहेत आणि काळेहि आहेत. त्यांच्यांत जोग आहेत (पण शहाजोग नाहींत.) जोगदेव आहेत आणि जोगदंडहि आहेत. आचार्य आहेस तसे आचारीहि आहेत. फडके तसेच छत्रे पण आहेत. फणसे नि शिदोरेहि आहेत. कुणी उकीडवे, कुणी काणे, कुणी किडमिडे तर कुणी किणमिणे. येवढेंच नाहीं तर चित्पावनांत मराठे आहेत, राणे आहेत व पाटीलसुद्धां आहेत. चित्पावनांच्या नांवांचा विचार केल्यावर जाणवणारी गोष्ट ही कीं त्यांच्यामध्यें गुण असो वा अवगुण असो, एकान्तिकपणें तो आढळणार हें निश्चित!

अनुक्रमणिका

धार्मिक दृष्ट्या विचार करतां चित्पावनांमध्यें त्यांच्याच अशा फारच थोड्या गोष्टी आहेत. बोडण भरण्याची पद्धत, मार्गशीर्ष शु० १ या दिवशीं सर्व ग्रामदेवतांना नैवेद्य अर्पण करणं या व्यतिरिक्त क्वचित्‌च कुणबी सवाशीण जेवायला बोलावण्याची चाल आढळते. बहुतेक चित्पावन आपस्तम्ब शाखेचे, सामान्यतः शैव. क्वचित्‌च विष्णुपूजक. वाडेश्वर, जोगेश्वरी व इतर वेगवेगळीं कुलदैवतें हीच गोष्ट दर्शवितात.

चित्पावनाची अशी वेगळी भाषा जुन्या काळीं रत्नागिरी, वेंगुर्लें इ. भागांत होती. पण मराठीचीच वेगळी बोलभाषा. तिला चित्पावनी म्हणत. नमुना म्हणून कांहीं वाक्यें देत आहे. "माणसान वे म्हटलें आपलेपण सोडूं नये. दुसरेर्शी चखोट सेलता घेवां. पण उटलेसुटले दुसरेच्या सगळ्याच तन्ह वेगां अगदीं वाईट. आतांशा पुरुष बायको धाकटी बचेबी तीं अगदींच आपल्यीं शिळपट दिसचंत. दिवसान् दिवस सगळ्याच गोष्टीज भीकारपण नि दुबळेपण वाढत चाल्लां "

आज मात्र ही भाषा बहुतेक आढळायची नाहीं. अन्य प्रदेशांतील लोकांशीं संबंध आल्यामुळें त्यांची भाषा वेगळी राहिलेली नाहीं. हाच प्रकार राहणीची पद्धति, खाणेंपिणें इत्यादि बाबतींत झालेला आहे. पूर्वी चित्पावन म्हणजे पंचेबजा धोतर, अंगरखा, भलेंमोठें पागोटें किंवा पगडी आणि वहाणा अथवा पुणेरी जोडा घातलेला आढळायचा. आज सगळ्यांचाच पोषाख एक होऊन बसला आहे. ताकभात आणि आळूची भाजी (अळूचें फतफतें!) हें चित्पावनाचें बहुशः जेवण. लोक म्हणतच मुळीं, 'कोंकणस्थ भात बोकणस्थच!'. चित्पावनी कुटुंबांतली शिस्तहि मोठी वाखाणण्यासारखी असे. देशस्थांप्रमाणें गैरशिस्त न राहण्याचं शिक्षण (?) लहानपणापासूनच मुलांना मिळायचें!

हल्लींच्या समाजविषयक कल्पनांतील बदलामुळें समाजांतले वेगवेगळे थर एक येत आहेत. त्यांची राहणी, विचारपद्धति, चालीरीति सर्व एकजिनसी बनत आहेत. आणि त्यामुळें कोणताच थर समाजांत वेगळा उठून दिसणार नाहीं. आणि समाधानाची गोष्ट ही कीं इतरांपासून आपण वेगळे आहोंत ही अभिमानाची बाब पूर्वी समजणारे चित्पावन या कामीं पुढाकार घेत आहेत.

• • •




—बाळ सामंत

महाराष्ट्रांत वारल्यांची वस्ती दोन लक्ष तरी असेल. त्यांतील सव्वा लक्षाहून अधिक वारल्यांनीं ठाणें जिल्हा आपलासा केला आहे. या आदिवासी जातीचें सारें आयुष्य जंगलांतच जात असल्यामुळें वेळप्रसंगीं जंगली जनावरांशीं दोन हात करण्यास वारली मागें पुढें पाहाणार नाहीं; पण त्याच चित्त्याऐवजीं एखादा आमच्यासारखा पांढरपेशा माणूस दिसला तर त्याची त्रेधातिरपीट उडेल!

खानदेशी भिल्ल किंवा गोंड यांच्यासारखें ठळक व्यक्तिमत्त्व वारल्यांच्याजवळ नाहीं. वर्णानें काळे, मध्यम नाकाचे, जंगलांतला कंद, पाला आणि मिळेल त्या जनावराचें मांस खाऊनहि अंगावर फारसें मांस नसलेले पण मोठे काटक असतात. आमच्या शहरी जीवनांत शेंडीपुरताहि हिंदुधर्म उरलेला नसला, तरी वारली अद्यापि शेंडीला चिकटून आहे. भारतसरकारच्या कापडविषयक अनिश्चित धोरणाबाबत वारल्याला कांहीं फिकीर बाळगायचें कारणं नाहीं; कारण लंगोटीवरच तो संतुष्ट आहे! बाहेर जातांना अंगावर फक्त डगला असेल. धोतर पाटलोणीला तो स्पर्श करूं देणार नाहीं. अलीकडे पांढरपेशा तरुणांना पाहून वारलीहि जिवाची मुंबई करूं लागले आहेत. सुधारक वारली तरुण केस राखून तकतकीत भांग पाडतात, गळ्यांत रंगीत रुमाल बांधतात आणि कानांवर एक झेंडूचें फूल लावतात.

विवाहित वारली स्त्री आठ वारी साडी कंबरेस गुंडाळते. एक पदर अंगावर असतो; गुडघ्याखालचा भाग उघडाच असतो. साडीचा काचा घट्ट असतो व तो दोन्ही पायांतून इतका खोचून घेतलेला असतो कीं चालतांना कंबर लचकतेच! अविवाहित तरुण वारली पोरींना पदराशीं चाळा करण्याची चावट संवय नाहींच; कारण पदरच नसतो! कंबरेस ३।४ वारी फडकें आणि वर चोळी घालून त्या स्वैरपणें रानावनांत खिदळत असतात. आदिवासी स्त्रियांना तांबडा रंग अतिशय प्रिय असतो. नवऱ्यानें लाल साडी घेतली नाहीं कीं त्या रागानें लाल झाल्याच म्हणून समजा. वारली स्त्रियांची अलंकारांची हौस पितळ, कथील आणि चांदी या धातूंपुरतीच मर्यादित आहे. मात्र या वनवासी स्त्रिया रानफुलांच्या फार शोकीन. विशेषतः झेंडूच्या वा इतर जंगली फुलांचे गजरे डोक्यावर माळून महालक्ष्मीच्या यात्रेला या वारली मुली मैल न मैल तुडवीत हंसत खिदळत जातात.

वारली हा जातिवंत शिकारी आहे. भात नागली, वरी, या तृणधान्यावर संतुष्ट न राहतां तो आपली नजर जंगली जनावरांकडे वळवतो. आमचे शहरी शिकारी केवळ बंदुकीवरच शूर असतात; तर वारली शिकारीचीं अनेक साधनें वापरतो. उडत्या पाखरांना तो आपल्या गलोलीनें टिपत असतो. पण त्याची गलोल मोठी गंमतीदार असते. बांबूच्या कांबीला दोन दोऱ्या बांधून मधोमध खडे मारण्यासाठीं वाकाची जाळी केलेली असते. वारली हा अनार्य असला तरी बहाद्दर धनुर्धर आहे. पाळीव कुत्र्यांच्या मदतीनें आणि धनुष्याच्या साहाय्यानें तो भेकरांची व इतर लहान जनावरांची शिकार करतो. जिवंत पक्षी पकडणें हा आदिवासी तरुणांचा आवडता छंद आहे. एखाद्या आयुर्वेदपंडिताला लाजवील अशी त्याला झाडाझुडपांची माहिती असते!

रानावनांत हिंडणारा हा स्वच्छंदी प्राणी घरीं अगदीं गोगलगाय असतो. घरांत बाइकोच्या

शब्दाला फार मान असतो. वारली हा निसर्गाचें लेकरूं आहे; त्यामुळें अर्थातच तो निसर्गपूजक आहे. आदिवासींची ग्रामदेवता म्हणजे 'वाघया.' हा 'वाघया' गांवाच्या वेशींत वडाखालीं खैराच्या लाकडावर कोरलेला असतो. त्याच्या पूजेचें फारसें स्तोम नाहीं. वर्षांतून एकदांच सुगीच्या वेळीं त्याची पूजा होते; पण ती बकरा बळी दिल्याशिवाय पुरी होत नाहीं. आदिवासींची कुलदेवता म्हणजे 'महालक्ष्मी' आणि 'नारन् देव.' चैत्री पौर्णिमेला आणि भाद्रपदांत द्वादशीला महालक्ष्मीच्या यात्रेला सारा आदिवासी समाज मोठ्या श्रद्धेनें गोळा होतो. सदैव जंगलांतच राहणाऱ्यांचा भुताखेतांवर विश्वास असावा ही गंमतीदार गोष्ट आहे! पण आदिवासी भुताखेतांना देव मानतात; वेताळखविसाची पूजा करतात. त्यांना ते 'चेडे' असें म्हणतात. याशिवाय गाई रवंथ करतांना त्यांच्या तोंडांतून गोल खडे पडतात अशी त्यांची समजूत आहे. या खड्यांची 'वाग ले' देव म्हणून पूजा केली जाते. आपल्या पितरांच्या नांवानें ते तांदळाच्या काळया व पांढऱ्या पुरचुंड्या आढ्याला बांधतात. अर्थात् पांढरा रंग स्त्रीचा व काळा पुरुषाचा, हें सांगायला नकोच!

आदिवासींचे मुख्य सण म्हणजे दिवाळी, संक्रांत, होळी, कोवळी आणि नवें. आदिवासींची दिवाळी ही वैशिष्ट्यपूर्ण आहे. दिवाळींत नवे कपडे खरेदी केले जातात. मात्र हा उत्सव आपल्यासारखा गोडखाण्याचा नसून धान्याचा उत्सव असतो. करंज्या, लाडू हीं पक्वान्नें वारल्यांना माहित नाहींत. दिवाळींत पानमोडी नांवाच्या चपट्या भाकरी आणि चवळीची उसळ हें पक्वान्न. संक्रांतीच्या तिळगुळाची गोड प्रथा वारल्यांतहि आहे. पण संक्रांतीचा सण म्हणजे प्रामुख्यानें शिकारीचा सण. त्या मागोमाग येणारी होळी हा वारल्यांचा मोठा सण. घरांत पिठाचे वडे करतात, कैरी कापून एकमेकांस देतात, जमल्यास मद्यपान करतात आणि ढोलाच्या तालावर सुरेख नृत्य करतात. कोवळी हा आदिवासींचा खास सण आहे. पावसाळ्यांत कोवळी नांवाची भाजी सर्वत्र होते. ती खाऊन हा सण साजरा करतात.

आपल्या सर्वसामान्य विवाहपद्धतीशिवाय वारली हा प्रतिष्ठितपणें घरजांवई म्हणून राहूं शकतो! एखाद्या गरीब तरुणानें शेतीचीं कामें करीत असतांनाच प्रणयाचे खेळ चालू ठेवले आणि ते त्या पोरीला पसंत पडले, तर दोघांचे संबंध प्रणयाची मर्यादा ओलांडतात आणि मग त्यांना घरांतच एखाद्या खोलींत पतिपत्नीच्या नात्यानें राहातां येतें व पुढें मागें सवडीनुसार घरांतल्या एकाद दुसऱ्या कार्यांत हेंहि कार्य उरकून घेतलें जातें. या घरजांवयाला 'घरोरी' म्हणतात. एकाद्या वारली तरुणाला लग्नाचा सगळा खर्च झेंपला नाहीं, तर तो 'ॲडव्हान्स' देऊन पोरगी पटकावतो व सवडीनें केव्हां तरी लग्न लावतो. पण अट ही कीं, त्यांच्या पोराबाळांच्या लग्नाआधीं हें आईबापांचं लग्न उरकलं पाहिजे! नाहीं तर पोराच्या लग्नांतच आईबापाना मुंडावळ्या बांधाव्या लागतात! या सर्व लग्नव्यवहारांत मद्य हा स्थायीभाव असतो हें लक्षांत ठेवण्यासारखं आहे! प्रत्यक्ष लग्नांत मात्र नवरानवरीच्या हळद लावण्याच्या समारंभाच्या वेळीं उपस्थितांनाहि हळद लावून घ्यावीच लागते. मात्र मुहूर्ताची कटकट नसल्यामुळं लग्न केव्हांहि उरकून घेतां येतें!

वारली हा नृत्याचा जातिवंत भोक्ता आहे. दिवाळीच्या सुमारास कामडी नाच आणि दसऱ्याच्या सुमारास तारपांचा नाच प्रत्येक वारली खेड्यांत चालू असतो. दुध्या-भोपळ्यापासून केलेलें 'तारप' म्हणजे वारल्यांचें लोकप्रिय वाद्य. या वाद्याच्या ठेक्यावर सारे आबालवृद्ध स्त्रीपुरुष मोठ्या आनंदानें कसलीहि लाज न बाळगतां रात्रंदिवस नाचत असतात. बा[illegible] नाचऱ्या असतात ही म्हण वारली पुरुषांनीं खोटी पाडली आहे! दिवाळीनंतर कोणत्याहि वारली खेड्यांत जा:

'नाचाया येरे माझा सलाम तुला'

अशी आळवणी ढोलवाल्यानें केली कीं, ढोलक नाच सुरूं झाला! या ढोलनाचांत शारीरिक कसरतीचा मोठा लयबद्ध आकर्षक भाग आहे. तारप्याच्या नाचांत स्त्रीपुरुष वाजविणाऱ्याच्या भोंवतीं मोठ्या लयबद्धतेंत फेर धरून नाचतात. त्याला घुंगुरांच्या काठ्यांचाहि ठेका असतो. वारल्यांचा आणखी आवडता [illegible] म्हणजे 'बोहाडा.' या 'बोहाडा' [illegible] लाकडी सोंगें, (यांत दशमुखी रावणाचा समावेश आहे.) डोकीवर चढवून न [illegible]मतां ते सतत नाचत असतात!

• • •

हुकलेली संधि

मीच जाहलों असतें

निश्चिन बुद्धदेव पहिला

हाय परंतू दुर्दैवानें

जन्मकाळ चुकला!

—पुरुपदंत








